

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका





# दलित साहित्य : काही विचार

दलित साहित्याच्या सध्याच्या स्थितीत समाजपरिवर्तनाला उपकारक ठरणारी निषेधपरता व नकारप्रवृत्ती यांना प्राधान्य मिळाले तर ते स्वाभाविकच आहे. कारण कोणत्याही क्रांतिकारक साहित्याचा तो आवश्यक भाग असतो. जुन्या कालबाह्य झालेल्या परंपरेवर प्रहार केल्या खेरीज, तिच्यातील जीर्णांश निपटून काढल्याखेरीज परिवर्तन होत नाही. परंतु सामाजिक क्रांतीचे दुसरेही एक विधायक अंग असते.

जुने नष्ट करीत असतानाच त्याच्या जागी नवे कसे निर्माण करायचे याचाही विचार करावा लागतो. शिवाय नवे म्हटले तरी ते काही स्वयंभू-पणे शून्यातून अस्तित्वात येत नाही. वास्तवाच्या आधारेच त्याची उभारणी होऊ शकते. जुन्याची पाळेमुळे वास्तवात इतकी खोलवर गेलेली असतात की, जुने नष्ट करताना वास्तवाची पुनर्घटना करण्याचा प्रश्न उपस्थित होतो. जुने कधीच एकदम नष्ट होत नाही. इतकेच नव्हे तर परिवर्तनाच्या प्रक्रियेमधून जुन्यातील सत्त्वांश नव्या चौकटीत, नव्या व्यवस्थेत अंतर्भूत होतो. जुन्यातील काही अंश जेव्हा नव्या व्यवस्थेचा घटक बनतो, तेव्हा त्याचे जुनेपण संपलेले नसते. त्याचे स्वरूप बदलता त्याला नवा अर्थ प्राप्त होतो. जीवनाच्या प्रत्यक्ष परिवर्तनामध्ये अशा प्रकारे सातत्य असतेच...

दलित साहित्याच्या मुळाशी जी बंडखोरपणाची प्रेरणा आहे ते त्याचे प्राणतत्त्वच आहे. पण फक्त तेवढ्यावर विसंबून राहणे हितावह होणार नाही. तत्त्वचिंतन, विद्याव्यासंग, तंत्रसाधना, भाषाप्रभुत्व या गोष्टींचीही दलित वाङ्मयाच्या प्रगतीला आवश्यकता आहे. आपले साहित्य ही एक मोठ्या व्यापक चळवळीची आघाडी आहे याचा दलित साहित्यिकांनी क्षणभरही विसर पडू देता कामा नये.

**गं. बा. सरदार**

अध्यक्ष, ५४ वे अ. भा. म. सा. संमेलन

बार्शी, १–२–१९८०

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाग्यज्ञे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

ऑक्टोबर-डिसेंबर १९७९ • संपादक : आनंद यादव

प्रा. गं. बा. सरदार



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाङ्मये तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति-मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( अंक २११ : ऑक्टोबर ते डिसेंबर १९७९ )

संपादक

आनंद यादव




संपादन समिती

व. दि. कुलकर्णी
न. म. जोशी
वसन्त सावन्त

सल्लागार

गो. म. कुलकर्णी
द. ता. भोसले

मुद्रक

श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक

न. म. जोशी
कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे ३०

मूल्य पाच रुपये

अनुक्रमणिका






# अनुक्रमाणका





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# संपादकीय

स्नेहपूर्वक नमस्कार. :

प्रस्तुत अंकात बदलत्या स्वरूपाचा प्रत्यय पत्रिकेच्या वाचकांस अधिक प्रमाणात येईल असे वाटते. प्रत्यक्ष अंक हीच त्याची साक्ष असल्याने वेगळे काही लिहीत नाही.

म. सा. परिषदेने कारला येथे आयोजित केलेल्या 'ग्रंथ व्यवहार परिषदे'च्या अभिनव उपक्रमाने साहित्य व्यवहारातील अनेक प्रश्नांना वाचा फोडलीच. पण लेखक प्रकाशकांच्या संबंधानाही अर्थपूर्ण वाचा फुटली. अशा प्रकारचे उपक्रम यापुढे अधिक योजनापूर्वक व्हावेत व त्यातून एकूण ग्रंथव्यवहाराच्या सर्व बाजूंचा निर्विकार-पणे विचार व्हावा अशी अपेक्षा आहे.

कै. रा. श्री. जोगांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ठेवलेले साहित्य समीक्षात्मक ग्रंथाचे पारितो-षिक श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या 'वामन मल्हार आणि विचार सौंदर्य' व श्री. शरदच्चंद्र मुक्तिबोध यांचा 'सृष्टी' 'सौंदर्य' आणि साहित्यमूल्य' या ग्रंथांना विभागून मिळाले. याच वर्षीचे साहित्य अकादमीचे मराठी ग्रंथाचे पारितोषिक श्री. मुक्तिबोधांच्या वरील ग्रंथासच मिळाले. यावरून कै. जोग पारितोषिकांसाठी निवड-लेल्या ग्रंथांची निवड कशी अचूक होती, हे कळते. त्याबद्दल निवडसमितीचे अभि-नंदन केले पाहिजे. श्री. प्रभाकर पाध्ये आणि श्री. शरश्चंद्र मुक्तिबोध यांचे म. सा. पत्रिका हार्दिक अभिनंदन करीत आहे.

फेब्रुवारी १९८० च्या पहिल्या आठवड्यात बार्शी येथे होणाऱ्या ५४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून प्रसिद्ध विचारवंत आणि समीक्षक प्रा. गं. बा. सरदार यांची निवड झाली त्याबद्दल पत्रिका त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे. सरदारांच्या सामाजिक दृष्टीचा साहित्याशी घनिष्ठ संबंध आहे. कला-त्मकतेला धक्का लागू न देता एका व्यापक पातळीवर त्यांनी साहित्य आणि समाज यांचा संबंध दाखवून दिला आहे. काही काळ समीक्षेच्या तात्त्विक मीमांसेत त्यांची ही 'दृष्टी' मागे पडल्यासारखी झाली होती, पण आता स्वातंत्र्योत्तर सामाजिक मंथनाच्या, सामाजिक स्तरातील नव्या सांस्कृतिक प्रबोधनाच्या काळात तिला पुन्हा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रतिष्ठा प्राप्त होऊ लागल्याची शुभचिन्हे दिसत आहेत. त्याचीच खूण म्हणून की काय यंदाच्या वार्षांच्या साहित्य संमेलनात 'ग्रामीण साहित्या'ला पहिल्यांदाच संमेलनीय प्रतिष्ठा मिळत आहे आणि दलीत साहित्याचे, वेगळे शाखा संमेलन घेतले जात आहे.

ज्यांच्या विविध प्रकारच्या विनोदी साहित्याचा आस्वाद उदंड उत्साहाने महाराष्ट्र घेतो आणि हसता हसताच डोळ्यांत आसू आणतो अशा अष्टपैलू साहित्यिकाची 'साठी' त्यांची इच्छा नसताना मराठी रसिकांनी आपण होऊन महाराष्ट्रभर विविध प्रकारांनी गेल्या ऑक्टोबरात साजरी केली. महाराष्ट्र सारस्वताला उत्तम विनोदी रसरसती शैली देणाऱ्या या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाच्या श्री. पु. ल. देशपांडे यांना पत्रिकेतर्फे मनःपूर्वक अभिवादन !

गेल्या दोन तीन महिन्यांच्या कालावधीत मराठी साहित्य क्षेत्रातील दोन नामवंत हिरे हरपले : न. र. फाटक ( मृत्यू : दि. २१ डिसेंबर ) आणि माधव आचवल. ( मृत्यू : दि. २१ जानेवारी ) न. र. फाटकांनी अभ्यासूवृत्तीने आपली स्वतंत्र, चिकित्सक आणि परखड मते मांडून साऱ्या महाराष्ट्राचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले तर माधव आचवलांनी कलेचा आस्वाद घेणाऱ्या 'आदर्श रसिकाचे मन' आपल्या मोजक्या ग्रंथांतून 'मराठी'ला दिले. साहित्यिक महाराष्ट्र या दोघांचा सदैव ऋणी राहावा अशी ही दोन मराठी व्यक्तिमत्त्वे होती. त्यांना पत्रिकेची भावपूर्ण श्रद्धांजली.

फर्ग्युसन कॉलेजमधील निवृत्त प्राध्यापक, कै. रा. श्री. जोग यांचे साहित्यिकमित्र आणि परिषदेचे जुने निष्ठावंत कार्यकर्ते प्रा. श्री. रा. पारसनीस नुकतेच निधन पावले. 'पत्रिके' तर्फे त्यांना आदरपूर्वक श्रद्धांजली.

**आनंद यादव**
संपादक, म. सा. पत्रिका

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# माधवरावांचे चरित्र आणि श्री. के. क्षी.

## द. न. गोखले

'प्लेटॉनिक प्रेम आणि माधवरावांचे चरित्रकार' या नावाचा लेख म. सा. पत्रिकेच्या जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९७९ च्या अंकात प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी लिहिलेला आहे. माधवराव पटवर्धनांचे चरित्र ज्यांनी वाचले आहे त्यांना ही गोष्ट परिचित आहे, की माधवरावांच्या जीवनात वरदा-प्रकरण ही एक फार महत्त्वाची नि गाभ्यातली गोष्ट होती. माधवरावांनी वरदा नायडू या विद्यार्थिनीशी स्नेहसंबंध ठेवला म्हणून फर्ग्युसन महाविद्यालयातून त्यांना दोन वर्षांच्या सक्तीच्या रजेवर जावे लागले, नि पुढे आजीव सदस्यत्वाचा राजीनामा देऊन डे. ए. सोसायटीमधून बाहेर पडावे लागले. माधवराव रजेवर असताना नाना रानड्यांनी आपल्या मुंबईच्या घरी त्यांची नि वरदेची भेट घडवून आणली होती, आणि त्या भेटीने सोसायटीमधल्या माधव-रावांच्या प्रतिस्पर्ध्यांच्या हातात कोलीत मिळाले होते. श्री. के. क्षीं.ची अशी समजूत आहे, की ही भेट घडविण्यात नाना रानड्यांचा काही "डाव" होता, काही भयंकर अपराध त्यांच्या हातून घडला होता, आणि त्यांना दोषमुक्त करण्याचा माझा इरादा नि प्रयत्न आहे. त्यामुळे नाना रानड्यांना नि मला त्यांनी भलतेच धारेवर धरले आहे.

पण नाना रानड्यांना दोषमुक्त करण्याचा माझा इरादा नि प्रयत्न आहे, हा शोध श्री. के. क्षीं.नी कोठून लावला ते समजत नाही. श्री. के. क्षी. एकीकडे म्हणतात, की "माधवराव आणि वरदा या दोघांचेही कल्याण करण्यास" नाना रानडे "प्रामा-णिकपणे प्रवृत्त" झालेले होते; आणि दुसरीकडे ते म्हणतात, की माधवराव व वरदा यांची भेट नाना रानड्यांनी घडवली हा एक "डाव" होता, "रानड्यांनी माधव-रावांना पेचातच पकडले होते," पण मी तसे करीत नाही, हे खरे आहे. पण "चरित्रकार गोखले यांना जी पत्रे अलीकडेच पाहावयास सापडली त्यांच्या आधारा-वर ते माधवराव आणि श्री. वा. रानडे या दोघांनाही दोषमुक्त करण्याची आशा बाळगून आहेत" हे श्री. के. क्षी. कशाच्या आधारावर लिहितात ते मला कळत नाही. जे घडले त्याचा सहृदयतेने, कल्पकतेने, नि निखळ सत्यनिष्ठेने शोध घ्यावा, ज्याचा

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



जो स्वभावविशेष दिसेल तो त्याच्या स्वभावचित्रणात उतरवावा, आणि हे करीत असता गुणांचे किंवा दोषांचे ज्याचे जे माप असेल ते त्याच्या पदरात पडू द्यावे, अशा उमेदीने मी चरित्र लिहिले. पण माधवरावांना किंवा श्री. बा. रानड्यांना "दोषमुक्त" करण्याची आशा मी केव्हाही बाळगली नाही.

श्री. के. क्षी. एका ठिकाणी म्हणतात, की "चरित्रकार गोखले यांना जी पत्रे अलीकडेच पाहावयास सापडली, त्यांत वरदाने मुंबईत माधवरावांची गाठ घेण्याची इच्छा व आतुरता व्यक्त केली आहे. म्हणजे मुंबईत रविकिरण मंडळाच्या बैठकीस गेलो असता आपली व वरदा नायडूची भेट होणार हे माधवरावांना माहीत होते. अर्थात रानड्यांनी हा डाव योजला हा जो मुख्य आरोप, तो वरदेच्या या पत्राने खोटा ठरतो अशी चरित्रकार गोखल्यांची मांडणी." या म्हणण्यातील प्रथमार्ध खरा आहे. वरदेने माधवरावांना पाठवलेल्या पत्रांचा प्रथमच शोध घेऊन मी असे निःशंकपणे प्रस्थापित केले आहे, की माधवरावांना पूर्वकल्पना नसताना त्यांची नि वरदेची मुंबईला नाना रानड्यांच्या घरी गाठ पडली ही जी पूर्वलेखकाची कल्पना होती ती खोटी होती. आपण नानांचा सल्ला घेणार आहोत, मुंबईला जाणार आहोत, नि तेथे भेटीची अपेक्षा आहे, हे वरदेने माधवरावांना कळविलेले होते आणि त्यानंतर माधवराव मुंबईस गेले होते. मात्र श्री. के. क्षीं.च्या म्हणण्यातील द्वितीयार्ध खरा नाही. नाना रानड्यांनी डाव योजला होता, असे मी म्हणत नाही. पण त्यांच्या कृतीत जे गुणदोष होते त्यांमधून मी त्यांना मुक्तही करीत नाही श्री. के. क्षीं.नी 'रसिक'च्या १९७८ च्या दिवाळी अंकातील माझ्या लेखाचा उल्लेख केला आहे. पण त्या लेखात किंवा चरित्रग्रंथात भेट घडवून आणण्याची जबाबदारी मी नाना रानड्यांवरच टाकली आहे. लेखात मी स्पष्ट म्हटले आहे, की "भेटीपूर्वी माधवरावांचा व वरदेचा पत्रव्यवहार चालू होता, आणि वरदा भेटीसाठी उत्सुक आहे, नानांकडे आपल्याला भेटण्याचा तिचा बेत आहे, हे माधवरावांना ठाऊक होते. पण वरदेच्या मनात लग्नाची इच्छा उसळू लागली आहे, हे त्यांना उमगले नव्हते. (त्यांच्या भाबडे-पणाचा तो एक नमुना होता.) वरदेने आपल्या चित्तवृत्ती हेलावल्याचा सुगावा पत्रातून त्यांना दिला होता; पण लग्नाचा उल्लेख चुकूनसुद्धा केला नव्हता. तेव्हा, जी भेट होणार ती दोन चिरवियुक्त स्नेह्यांची होणार असे ते धरून चालले होते. त्या भेटीतला सारा धोका पतकरायला ते अर्थातच तयार असणार. पण नाना रानड्यांनी जी भेट घडविली ती वेगळी होती. तीमध्ये वरदेने त्यांच्याकडे विवाहाची मागणी केली, आणि तीही चारचौघांसमक्ष केली. रानड्यांनी भेटीचा जणू गाजावाजा केला. त्यांच्या एका नातेवाइकाने तर पुण्याला जाऊन माधवरावांच्या प्रतिपक्षाला भेटीची साग्रसंगीत माहिती दिली. तेव्हा या वेगळ्या भेटीची जबाबदारी रानड्यांवरच पडत होती, आणि तीबद्दल माधवरावांचा त्यांच्यावर रोष व्हावा, हे सरळ होते. इतके

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्पष्ट लिहिल्यावरही मी रानड्यांना दोषमुक्त करीत आहे, असे श्री. के. क्षी. जोरजोराने सांगतात तेव्हा हसावे की रडावे ते समजेनासे होते. "रानड्यांच्या घरच्या भेटीची जबाबदारी रानड्यांच्या गळयात पडत नाही, हा चरित्रकाराचा निष्कर्ष तर्कसंगत नाही" असे श्री. के. क्षी. बिनदिक्कत सांगतात; पण मी तसला निष्कर्ष काढलेलाच नाही.

श्री. के. क्षीं. नी नाना रानड्यांवरील स्वकृत आरोप सिद्ध करण्यासाठी माधवरावांची साक्ष काढली आहे, आणि त्या साक्षीवरून आरोप सिद्ध झाले असे समजून मी रानड्यांना दोषमुक्त कसे करतो म्हणून मला चापले आहे. पण त्यांची ती कृती फारच पोकळ आहे. माधवरावांच्या पत्रातील, "मूर्ख मित्रापेक्षा शहाणा शत्रू पुरवतो. वास्तविक हे काम ज्यांनी अगोदर माझ्याशी दिलखुलाशाने न बोलता, चमत्कारिक सहानुभूतीने व अदूरदर्शीपणाने मुंबईस नसती ढवळाढवळ केली. त्यांचे (म्हणजे नाना रानड्यांचे) आहे."—हा उतारा देऊन श्री. के. क्षी. पुढे पृच्छा करतात की, "माधवराव स्पष्टपणे नाना रानड्यांच्यावर आरोप करीत असता, माधवरावांचे चरित्रकार रानड्यांना कशाच्या जोरावर दोषमुक्त करू पाहतात?" आणखी एके ठिकाणी श्री. के. क्षी. म्हणतात, की "माधवरावांच्या व्यावसायिक जीवनावर व परिणामतः संपूर्ण जीवनावर परिणाम करणाऱ्या या भेटीसंबंधी रानडे यांनी योग्य ती गुप्तता राखलेली नव्हती हे उघड आहे. हे इतके उघड असता 'नसत्या उठाठेवी करण्याच्या आरोपातून चरित्रकार गोखले, रानड्यांना दोषमुक्त कसे काय करणार?' पण माधवरावांनी नाना रानड्यांवर काही आरोप केले असले तरी त्यांनी केलेले आरोप नि श्री. के. क्षीं. नी केलेले आरोप एकरूप नसून भिन्न आहेत. माधवराव नाना रानड्यांना "मूर्ख" मित्र म्हणतात, त्यांची सहानुभूती "चमत्कारिक" होती असे सांगतात. आणि त्यांच्या "अदूरदर्शी ढवळाढवळी" बद्दल संतप्त होतात, पण श्री. के. क्षीं. प्रमाणे त्यांनी काही "डाव" रचला असा दुष्ट हेतू त्यांच्यावर लादीत नाहीत. तेव्हा माधवरावांच्या साक्षीने आपला आरोप सिद्ध होतो, ही श्री. के. क्षीं.-ची समजूत निरर्थक ठरते. आता माधवराव नाना रानड्यांवर आरोप करीत असून मी मात्र नाना रानड्यांना दोषमुक्त करतो, ह्या श्री. के क्षीं च्या प्रचाराला तरी आधार आहे काय? मी श्री के. क्षीं चे आरोप ग्राह्य धरलेले नाहीत. पण माधवरावांच्या आरोपातील ग्राह्याग्राह्यता समजून घेतली आहे. ते आरोप माधवरावांच्या दृष्टीने योग्यच मानले आहेत, ही त्याबाबत वस्तुस्थिती आहे. श्री के क्षीं.नी उल्लेखिलेल्या 'रसिक' मधील लेखात वर उल्लेखिल्याप्रमाणे, "भेटीची जबाबदारी रानड्यांवरच पडत होती आणि तीबद्दल माधवरावांचा त्यांच्यावर रोष व्हावा, हे सरळ होते"—हे तर मी म्हटले होतेच; पण त्याला पुढीलप्रमाणे पुरवणीही जोडली होती :—

"शिवाय, वरदेने जी विवाहाची मागणी केली तिचा रानड्यांनी पाठपुरावा केला होता. त्या मागणीने तर सोसायटीत माधवरावांविषयी हलकल्लोळ माजला. त्यांच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मनातला स्नेह निर्विषय होता. तो शरीरसंबंधाने नासणार होता. वरदेच्या मनात लग्नाची कल्पना ( म्हणजे शरीरसंबंधाची कल्पना ) दृढमूल झाली. तिने ती इतरांच्या बैठकीत बोलून दाखविली, की तो स्नेह संपणार होता. पुन्हा सांधता येण्याच्या अवस्थेपलीकडे जाणार होता. रानडे माधवरावांशी आधी 'दिलखुलाशाने' बोलले असते तर त्यांना हे कदाचित कळले असते. पण तसे काही न करता माधवरावां-बरोबर जो गरिबीचा संसार करावा लागला असता त्या संसारासाठी त्यांनी तिचे मन तयार केले! म्हणजे त्यांच्या 'एकांगी लुडबुडीने' एकीकडे माधवरावांचे सोसायटीतील अस्तित्व संपले आणि दुसरीकडे जिवापाड जपलेला नि जोपासलेला एक अलौकिक स्नेहही नष्ट झाला! आपली ही दुहेरी हानी माधवरावांनी कधी स्पष्टपणे बोलून दाखविली नाही, त्या हानीमधल्या प्रथमार्धाचाच थोडाफार उल्लेख केला पण ही एकूण हानी त्यांच्या रोगाला कारण होती." हा उतारा थोडा लांबला, पण माधव-राव नाना रानड्यांवर आरोप करीत असता मी मात्र नाना रानडे यांना दोषमुक्त करीत आहे, या श्री. के. क्षीं.च्या पांडित्यामधील फोलपणा उघड करण्यासाठी विस्तारदोष पत्करूनही तो द्यावा लागला. माझ्या चरित्रग्रंथातही माधवरावांचे आरोप न नाकारता ते सहानुभूतीने मी समजून घेतले आहेत.

श्री. के. क्षीं.नी नाना रानड्यांवर आरोप करताना माझ्यावरही जे आरोप केले त्यांचा जरुरीपुरता समाचार येथवर मी घेतला. नाना रानड्यांचे वकीलपत्र मी घेतलेले नाही. त्यांच्यावरील आरोपांचा ते यथास्थित समाचार घेतील किंवा श्री. के. क्षीं.ना आजवर सोडून दिले त्याप्रमाणे सोडून देतील. पण त्यांच्यावर आरोप करण्याच्या भरात श्री. के. क्षीं.नी जेथे इतिहासच विकृत करून ठेवला आहे तेथे तो सुरळीत करण्याचा प्रयत्न करणे हे चरित्रकार म्हणून माझे कर्तव्य आहे, तेव्हा खालील विकृती दुरुस्त्यांसह मी मुद्दाम नोंदवून ठेवतो.

( १ ) "मूर्ख मित्रापेक्षा शहाणा शत्रू पुरवतो......" हा उतारा रामभाऊ मराठ्यांना लिहिलेल्या माधवरावांच्या एका पत्रातील उतारा म्हणून श्री. के. क्षी. देतात. पण तो उतारा मराठ्यांना लिहिलेल्या एकाच पत्रातील नाही. त्यात मराठ्यांना लिहिलेले एक पत्र नि गं. दे. खानोलकरांना लिहिलेले एक पत्र अशा दोन पत्रांची श्री. के. क्षीं.नी भेसळ केलेली आहे. ( पाहा, माधव जूलियन, गं. दे. खानोलकर, पृ. १४८–१४९ ).

( २ ) "फर्ग्युसन कॉलेजमधील माधवरावांच्या मित्रांनी या विरहाच्या कालखंडात माधवरावांनी वरदेशी कोणताही संबंध ठेवू नये असे सुचविले होते व माधवरावांनी ते मान्य केले होते."—असे श्री. के. क्षी. सांगतात, पण श्री. के. क्षी. हे कशाच्या आधारावर सांगतात ते उलगडत नाही. मी अभ्यासलेल्या साधनसामग्रीत, वरदेशी कोणताही संबंध न ठेवण्याचे माधवरावांनी मान्य केले होते, या विधानाला आधार


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मिळालेला नाही. उलट, पत्रव्यवहार करून माधवराव वरदेशी कायम संबंध ठेवत होते, हे उपलब्ध अस्सल पत्रांवरूनच सिद्ध झालेले आहे. मित्रांना एक आश्वासन देऊन खाजगीत दुसराच व्यवहार करण्याचा दुटप्पीपणा माधवरावांत होता, असे श्री. के. क्षींना म्हणावयाचे नसणार, हे मी गृहीत धरून चालतो.

( ३ ) " माधवरावांच्या आणि वरदाच्या मनात लग्नाची कल्पना नसताना, रानडे त्यांचे लग्न लावून देण्याच्या उद्योगाला लागले, हा आरोप स्वतः माधवरावांनी केलेला आहे..." असे श्री. के. क्षी. लिहितात; आणि १९४० पासून आपलाही तसाच तर्क होता अशी त्या लिहिण्याला जोड देतात. पण रानडे लग्न लावून देण्याच्या उद्योगाला लागले त्या वेळी वरदाच्या मनात लग्नाची कल्पना नव्हती, या म्हणण्यात तथ्य नाही. " माझे लग्न श्री. पटवर्धन यांशी व्हावे, तुम्ही दोघे पुन्हा प्रयत्न करून पाहा! मी तुमच्यावर जीव धरून आहे!"—अशा अर्थाचे पत्र वरदेने रानडे पतिपत्नीला पाठविल्याची नोंद गिरीशांनी केलेली आहे. ( स्वप्नभूमी, पृ. ८४ ). माझ्या चरित्रग्रंथात वरदाच आपण होऊन रानड्यांकडे गेली आणि तिने त्यांना मध्यस्थी करण्याची विनंती केली, हे तिच्या तत्कालीन पत्रांवरून मी दाखविले आहे. ( पृ. २३२ ते २३४ ). रानड्यांकडील बैठकीपूर्वी आपल्या मनातील विवाहाची इच्छा वरदेने विठ्ठलराव घाट्यांपाशी बोलून दाखविली होती, अशी विठ्ठलरावांची लेखी आठवण आहे. आणि रानड्यांकडील बैठकीत वरदेनेच माधवरावांकडे विवाहाची गोष्ट काढली अशी बैठकीला उपस्थित असणाऱ्या व्यक्तींची साक्ष आहे. ( माधव जूलियन, गं. दे. खानोलकर, पृ. १४६; लेखी आठवणी रानडे; तोंडी आठवणी, द. ल. गोखले ) स्वप्नभूमीच्या प्रस्तावनेत " गिरीशांना ते पत्र कधीच पाहावयास मिळाले नव्हते." अशी रानड्यांना आलेल्या वरदेच्या पत्राबद्दल खोड काढून गिरीशांच्या नोंदीला फाटा फोडण्याचा प्रयत्न श्री. के. क्षीं. नी केला आहे; पण त्यात फारसा दम नाही, हे त्यांचे त्यांनाही जाणवले असावे.

वरदेच्या मनात लग्नाची कल्पना नसताना रानड्यांनी लग्न लावून देण्याचा उद्योग केला, असा स्वतः माधवरावांचाही आरोप होता, असा क्षीरसागर निर्वाळा देतात; पण तो निर्वाळाही भ्रामक आहे. " वरदेचा माझ्याशी निव्वळ स्नेही असाच संबंध होता. निराळे काही ' अंडरस्टँडिंग ' ( भावी वधू-वर अशा तऱ्हेचे ) नव्हते. ही गोष्ट स्पष्ट दाखविणारे तिचे पत्र मजजवळ आहे."—असे माधवरावांनी म्हटले होते, हे खरे आहे. ( पाहा ' माधव जूलियन ', गं. दे. खानोलकर, पृ. १४९ ). पण नाना रानड्यांकडील भेटीसंबंधी वाद निघाला, तेव्हा आधीच्या काळातील परिस्थिती त्यात मांडली आहे. नंतरच्या काळात वरदेच्या मनात लग्नाची इच्छा उत्पन्न झाली हे माधवरावांनी केव्हाही अमान्य केलेले नाही.

( ४ ) आपले पूर्वग्रह सोडायला श्री. के. क्षी. कसे तयार नाहीत आणि पूर्वग्रहांना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चिकटून राहता यावे म्हणून वास्तव सत्यालाही ते गुपचूप कशी मुरड घालतात, ते पुढील उताऱ्यात सहज दिसेल. ते म्हणतात, " रानड्यांचेकडील बैठकीत दोन गोष्टी चमत्कारिक घडल्या. एक म्हणजे वरदाने माधवरावांशी विवाह करण्याची इच्छा चार-चौघांसमक्ष व्यक्त केली. त्याआधी वांद्र्याच्या ' पुलिनावर ' वरदा माधवरावांबरोबर फिरावयास गेली होती. तेथे तिने विवाहाची कल्पना माधवरावांसमोर मांडल्याचे नमूद नाही. म्हणजे चारचौघांसमोरच तो विषय काढून माधवरावांवर एक प्रकारे दडपण आणण्याचा तर तिला कोणी सल्ला दिला नव्हता ? " वरदेच्या मनात नाना रानडे यांनी लग्नाची कल्पना भरवून दिली, ही श्री. के. क्षीं. ची आवडती ' थिअरी ' आहे, त्या थिअरीच्या दिशेने हा उतारा ते वळवतात, हे उघड दिसते. पण त्यासाठी जुहूच्या ( वांद्र्याच्या नव्हे ) पुलिनावरील फिरणे नि चारचौघांसमक्ष झालेले बोलणे यांचे पौर्वापर्य त्यांनी कसे हातोहात उलटे करून टाकले आहे ! गिरीशांसारखे पूर्वचरित्रकार नि प्रत्यक्ष संबंधित व्यक्ती असे सांगतात, की चारचौघांसमक्ष जे बोलणे झाले ते आधी झाले नि जुहूच्या पुलिनावरील फिरणे नंतर झाले. पण नाना रानड्यांनी माधव-रावांवर दडपण आणण्याचा सल्ला वरदेला दिला होता, हा निष्कर्ष निघावा म्हणून, श्री. के. क्षीं.नी इतिहास बदलून घेतला आहे !

" रानड्यांची दोषमुक्तता हा प्रश्न चरित्रकार गोखले यांच्या लेखात मुख्य मान-लेला नाही. मुख्य प्रश्न माधवरावांच्या वरदा-स्नेहाच्या स्वरूपासंबंधी आहे "—असे श्री. के. क्षी. एके ठिकाणी म्हणतात, आणि तोच प्रश्न माझ्या लेखात नि चरित्रग्रंथात खरोखर महत्त्वाचा आहे. पण त्या महत्त्वाच्या प्रश्नावर श्री. के. क्षीं.जवळ नवीन काहीही सांगण्यासारखे नाही. प्लेटॉनिक प्रेम आणि माधवराव या विषयावर जी अनेक प्रवचने त्यांनी मराठी वाचकांना आजवर पुनःपुन्हा ऐकवली त्यांतलेच काही खंड आपल्या या लेखात त्यांनी म. सा. पत्रिकेच्या वाचकांना ( आणि पर्यायाने मला) पुन्हा एकदा ऐकवले आहेत. वास्तविक पाहता, चरित्रलेखनाला हात घालण्यापूर्वी जशी इतर माहितगार व्यक्तींशी मी चर्चा केली होती, तशीच सविस्तर चर्चा श्री.के. क्षी. यांच्याशीही केली होती. त्या चर्चेची टिपणे काढून ती त्यांच्याकडून मी मान्य करून घेतली होती. आणि त्यांचे संबंधित लिखाणही गोळा करून वाचले होते. माधवरावांच्या वरदाविषयक भावनेचा जो उलगडा प्लेटॉनिक प्रेमाच्या अंगाने मी केला आहे तो विठ्ठलराव घाटे वगैरे अन्य जाणकार व्यक्तींपेक्षा श्री. के. क्षीं. च्या मताशी अधिक जुळणारा आहे. तेव्हा, माझ्या लेखनात श्री. के. क्षीं.च्या मतापेक्षा जो थोडफार वेगळेपणा दिसतो त्याचा श्री. के. क्षीं.नी मोकळ्या मनाने विचार करायला पाहिजे होता. त्यांच्या मताला पुष्टी देणारे आधार क्वचित मला मिळाले नसतील, क्वचित विरुद्ध आधार मला आढळले असतील, क्वचित भिन्न नि प्रबळ युक्तिवाद मला सुचले असतील, वगैरे शक्यता लक्षात घेऊन त्यांनी स्वतःच्या मताची उजळणी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

करण्याचीही उदारता दाखवायला हवी होती. पण तसे काही न करता, त्यांचे मत मी लक्षातच घेतलेले नाही किंवा ते मला समजलेलेच नाही, अशी समजूत करून घेऊन ते जुनीच मते या लेखात पुन्हा पेश करतात. त्यांनी काही नवा लक्षणीय युक्तिवाद केला असता, किंवा नवी लक्षणीय माहिती उजेडात आणली असती तर मला आनंद झाला असता नि स्वागतशील वृत्तीने मी त्यांना सामोरा गेलो असतो.

'रसिक'मधील माझ्या लेखात नि माझ्या चरित्रग्रंथात, वरदेवर माधवरावांचे मन उत्कटत्वाने जडल्याच्या खुणा मी शोधल्या आहेत आणि मन उत्कटत्वाने जडल्याचा निःशंक प्रत्यय कोणत्या खुणेने मला आला, ते सांगितले आहे. पूर्वी प्रा. वैद्यांची बहीण माधवरावांच्या मनात फार भरली होती आणि तिचे स्थळ पुढे–मागे आपल्याला लाभेल या आशेवर एका अनुरूप नि पसंत विधवेला त्यांनी नकार दिला होता. पण वरदेशी त्यांचा परिचय झाल्यावर, प्रा. वैद्य जेव्हा बहिणीसाठी विचारणा करण्याकरिता नेमके त्यांच्याकडे आले, तेव्हा मात्र त्यांनी प्रा. वैद्यांना नकार दिला. हा नकार म्हणजे त्यांचे मन वरदेवर उत्कटत्वाने जडल्याची खूण होय, असे मी म्हटले आहे. अत्यंत आकर्षक वस्तू दिसली की कमी आकर्षक वस्तू मनुष्य सोडतो, तसा प्रकार येथे झाला, असा यात माझा साधा युक्तिवाद होता. पण श्री. के. क्षीं. नी तो साधा युक्तिवाद समजावून न घेता, 'मी लग्न न करण्याचा निर्णय' आणि 'प्लेटॉनिक लव्ह' यांची गाठ बांधली, असा दूरान्वित निष्कर्ष काढला आहे. "प्लेटॉनिक लव्हचा अनुभव घेणाऱ्या व्यक्तीला सर्वसामान्य स्वरूपाचा विवाह–विचार सोडावा लागतो, अशी चरित्रकार गोखले यांची कल्पना दिसते." अशी कल्पना ते पुढे लढवतात आणि डान्टे–बिॲट्रिस नि शेली–कॉन्व्हेंटगर्ल यांचे आपले आवडते पुराण सांगून टाकतात. पण प्लेटॉनिक प्रेमाचे काही धडे (म्हणजे थिअरी लेसन्स) मी त्यांच्याकडून घेतलेले असताना प्लेटॉनिक प्रेमवाल्याला विवाहाचा विचार सोडावाच लागतो अशी माझी कल्पना आहे असे त्यांना का वाटावे? तशी कल्पना मी केलेली नाही; आणि तरीही प्रा. वैद्यांच्या बहिणीला दिलेला नकार नि वरदेवर जडलेले उत्कट प्रेम यांत दृढ संबंध आहे, असे मला वाटते. माझ्या चरित्रग्रंथात पृ. १९० वर खुद्द माधवरावांच्या हृदयाचा कानोसा मी घेतला आहे. तो वाचण्याची तसदी श्री. के. क्षी. पुन्हा एकदा घेतील, तर मी जोडलेल्या संबंधाला माधवरावांचाही काही आधार आहे हे त्यांच्या लक्षात येईल. अर्थात, हे उदाहरण घेऊन "गोखल्यांना माधवरावांच्या चरित्राचे चिंतन करता करता, प्लेटॉनिक लव्हचे जे दर्शन झाले, ते तितकेसे वास्तव आणि स्वच्छ नाही" असा जो शेरा श्री. के. क्षी. मारतात तो त्या ठिकाणी निरर्थक ठरतो.

प्लेटॉनिक प्रेमाचे मला झालेले दर्शन कसे वास्तव नि स्वच्छ नाही, हे स्पष्ट करताना श्री. के. क्षी. आणखीही काही गोष्टी सांगतात. त्यांच्या मते "प्लेटॉनिक प्रेमाचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विषय झालेली स्त्री प्रेमिकाच्या ध्येयवादाला आणि दिवास्वप्नांना उत्तेजित करण्याचे कार्य करते " हे माझ्या लक्षात आलेले नाही; आणि " वरदा त्यांना ( म्हणजे माधवरावांना ) प्रिय झाली होती, ती केवळ एक मोहक, धीट तरुणी म्हणून नव्हे, तर एक दुर्मिळ सामाजिक नमुना म्हणूनही प्रिय झाली होती...आपण...दंतकथांचा विषय झालो तर खंत न वाळगणारी ती मुलगी होती. थोडक्यात म्हणजे ती ' स्त्रियांतील माधवराव ' होती. "—हेही मला समजलेले नाही. पण श्री. के. क्षीं. नी या गोष्टी ' स्वप्नभूमी 'च्या प्रस्तावनेत किंवा अन्यत्र या पूर्वी सांगितलेल्या आहेत, आणि त्यांच्यामधील ग्राह्यांश माझ्या चरित्रग्रंथात मी स्वीकारलेला आहे. श्री. के. क्षीं. नी हा लेख लिहिण्यापूर्वी माझा चरित्रग्रंथ पुन्हा नुसता चाळला असता तरी त्यांच्या हे लक्षात यायला हरकत नव्हती. ज्या ' तेथे चल राणी ' कवितेचा उल्लेख ते करतात त्याच कवितेचा आधार मी घेतला आहे आणि म्हटले आहे की " माधवरावांना वरदेविषयी जे...सौंदर्यात्मक...आकर्षण होते त्या आकर्षणाचे रूपांतर त्यांच्या कल्पकतेने...ध्येयात्मक आकर्षणात केलेले दिसते. ध्येयमार्गावरची एकनिष्ठ सहचरी म्हणून तिचा हात, मनातल्या मनात, त्यांनी आपल्या हातात घेतला होता. " ( पृ. २०१ ). ' रसिक 'मधील लेखात मी म्हटले आहे, की " आपले उदात्त जीवनाचे ध्येय वरदेने दिलेल्या मनःप्रसादामुळे आपण साध्य करू, असे कल्पनाचित्र ते रंगवीत बसत. त्यांच्या मनोराज्यात त्यांना वरदा बौद्धिक नि भावनिक साथ देत होती आणि दोघेही हातात हात घालून एका उत्तुंग प्रकाशशिखराकडे निघाली होती. " प्लेटॉनिक प्रेमाचा विषय झालेल्या स्त्रीने प्रेमिकाच्या ध्येयवादाला नि दिवास्वप्नांना उत्तेजित केल्याचेच हे वर्णन आहे. पण श्री. के. क्षी. तिकडे दुर्लक्ष करतात. ' वरदा स्त्रियांतील माधवराव होती नि दुर्मिळ सामाजिक नमुना म्हणून माधवरावांना प्रिय झालेली होती ' अशा अर्थाचे श्री. के. क्षीं.चे जे प्रतिपादन आहे त्याचा प्रकार जवळ–जवळ असाच आहे. वरदा ही स्त्रियांतील माधवराव होती वगैरे वर्णन ऐटबाज दिसले तरी अवास्तव आहे; थोडा धिटुकलेपणा दाखविण्याखेरीज वरदेने समाजाला धुतकारल्याचा किंवा समाजाशी झुंज दिल्याचा पुरावा उपलब्ध नाही. तेव्हा माधवरावांच्या प्लेटॉनिक प्रेमप्रकरणात तिचे तसले खोटे चित्र मी रंगवले नाही, हे मला मान्य आहे. पण ' दुर्मिळ सामाजिक नमुना म्हणूनही माधवरावांना ती प्रिय झालेली होती. ' हे मी नाकारलेले नाही. तिच्यातील वेगळेपणा नि त्या वेगळेपणाविषयी माधवरावांना वाटलेले आकर्षण चरित्राच्या माध्यमातून जसे नि जेवढे सांगणे योग्य होते तसे नि तेवढे माझ्या चरित्रग्रंथात मी सांगितलेले आहे. श्री. के. क्षी. तिकडे डोळे उघडून बघत नाहीत त्याला मी काय करणार ?

श्री. के. क्षीं. ना प्लेटॉनिक प्रेमाचेच एवढे प्रेम आहे की त्या प्रेमाच्या भरात ' रसिक 'मधील माझ्या लेखाचा भरपूर विपर्यास त्यांनी केला आहे आणि त्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रेमावर बोलण्याची आपली हौस भागवून घेतली आहे. 'रसिक'मधील लेखात माझे वरदाप्रकरणाचे आकलन टप्प्याटप्प्याने कसे विकसित झाले ते प्रांजळपणे मी सांगितले आहे. पण आधीच्या टप्प्यावरची माझी मते नि समजुती पुढे बदलल्या असल्या तरी त्याच अंतिम समजून श्री. के. क्षीं. नी माझ्यावर टीका केली आहे ! उदाहरणार्थ, वरदेविषयीच्या स्नेहाबद्दल माधवरावांना त्यांच्या विरोधकांनी दोषी ठरवले तरी रँग्लर परांजप्यांसारख्या तटस्थ, समतोल नि पुरोगामी व्यक्तींनीही दोषी का ठरवावे ? नाना रानड्यांसारख्या सुधारक मित्रांनीही त्यांच्यावर ठपका का ठेवावा ?—असा प्रश्न एका टप्प्यावर मी उपस्थित केला होता, नि त्याचे उत्तर पुढच्या एका टप्प्यावर शोधूनही काढले होते. पण आधीच्या टप्प्यावरील माझा तो प्रश्न पकडून श्री. के. क्षीं.-नी त्यावर अशी मल्लीनाथी केली आहे, की "गोखल्यांच्या म्हणण्याचा मतलब असा की सनातनी लोकांना माधवरावांचे वर्तन गैर वाटले तरी सुधारक मित्रांनाही ज्याअर्थी ते योग्य वाटले नाही, त्याअर्थी त्या वर्तनातच काही दोष असला पाहिजे." येथे माझा जो मतलब नाही तो माझा म्हणून सांगण्यात श्री. के. क्षीं. चा मतलबी-पणा नाही काय ? तो मतलबीपणा करून 'व्यवहारी सुधारक ','रोमँटिक सुधारक ', 'जॉन ब्रँडिस ' वगैरे आपल्या आवडत्या विषयांवर पुन्हा लिहिण्याची संधी त्यांनी साधली आहे. आकलनाच्या आणखी एका टप्प्यावर, माधवरावांची वरदेविषयीची स्नेहभावना उथळ होती की उत्कट होती, ते मी तपासून बघत होतो. त्या वेळी, वरदेने लग्नाची मागणी केल्यावर माधवरावांना 'वीट आला' असे जे वाटले ते त्यांच्या स्नेहाच्या अल्पत्वाचेच द्योतक नाही का, असा प्रश्न मी स्वतःला विचारला होता. पुढे त्या प्रश्नाचे नकारार्थी उत्तरही मी दिले होते. पण माझा अगोदरचा प्रश्न नेमका उचलून श्री. के. क्षीं. नी माझ्यावर सरबत्ती सोडली आहे ! सरबत्ती सोडून हॅम्लेट, ऑफेलिया वगैरे ठेवणीतल्या विषयांवर बोलण्याचा त्यांनी मोका साधला आहे हे सांगणे नलगे ! आपला प्रेमविषय जसा स्वतःला समजला तसा दुसऱ्याला समजणे शक्यच नाही, अशी प्रेमिकांची म्हणे समजूत असते. प्लेटॉनिक प्रेम या प्रेमविषया-बद्दल श्री. के. क्षीं. ची तशीच स्थिती झालेली दिसते. एके ठिकाणी (बहुधा अगदी नाइलाजाने) ते मला असे प्रशस्ति-पत्र देतात, की माधवरावांच्या वरदा-स्नेहाचा प्रश्न मी मोठ्या तन्मयतेने आणि कुशलतेने सोडविला आहे. पण सगळ्या लेखात त्या प्रशस्ति-पत्राला अगदी विसंगत असाच सूर त्यांनी लावला आहे. एकदा तर ते म्हणतात, की "वरदा नायडू आणि माधवराव यांचे प्रेम कोणत्या जातीचे होते... हे जेथे माधवरावांच्या पंथबंधूंना (रविकिरणांना) कळले नाही तेथे माधवरावांच्या नंतरच्या पिढीत जन्माला येणाऱ्या व प्लेटॉनिक लव्हला थोतांड मानणाऱ्या चरित्र-कारांना कितपत कळणार ?" या म्हणण्यामुळे आपलेच प्रशस्तिपत्र खोटे ठरते याचेही भान त्यांना राहात नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# श्री. दा. पानवलकर यांची
# ' कमाई '-कथा आणि तिची निर्मिति-प्रक्रिया

## १
## कमाई : श्री. दा. पानवलकर

पावर खलास होत आलेली बॅटरी एका हातात, खाली दोन विती टोकाला तार करकचून आवळलेली, काठी दुसऱ्या हातात आणि पाठीवर खाली गोणी. दत्ताराम रातपाळीला चुलत्याच्या झोपड्याबाहेर पडला.

" दत्त्या, सकाळी खाली हातनं इलंस तर फाकवीन तुका ! " झोपडीचं पत्र्याचं झडप लाफा मारल्यासारखं बंद करून चुलता कंट्री ठोकत चुलतीला झुलवत बसला. अखंड रात हेच.

मंगळुरी कौलाराच्या झोपड्यातला डॉक्टर गोमाशे, आर. यम्. पी. हातात चामड्याची बॅग घेऊन समोरनं येताना दिसला. फसफसून वाहणाऱ्या मधल्या गटारीवरनं त्यानं टांग टाकली. दत्ताराम थांबला. त्याची जड जीभ घोटाळली. तवर " व्हिजिटला गेलोतो " म्हणून डॉक्टर त्याच्या अंगावरनं गेला. झोपड्यामधल्या गल्लीतनं पाटलोण सावरत चालला. कोपऱ्यावरलं कुत्रं न भुंकता नाक वर करून डॉ. गोमाशेच्या पाठोपाठ गेलं.

दत्त्यानं वाकून पिंढरी खाजवली. चार दिवस अंगाला पाणी भेटलं नव्हतं. त्याला जांभई आली. खालमुंडीनं तो रस्ते, गल्ल्या, बोळकांडी धुंडाळत निघाला.

दोन बिल्डिंगमधल्या गल्लीत तो नासकी कोमट हवा हुंगत चालला. रस्त्यावरच्या लाइटचा पट्टा त्याच्या घोट्यापर्यंत आला होता. पायाच्या बोटामधनं राड किचकिचली. गटारीचा कंगोरा घोट्याला घासला. थांबून राहला जरा. बॅटरी मारली. लाइट पुकपुकला. सांडपाण्याच्या किनाऱ्याला ओला सोट उंदीर पुढल्या पायात चमड्याचा तुकडा चुकचूक कुतरडत बसला होता. शेपटी खुशाल ठेवली होती. फिकुटल्या अंधारात त्याचे डोळे काळ्या मण्यासारखे लुकलुकले. दत्त्या अंदाजानं पुढं झाला. हातची काठी उजव्या डोळ्याच्या कोनानं उचलली. बॅटरीच्या फाकलेल्या लाइटमधे डावा डोळा अर्धा लावून, हलक्या हातानं नेमका फटका मारला. चिर्रकन उंदीर उडाला. तोंडातनं दोनचार लाल ठिपके टाकत पडला. लडबडला. उलथा होऊन

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गपचीप झाला. दत्त्यानं शेपटीकडनं उचलून गोणीत भरला. भोनी झाली पहिल्या फटक्यात. तसाच तो गल्लीमधनं पुढं चालत राहिला. लाइटमधे आडवं आलेलं मांजर गार नजर चमकावून पळालं. त्यानं समोरच्या पाईपावर बॅटरी मारली. वर सरकवत नेली. खट्ट्या लाड्डू वरनं उतरताना दिसला. तलम गुब्ब. शेपूट करंगळीएवढं जाड. टोकाकडं दाभणी. टवटवीत पाकळीसारख्या कानाखालची चकचकीत नजर. खट्ट्या पाइपाच्या कोनावर येऊन थांबला. च्रुकच्रुक करत. सावध उतरला. गटारीकडेला आला. समोर आपला मोदक्या मालक असल्यासारख्या जरा बुडावर बसला. नमस्कार केल्यागत आपल्या निमुळत्या तोंडावरनं पुढले पाय चटक्यानं फिरवलं. च्रुक केलं.

फोकस मारून दत्त्या बेतानं पुढं झाला. जिभेच्या शेंड्यावरनं नेम धरून त्यानं फटका मारला. खट्ट्या लाड्डू टर्र करून फिरला. काठीवरनं वर आला अन् तिरकी उडी मारून पाइपावर चढला. दत्त्यानं लगोलग दुसरा तडाखा हाणला. खट्ट्या खालवर येडबडला. तिसऱ्या फटक्यासरशी खाकी चड्डीवर लाल शिंतोडा उडाला. खट्ट्या उलटापालटा झाला. पाय उडवत निपचित पडला चीव करून.

रात्रभर दत्त्यानं असा सपाटा लावला होता. त्याच्या हातालाही मोप गुण. दर दिवसाला पंचवीस नग वार्डातल्या मलेरिया खात्यात उंदीरमास्तराला दिले की लागली हाजरी दिवसाची. महिन्यापोटी तीनशे रुपये भेटायला बांधा नाय. पंचविसाचे चोवीस नाही चालायचे. दत्त्या तर गोण भरभरून उंदरं मारायचा अखंड रात. ताजे खट्टे उंदीर. गिंती करून घ्या बोटं घालून.

रातपाळीवाल्याला गॅसपावडर वापरायची मना. दिवसपाळीवाल्याला परमिशन. येडक्याबट्टूक दिवसपाळीवाल्याची पावडर गूल करायचा. बिळात पावडर सोडली की गॅसनं एका दमात चारपाच उंदरं बाहेर येऊन तडफडायची. तट्ट फुगून मरायची. मग डोचकी ठेचायची. अशी उंदरं गोण भरून मास्तरापुढं टेवायची ओतायची रातीची कमाई म्हणून. मास्तर एका डोळ्याचा. तो काय तसा ढिल्ला सोडतोय. त्यानं येडक्याला गांड भरून दाटला. वरती खाडा लावला तो अल्लग. येडक्याला गॅसपावडर कुणी दिली म्हणून मास्तर दिवसपाळीवाल्यांच्या मागं पाठ धरून लागला.

गॅसपावडरीवरचा म्हादग्या आडकला. सजा म्हणून मास्तरानं त्याला दिवसाच्या कामावरनं काढून रातपाळीला टाकला. गॅसपावडर काढून घेतली आन् त्याच्या हातात काठी देऊन कंट्रीच्या तोंडानं टरकावला, "मार तुज्या आयला रातभर काठीनं!" म्हादग्याच्या हातात रातपाळीची काठी आली. येडक्याची बिगर तकलिफीची कमाई गेली. पण आक्करमाश्या येडक्या दत्त्याच्या गोणीवर डोळा टेवून असायचा. दत्त्या वार्डातल्या खात्यात शिरला की येडक्या टपकलाच. दत्त्य

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

रातभारी तंगडून गेंगणलेला. नीट गिनाय येत नाही. त्याच्या हाजरीचे पंचवीस नग बाजूला टाकून वरच्या सरस पंचविसानं वेडस्या आपली हाजरी लावायचा. मागो-माग चुलता झोल खात यायचा. स्वतःचा एक वाटा काढून घ्यायचा. चुलतीचा आणखी अल्लग ओढायचा की दत्त्याची गोण उलटीपालटी उस्कटून खाली. महिन्याकाठी चुलता मोफतमध्ये घरी बसून पाचसहाशे काढायचा. दत्त्या नुस्तंच तोंड फाकून बसायचा.

एकदा वेडक्याच्या मगजमधे आलं. तो दत्त्याला कोपर ढोसून म्हणाला, " चुलता तुझी सलंग मारतोय !"

जड जीभ. च्यॅक-च्यॅक करून दत्त्यानं मुंडी हलवली फकस्त.

दूधवाली गाडी जाळीतल्या बाटल्या खडखडावत त्याच्यापुढला रोड पेटवून गेली. चाकं चुकवून निबर शेपटीचे दोन ढमाले त्याच्याकडं आले. पायाजवळ घोटाळले किल्ली दिल्यागत. भगवान तरी देतंय म्हणजे किती !—गोणी फाटस्तंवर ! एकाला दत्त्यानं लवचिक तडाख्यानं टिपला. दुसरा ढमाल्या स्वतःभोवती फिरला. च्र्क केलं. चटकन रस्त्याच्या सांदीकडं सरकला. त्याला मधेच ठेचला. दत्त्यानं शेपटी धरून उचलला. तोंडातनं टिप टिप ठिबकलं. तसाच गोणीत टाकला. गोण अर्धीजादा भरली.

पिढऱ्या फुटायला आल्या. गोणी डोक्यावर घेतली. बॅटरी खिशात सरकवली. आणि तो माघारी फिरला. खालमुंडीनं पोस्टाच्या पेटीकडं आला. गोण टेकवून ठेवली. रातीच्या सात घंट्याच्या हाणामारीनं डोळे फुटून जळत होते. गोणीवर माथं टेकलं. फुटलेल्या उंदराच्या वासातच पापण्या मिटून राहिल्या.

पानाच्या गादीवर काताचा तांब्या ठणठणला. चमड्यागत वातड खाकी सदऱ्यातली पाठ उलट्या हातानं ओरबाडून तो उठून उभा राहिला. चेपून बोऽबोऽ जांभई दिली. तोंड सैल पडलं. गादीकडं गेला. कल बघून गादीवाल्याला बोलला, " जाऊन येतो. गोणीवर ध्यान ठेव."

गादीवाल्यानं त्यांच्याकडं समजून पाहिलं.

तोंडबिंड धुऊन दत्त्या आला. गादीवाला खाली उतरला. दत्त्यानं गादी झटकून साफ केली. पितळी तांब्या दांडीसकट घासून लखलख केला. वर चढून लेबलं बघितली. सिग्रेटी नमुन्यानं लावल्या. पानाच्या चळती झटकून नीट केल्या. पाणी घालून कात फेसून कोळला. फळीवरची चुन्याची बोटं ओल्या फडक्यानं साफ केली. लोंबत्या बालडीतलं पाणी ओतून पळत जाऊन नळावरनं ताजं आणलं. गादीवाला तंवर टट्टी-पिसाब करून आला. साफसूफ बघून गादीवर चढला.

मग दत्त्या आपल्या गोणीकडं आला. ती तशीच शाबूत होती. डोईवर उचलून घेतली. आणि तो हाजरी लावायला निघाला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तो वार्डातल्या खात्यात आला. तिथं चुलता पहिला येऊन छातीवर हाताची घडी घालून बसला होता. बेडक्या पण. गॅसपावडरीच्या लफड्यावरनं म्हादग्याला रात-पाळीला ट्रान्सफर केला होता. गोणी उतरावयाला त्यानं हात लावला. मग कोपऱ्यात जाऊन बसला. त्याची बट आता बंद पडली होती. दीसपाळी तुटल्यापासनं.

दत्त्यानं उंदीरमास्तरापुढं गोण उलटी केली. मुरगाळलेल्या उंदरांचा बदाबदा ढीग पडला. शेपट्या मोजून मास्तरानं बरोब्बर शंभर नग मोजले. चुलता सटक्यानं पुढं झाला. मास्तराबरोबर त्यानं थोडी वार्ता केली. तंवर बेडक्यानं पुढे होऊन चार वाटे लावले. चुलतीचा धरून चुलत्यानं आपल्याकडे दोन ओढले. बेडक्यानं आपला अलग काढला. चुलत्याला तो समजून पहिल्या धारेची बिनबोभाट पोचवायचा झोपड्यात. दोघं मतलेले. दत्त्या मधे लटकलेला. तो आपल्या वाट्याला आलेल्या उंदराच्या तोंडाकडं बघत बसला. मास्तरानं बोंब मारली तेव्हा उठला.

बाकीच्या उंदीरवाल्यांना अजब वाटायचं. आखंड रातभर टांगा फाकंस्तवर फिरून दहापंधरा उंदरं भेटायची मारामार, तिथं दत्त्या झवं गोणी भरून गच उंदरं कुटनं आणतंय?— उमग पडायची नाही. दर दिवस चार वाटे पडायचे. कमाई मोप.

दत्त्याला हिशेबातलं झाट पण कळायचं नाही. एकदम भोट. दर महिन्याच्या पहिल्या तारखेला चुलता वार्ड ऑफिसात टेवलेला. पुरा हिशेब टेकवताना उंदीर-मास्तराचा हात अवघडायचा. हातात पैसे पडंस्तवर चुलता टक लावून खडा राह्यचा. हातात नोटा पडल्या की झालं. उकळी फुटायची. कोपऱ्यात भिंतीला चिकटून बसलेल्या दत्त्याचं बखोटं धरून म्हणायचा, "चला दत्ताराम, उठा." आन् आखंड रस्ताभर उंदराच्या कमाईचा हिशेब सांगत त्याला झोपड्याकडं आणायचा. आत शिरायच्या आधी वर तोंडानं बोलायचा, "दत्त्या झवं, माका खोटा पसंत नाय. हिसाब बराबर हवा." चुलता शुद्धीवर असला म्हणजे सरळ साफ बोलायचा.

शंकरविलास हिंदू हॉटेलात कोपऱ्यातल्या बाकड्यावर दत्ताराम पाव-उसळ चावत बसला होता. समोरच्या तसबिरीत शंकरभगवानाच्या एका मांडीवर गणपतिबाला आन् दुसरीवर पार्वतीमाय. पायथ्याला झवं उंदीर हायेच. दत्त्यानं दोन ग्लास पाणी ढोसलंन. उठला. गल्ल्यावर पैसे देताना हॉटेलवाला हसून हमेशा त्याला टोकायचा, "दत्त्या, लगीन केवा करतंस? वडे कधी देतंस?" या सवालानं दत्त्या गुल्लू व्हायचं. परवा दोन टाकीच्या मोहल्ल्यातल्या गटारीकडेनं जाताना बॅटरी मारली होती. दोन उंदरं चिकटलेली गच. चिं चिं चिं चिं...कुई कुई कुई. दत्त्यानं च्यॅक, च्यॅक फेलं. उगारलेली काठी परत खांद्यावर ठेवली. गोणी सावरली. बॅटरीचं बटण सोडून तो पिघळत चालला. नागपाड्याला पोरगी बघितली होती. सगळी म्हणाली म्हणून गेला. पोरगी हिरव्या बेडकीगत गोल गोल टुं.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" ओ नवरदेव, तुमाला काय वेशनविशन नाय ना ? " पंचायतीतल्या एकानं आंगठा तोंडाकडे नेत सवाल केला होता.

" च्यॅक-च्यॅक. "

" लगीन आपखुशीनं करतंस ? "

तोंड फाकून तो एकटक झाला होता.

" ओ दत्तारामशेट, मुलगी पसंत हाये ? "

च्यॅक-च्यॅक करून त्यानं मुंडी वरती खालती केली.

बाजूला बसलेल्या म्हादग्यानं कोपर हाणलं. " घोड्याला हाकलल्यागत काय करतंस ? हो म्हन. हो म्हन. "

पंचायत मंडळी लय हसली.

" दत्ताराम, कुकू लावा."

दत्तारामनं समोरच्या कुंकवाच्या ताटात पाची बोटं बुडवून पोरीच्या कपाळावर घसाकन ओढली. पोरगी अखंड डगडगली. उलीसं हसली. दत्याला गचकल्यागत झालं. तिचा म्हातारा किंचाळला. पोरीच्या लालभडक सारवलेल्या कपाळाकडं बघत तर साखरपुडा फिसकला.

पोरीच्या गोल सयीनं त्याला हुळहुळलं. हाताला चाळा सुचला.

" आज फक्स्त पन्नासच नग का ? " करून चुलत्यानं अर्ध्या लुगड्यातल्या चुलतीसमोर दत्याला सकाळीच उभ्याउभी बुकलला. दत्या कोपऱ्यात जाऊन विव्हळला. चुलतीवरली नजर गोगलगाईच्या चिकानं सरकली.

" मायझवणीच्या, बगतंस काय ? आज हिशेबातली दिडकी भेटुची नाय तुका ! मर उपाशी ! " वर आणखी चुलत्यानं दोन झटके लावले.

चुलतीची नजर चुकवत. तो कोपरा सोडून काठीच्या झाडूजवळ जाऊन सरकून बसला. सद्र्याच्या खोळानं तोंड पुसून चीपचाप राहिला.

चुलती पदर घेऊन उठली. त्याच्याकडं आली. त्याच्या डोईवरच्या झिज्यांतून बोटं फिरवली. आंजारलं. सरशी त्याचा उमाळा तिच्या पदरात दबून राहिला.

वरच्या किलतानातनं उतरलेला कोवळ्या उन्हाचा शिपला मधन सरकला.

चुलत्यानं उशीखालचा ट्रँझिस्टर काढला. मागंपुढं करून झोपड्याच्या कानठळ्या उठवल्या. चुलतीला चा टाकायला सांगितली.

" खाली करा. " कानात बोटं घालून चुलतीनं तोंड केलं.

" चा कुठाय ? " चुलता किंचाळला.

कानातली बोटं काढून चुलती पुढे गेली तिनं कळ फिरवून जरा खाली केली. झोपडी सुरात आली. चुलत्यानं तिच्या पाठीवर विडीच्या धुराची करडी नळी फुंकरली. दत्या धुराच्या नळीकडं बघत बसला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विगरकामाचा असला की दत्त्या तोंड फाकून नुस्तं बघत राह्यचा एका कोपऱ्यातनं.

चुलतीनं बत्ती लावली. सैल अंगानं झोपडीभर पाहिलं. पडल्यापडल्या चुलत्यानं तिच्याकडं काडीपेटी फेकली.

दत्तराम बसल्या जागी पेंगळून कलंडला. घुरघुरायला लागला. मधेच अंगाची मोड करून त्यानं मिटल्या डोळ्यानं टांग लांबवली. चड्डीच्या कोनाड्यात हात घालून मांडी खाजवली. डोळे उघडले तेव्हा झोपडीवर उन्हं तापली होती. घामानं अंगावरचा सद्रा चमड्यासारखा चिकटला होता.

भंगारात टाकायला झालेल्या समोरच्या टिपाआड चुलती अंगभर खळखळून पाणी घेत होती. अंगावरलं पाणी निथळून मोरीतनं बाहेर पडताना पोकळ आवाज करत होतं. थेंबाचा आवाज संपला की पुनः अंगावरनं भडभडा पाणी करत चुलतीनं लय टाइम घेतला. त्याला उठावंसं वाटेना. दर दिवस रात्री उंदरं मारून अंगाचा खेकडा झाला होता. वाशाकडं बघत तो मिणमिणत पडला.

जरीच्या किनारीचं पोपटी लुगडं लावत चुलती मधल्या टिपावरनं पाय उचलून आली. चुकल्यागत नजर गेली. दत्त्यानं खोपटाच्या भिंतीकडं कुशी केली. भिंतीला टेकून भुईवर आरसा होता. त्यात चुलती मधोमध निश्चळ आली. पडल्यापडल्या त्यानं दोन्ही गुडघे पोटापर्यंत ओढून घेतले. हाताचे पंजे एकमेकांत गुंतवून आपल्या मांड्यात खुपसले. चुलतीच्या लुगड्याचा वास त्याच्या पाठीशी आला. त्याचं काळं थरकलं. लय सरसरून आली. आरशात आता तिचा थेट मुखडा दिसला. कपाळावरच्या हिरव्या फुलावर तिनं कोरून लाल टिकली केली. त्यानं कुशी वळवली. चुलती डोळ्यांच्या आतमध्ये आली. तिनं टिकलीच्या बाजूची ओली कणी पदराच्या टोकानं घासून पुसली. आधीची ती जरा गोमटी, आता आटीव दिसायला लागली.

चुलतीनं स्टो पेटवला. पाणी ठेवलं.

दत्त्या उठून बसला तोंड फाकून.

चुलता बाहेरनं खरवडून ओरडला. झोपडीच्या तोंडाशी हेलपाटला. तसाच आत आला. दत्त्याकडं बारीक डोळ्यानं बघत तो एकीकडं चुलतीच्या आयचा घो झाला थोडा वेळ. त्यासरशी चुलती खुशीगत चवताळली. "पिऊन येता ते येता, आन् घरात येऊन गाळी घालता आवशी माज्या. मीच एकली पुरत नाय काय?"

तंवर चुलता दत्त्यावर बोंबाटला, "जा पटकन. शेगटीचा म्हावरा आन बाजारातला."

चुलत्यानं पाटलोणीच्या कमरेवरच्या घोळात खुपसलेली बाटली काढली. तोंडासमोर धरून बघत तो खाटल्यावर बसला.

"गो, इकडं बघ."

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" काऽय ? " स्टोला पंप मारत चुलती खिसकली.

" दांड्याचा माल. "

" ह्या तर तुमचा दर दिवसाचाच हां. "

" नाय. लाल पेरूचा पेशल माल आणलेला हां. "

" पी आता आणलंस तर. आन माका रिकामा टाकून तिकडं लोळ रे ! "

दत्त्या खिक् करून हसला. चुलत्यानं बघितलं. फाकलं तोंड मिटून दत्त्या गप झाला.

" तूज काय कमी ठेवलंय ? फुकटचोट बसून खातंय ह्यां ! " चुलता चुलतीवर घसारला.

" कुणाचा फुकटचोट खातंय ? "

" गो, वर त्वांड करून जास्ती बोलू नको. थोडाच. " करून तरकलेल्या तोंडानं त्यानं खाकून बाटलीचं बूच काढलं.

" अजून तू हिथंच... "

दत्त्यानं तोंड घाण करून बघितलं.

" ...जा म्हणतंय ना. दोन सोड्याच्या बाटल्या घेऊन ये थंडगार. "

दत्त्या उठला. तोंडावर पाणी मारून चुलत्याकडं आला. " पैसं दे. "

चुलत्यानं सद्र्याच्या वरच्या खिशातल्या पाकिटातली पाच रुपयाची नोट काढली. " घे तुज्यायला. जा. सगळा बरोबर घेऊन ये. "

चुलतीच्या हाताला चव लय.

सकाळपासनं आधीच घेऊन ताठ; दुपारच्या शेंगटीच्या कालवणानं चुलता आडवा झाला. ढेकरे मागोमाग दत्त्याला बोलला, " रातीच्या कामाक लौकर जा. शंभर नग आलं तर बरं, नायतर तंगडी धरून आपटीन साल्या सकाली ! "

चुलती भांडी विसळून पालथी घालत होती. जराशानं कोपऱ्यात जाऊन चिरगुटा-वर पासलली.

पडल्या पडल्या दुपारी दोनचार निळ्या माश्या सारख्या दत्त्याच्या तोंडाकडं येत होत्या. उठून तो झोपडीबाहेर पडला. पानाच्या गादीकडं आला. बाजूला फुटपाथवर दहावीस माणसं भीड करून दिसली. तिकडं गेला. टाचा उचलून त्यानं मधे तोंड सरकवलं. तीन पत्त्याचा डाव पडला होता. तिसऱ्या पानावर पाच रुपये लावलेला म्हादग्या घसक्यात नोट घालवून बसला.

" फिर ट्रॉय करो. " पानं नजाकतीनं चाळवून पत्तेवाल्यानं नीट मांडली. पब्लिकच्या तोंडावरनं नजर फिरवली. दोनपाच मिनिटं हलली. पब्लिक हिकडंतिकडं करावला लागलं. एकदोघांनी खिशात हात घातले.

दुरीवरचा डाव एकानं डबल घेतला.

दत्त्या खांद्यानं पुढं घुसला.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" लगाव प्यारे. हो जाय. नसीब का चक्कर. "

दत्त्यानं चड्डीच्या मागल्या खिशातली पाचाची नोट काढून लावली. मधल्या पत्त्यावर. बोलला, " राणी " अन् टकटक बघू लागला.

बोट मधोमध पिचकावून पत्तेवाल्यानं पान उलटलं. " राणी. " उचलून पत्ते-वाल्यानं मुका घेतला. वरच्या खिशातल्या पाचाच्या दोन नोटा दत्त्याला दिल्या. दत्त्यानं खिशात कोंबल्या. वळून सीधा चालू पडला.

पत्तेवाल्यानं खिशात पानं कोंबली. " ए, गुल्लू... "

" दत्त्या, पळ रे. " म्हादग्या मुतारीकडं जाताना ओरडला. तितक्यात गडबड उडाली. सातआठजण उलटेसुलटे फुटले. सिग्नल नसताना दोघांनी ट्रकला बगल मारून रस्ता क्रॉस केला. दत्त्या मध्येच अडमडला.

" पुलीस आती है. भाग. " गादीवाल्यानं इशारा केला. दत्त्यानं खिशात कोंब-लेल्या नोटा चाचपल्या आणि तो पळत सुटला. सरळ बसच्या लायनीत घुसला. शर्ट पँटीत कोंबत पत्तेवाला मागोमाग.

" अबेऽ सुव्वर, निकाल पैसे! "

दत्त्यानं लाईन सोडली. फुटपाथ ओलांडला. मागनं पत्तेवाला " उसे चोदू... " करत सामने आला. दत्त्या कसा तरी हसला. सटासट दोन लाफे खाल्ले.

" मादरचोद! तेरे बापने कभी पत्ता देखा है! लाव पैसा वापस! " आणखी एक लाफा चढवून पत्तेवाल्यानं दत्त्याच्या खिशातनं नोटा उपसल्या! आणि तो गर्दीत घुसला.

फाटक्या खिशानं दत्त्या झोपडीकडं आला. चुलती चहा फुंकून पीत बसली होती.

उंदराच्या तोंडानं दत्त्या आत गेला. आपला अर्धा तिनं त्याच्यापुढं केला. खाटल्यावर चुलता निपचित. कप हातात घेताना दत्त्याची नजर पडली. चुलतीला जिल्हई आली होती. न बोलता तिनं त्याची नजर धरून ठेवली थोडकी. ओठाच्या कडेतून फुटली.

दत्त्या मग कोपऱ्यात लोळला मांजरागत. डोळे बारीक करून सुस्तावला. राणीच्या लाफ्यानं गालफडं हुळहुळत होती अजून.

उन्हं उतरली. मग उठला. अंग मोडलं. जरा हिकडं तिकडं केलं. चुलती काही-बाही करत होती.

मिटल्या डोळ्यानंच चुलत्यानं कूस बदलली.

चुलतीनं बत्ती लावली.

दत्त्या खाली गोण पाठीवर घेतली. बॅटरी खिशात सरकवली. चुलती पाठमोरी होती. काठी घेऊन तो झोपडीबाहेर पडला.

झिजवट पावलांनी निघाला. पब्लिक आपल्या ख्यालीत. रस्त्यावरच्या लाइटमधनं

२



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तो गल्लीत शिरला. गुदामाच्या कडेकडेनं त्रिळं धुंडत चालला.

सुरती मोहल्ल्याकडनं दोन टाकीकडं आला. आखंड रात उभीच्या उभी उभ्यानं काटायची होती. एक खाली लॉरी दणाणत आली. घूस आडवी गेली. पलट खाताना ती फिरत्या टायरीवरनं उडाली. फळासारखी दत्त्याच्या पायाजवळ पडली. लॉरी पुढल्या गल्लीत शिरल्यावर दत्त्यानं घूस उचलली, गोणीत भरली आणि तो भांगारा-च्या डेपोकडं आला. थांबला. दोनशे पावरच्या बत्तीखालच्या भांगारवाल्याचा डोळा त्याच्याकडं गेला, बगिचाकडं येतो का म्हणून.

दत्त्या तिथनं हलला. कॅफे वफादारच्या बाहेरवाल्याकडनं चहा मागवला. पैसे घेऊन हातात कप दिल्यावर बाहेरवाल्यानं त्याची बॅटरी घेऊन खालवर केली. कानाजवळ हलवून पाहिली. तोंड पेचून दाढेनं टोपण फिरवलं. मसाला बाहेर काढला. उंच उडवला. झेलून परत भरला. बघून दत्त्याचा जीव खालवर झाला. जड जीभ. आडकला. दात खाऊन त्यानं बॅटरी हिसकावून घेतली. बाहेरवाल्यानं त्याचं तोंड ओढून चूमा घेतला. कपबशीचा आवाज काढला. त्याच्या तोंडाला बैद्याचा वास मारला. कुरतडल्यागत होऊन दत्त्या त्याच्यावर खिसाकला. हिसडा मारून तो सरळ वाटेला लागला.

हिकडं चुलता हमेशा हिशेबाकडनं त्याला ओरबाडायचा. वर काय ना काय हाणुक सांगता. 'हे हाणुक, ते हाणुक' पाठ म्हणून टेकू द्यायचा नाही, का चुलती-पुढं बसून खुल्लंखुल्ला वार्ता करू, तर ते पण नाय.

चुलता तणतणायला लागला की दत्त्या बोट रुतवल्यागत चुलतीकडं नजर लावायचा. एकदा चुलती अशीच हसली. का कायकून. पण काय तरी भेटलंय असं त्याच्या मनाला टोकरून गेलं.

रस्त्यावरचं सिनेमाचं पब्लिक धुवून जाईपर्यंत त्यानं डझनभर नग गोणीत भरले. अन् तो कडेकडेनं निघाला. गांडू बगिच्याकडं आला. सद्र्याला ओल्या चमड्यागत वास मारत होता. छातीवरली मळी काढताना हवा लागली. बगिच्यात लाइट नव्हते. सातआठ झुडपं बुरखा घातल्यासारखी त्याच्याकडे बघत होती. आतल्या बाकड्या-वर जरा पडावंसं वाटलं म्हणून तो बगिचाच्या कंपौंडावरनं उडी मारून आत गेला. मधनंच अंधाराच्या केसाळ भोसक्यातनं चिर्र चिर्र ऐकू यायची. पण त्याचे डोळे पेंगुळले होते. काठी हाताशी ठेवली. बॅटरी खिशात कोंबली. गोणी बाजूला ठेवून तो बाकड्यावर एक पाय घेऊन बसला. तोंड फाकलं. गार वाटायला लागलं. बाकड्या-मागचं झुडूप हललं, वर घेतलेला पाय त्यानं खाली सोडला. तोंड मिटलं. बॅटरी मारली. झुडपाच्या तिरक्या सावलीखाली पाय मातीत घोळसत होते. मांड्यात मांड्या अडकलेल्या. वरल्यावरचे केस ताठरलेले. तो बावचळला. लुलुलू करत गोण उचलून चटक्यानं निघाला. "काठी" करून फिरला. हात लांबवून उचलली अन्

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पळत सुटला. कंपौंडावर चढून त्यानं रस्त्यावर उडी टाकली. सरळ दोन टाकीच्या बाजूला गपचीप फुटला. डोस्क्यात शेसव्वाशे उंदरं चिर्रचिर्र... कुईकुई कराय लागली. वरच्या पालथ्या मांडीवरचे केस अजून नजरेला टोचत होते. पायातनं घूस पळाली. तो टुणकन ठिकाणावर आला. बॅटरी खलास. कानाशी हलवली. टोपण खोलून पाहिलं. मसाला गायब. बाहेरवाल्याच्या मायचा घो!

तो झोपडीकडे येऊ लागला. त्यानं रस्त्याच्या कडेच्या बत्तीखाली गोण उलटी केली. एक एक मोजून गोणीत भरले. चार कमी पडत होते पंचविसाला. इकडंतिकडं बघितलं. खाली वाटलं, तसाच निघाला. नजर विझत आल्यागत पापण्या पडत होत्या. बाजूच्या खबदाडीतला उंदीर त्याच्या पायातनं पलीकडल्या बिळाकडं गेला. पण त्याला काठी उचलायला झालं नाही. केसात घाम उमटायला लागला. रात टेकीला आली. गोणीनं पाठीला कुबड आल्यागत वाटलं. वासानं नाकात आळ्या झाल्या. तंवर पोस्टाची पेटी आली.

पेटीला गोण टेकवून टेवली. झिटावून तो बसला. जराशानं पाठ सरकवून आडवा झाला. कुशीवर वळला. गोणीवर माथं टेकलं. गुडगे पोटाशी ओढले. बोटात बोट गुंतवून मूठ मांड्यांमध्ये घुसवली. मिटून पडला. डोळे अंधारात उतरू लागले. कुशीत कुबट ऊब धरली. मांड्यांत ओली लव उमटली. डोक्यात खुडखुडलं. कानाचं भोक खाजल्यागत झालं. उंदराची फलटणच्या फलटण त्याच्याकडे आली. पापण्या चुकवून एक एक गोणीत शिरली. उशीगत गोणी तट्ट झाली. चुई...चुई...चुई... चिं चिं चिं चिं...चिर्र चिर्र. एकावर एक...कुई कुई कुई...केसाळ मांडया झुडुपाझाड घोसळत होत्या. चुलती मऊ पावलानं आली. कानाशी लागली. हात हातात घेऊन बोलली, "ये हिकड..." जिभली ओलीचिंब झाली. चुलतीच्या मागनं गेला. नजर तिच्यात रुतायला लागली. ती कोपऱ्याकडं गेली. बसली. तिथं तो सलगीनं बसला. तिथंच ती लवंडली. त्याचा एक हात उचलून आपल्या बोटांनी कोळत चुलती बोलली, "फिरव आखंड माझ्या पोटावरनं." कानाच्या पाळीवर गरम फुंकर आली.

तिच्या पोटावरनं त्याची बोटं पसरून फिरत राहिली. बेंबटाचं वळसर सोडून थारकली. मांड्या शिवशिवल्या. बोटं थांबवून आवंढा गिळला. तो घुसमटून बोलला,

"गोल गोल लागता तुज्यात."

"तू बळखलंस काय ता!"

"नाय."

बोटं तशीच तिच्या पोटावर इथं तिथं करत राहिली. ओटीवर उतरली. चुलती डोळे मिटून चीप होती. तिच्या ओठांच्या कोपऱ्यात चीक येऊन थांबला. त्याची नस टरारली. श्वासातनं चुलती पुटपुटली, "बरा वाटता." दत्त्यानं उशी खाल्ली आणि तिनं त्याला अंगासरशी ओरबाडून घेतलं.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याची लाळ सुटली.

तांब्या ठणठणला. हः हः करत स्वतःला हिस्कावून घेऊन तो धपापला. उठून बसला. बावऱ्यासारखं हिकडंतिकडं बघायला लागला. मुंडी हलवून त्यानं च्यॅक च्यॅक केलं. पानाच्या गादीकडं गेला. वातड सदऱ्यातली पाठ खाजवून म्हणाला,

"येतो जाऊन..."

जीव उलथापालथा झाला. धुक्यात पोस्टाची पेटी उभ्या चुलतीगत दिसली. च्यॅक च्यॅक करून त्यानं मुंडी झटकली.

मधला रस्ता ओलांडताना मांडीत चिकचिकलं. गुदगुल्या केल्यागत खाजायला लागलं. तसाच तो झोपड्याकडं आला.

चुलती मधल्या गटाराकडेला बसून ओकाऱ्या काढत होती बकाबका. ओकारी पडत नव्हती. खालपास्नं उचलल्यागत व्हायचं. तो तिच्या मागं येऊन थांबला. तिनं त्याला हातानंच निवारलं. म्हणून तो झोपडीत शिरला. गॅस पावडर फवारून मारलेल्या उंदरागत चुलता चीत पडला होता. उजव्या मांडीवरचं धोतर सरकलेलं. दत्त्याच्या चरचरीत नजरेत गांडू बगिचातल्या ताठरलेल्या मांड्या आल्या. चिचुंद्री अंगावर चढल्यागत तो बाचकला.

पदरानं तोंड टिपत चुलती आत आली. हैराणगत दिसत होती. तिच्या डोळ्यांच्या कडांत पाणी साचून आलं होतं. तोंड ओढून चुरगळल्यागत. तो तिच्यापुढं घुटमळला थोडका. मग टमरेल घेऊन पत्र्याकडं जाऊन आला. तोंडावर पाणी मारून खाकी सद्र्याच्या खोळानं निपटलं. बघितलं नीट. तीनचार लालकाळे सुकट शिंतोडे दिसले चेचलेल्या उंदराचे.

घेडक्याकडं दत्त्यानं चार नग मागितले. घेडक्यानं आडीबाजी केली. दत्त्याकडनं नगाला पंचवीस पैसे चोपून घेतले. मग चार उंदीर दिले. तेव्हा दत्त्याची पंचविसाची हाजरी लागली.

हमेशा गच्च गोणी उंदरं भरून येणाऱ्या दत्त्याला आताशा पंचवीस भेटेनासे झाले. चुलता सुक्या बोंबल्या मारायचा. पण चुलती दाबूशी दिसायची. तिला लय वाटायचं. तिच्या हातनं तो अंगभरून गळला होता चारपाच टायमाला. ध्यान लागत नव्हतं कशात. केसात पिसवा पडल्यागत व्हायचं. कुठंतरीच बघायचा. तिथं चुलती यायची. रातीच्या राती तो गांडू बगिच्यातल्या बाकड्यावर पडून काढायचा खाली गोणीनं.

दिसामासानं चुलतीचं पोट पुढं येत होतं. उंदराची हाजरी चुकायला लागली. तसा चुलता त्याचा भेजा हमेशा कुरतडायचा. एक दिवस दत्त्याला त्यानं जुत्यानं हाणत नाक्यावर आणला. आधीच चुलता पावशेर ठोकून तयार. ओरडला,

"आयला हेच्या! हेला काय वाटता? मला उमगात नाय? हिकडं हिचं प्वाटपानी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पिकू लागला आन् ह्याचो कमाई घसारली." आन् त्यानं त्याच्या थोतरात लाफा चढवला. सारी झोपडपट्टी कामंधामं सोडून गोळा झाली. दत्त्याकडं अजब करून बघायला लागली. तरी चुलता त्याला पाडून खालनंवरनं बुकलत होता. च्यॅक च्यॅक करून दत्त्या ओकल्यागत ओरडला. गादी सोडून पानवाला धावून आला. त्यानं दत्त्याला चुलत्याखालनं ओढून बाजूला काढला. "मोप झालं, चल" म्हणत चार-चौघांनी चुलत्याला ढकलत झोपडीकडं आणला.

पण साऱ्या झोपडीनं समजुतीनं घेतलं. डॉक्टर गोमाशे म्हणाला, "झोपडी आली की तिथं सांडपाणी आलंच. साफ कसं करायचं ते बघा. मी मग हिथं मिक्श्चरं भरून कशाला ?"

गोणपाटं आणि पत्रे टाकून काशीबायनं दत्त्याला धरून झोपडं उभं केलं होतं. तरी तिनं तोंड सोडलं, "माणसाक आंधारात आपली चप्पल वळकता. आन् ह्यो आंधळा ह्या. आपला हातरूण दिसत ना ?"

तोंड ठेचल्यागत दत्त्यानं डोळे गच्च मिटले. झिणझिणून आतला कांदा फुटला.

चुलत्याची एकीकडं समजूत काढताना दत्त्याला "तू आपला आलग झोपडा बांध. आमाला तरास नुको !" करून झोपडपट्टीनं दत्त्याला जाम ताणलं.

दत्त्यानं च्यॅक-च्यॅक केलं. मांडी खाजवली.

चुलतीला मधे कुणी तोंडच उघडू दिलं नाही. ऐकायला मागतो कोण. तिच्या पोटाकडं बघत.

डॉक्टर गोमाशे केव्हातरी समोर आलेल्या दत्त्यापुढं निसरडं हसून जायचा. दिवसच्या दिवस दत्त्या झोपडीकडं फिरकायचा नाही. गोण उशागती घेऊन गांडू बगिचात राहायचा चोप. उंदरं भेटत नव्हती. सगळी मांजरामागंच.

चुलता समोर दिसला का दत्त्याचा जीव बिळात घुसून बसायचा.

सांडपाणी तुडवत डॉक्टर गोमाशे बेरात्री धावत आला. काशीबाईनं सगळं केलं. चुलतीला फणसागत पोरगा झाला. झोपड्यावर चांदाचा हिरवा झेंडा लावलेल्या इनूस जमालानं ढोलक बडवून खड्या पट्टीत कवाल्या ठोकल्या. पण दोन माळ्याच्या झोपड्यातला गुणाजी उमग ताठ पडला. त्यानं झांजांच्या तालानं घुंगराच्या ठेक्यात सासूची लावणी घेतली आन् कानावर हात टेवून थेट शुक्राच्या चांदणीला भिडवली. अखंड झोपडपट्टी दणाणून सोडली.

कंट्रीचा फुगा घेऊन चुलता रातसारी ओघळून पडला होता.

दत्त्याला भिरकटल्यागत झालं. तकदिरात उंदरं भेटेनात. मास्तरानं खाड्यावर खाडे मांडले. सलंग आठ्ठा. बेडक्या नजरेला नजर देत नव्हता. हाजरीला कमी पडले तर दत्त्याकडनं नगाला ठोकून पन्नास पैसे काढाय लागला. गच्च तोंडानं दत्त्या कासावीस व्हायचा. बॅटरी होती पण मसाला भरायला दमडा नव्हता. म्हादग्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

शीक पडला.

झोपडीकडं आलं की दारात चुलती पोराला पदराआड लावून बसलेली. आताशा चुलता बघावं तेव्हा झोपड्यात दिसायचा नाही. इकडंतिकडं करून दत्त्या दिवस काढायचा. आवंढा गिळायचा. काशीबाईच्या सल्ल्यानं चुलतीला दवापाणी आणायचा. भस्म्या रोग झाल्यागत चुलती ढीगभर गिळायची. एका थानातच पोर टं व्हायचं. टाळू भरून चिरगुटावर ठेवलं का दीड-दोन घंटे चीप पडायचं.

चुलता अवचित केव्हातरी यायचा. झोल खाऊन खाटल्यावर पडायचा उसवल्यागत.

फाकल्या तोंडानं दत्त्या कोपऱ्यात बसला होता. वरल्या फळीवरचं भांडं खुडखुडलं. तिथनं एक उंदीर खाली उतरला. चिरगुटाभोवती घोटाळून चुलत्याच्या खाटल्याखाली गेला. आणखी एक त्याच्या मागोमाग पळाला. दत्त्या एकटक झाला.

" उगंच गावभर तिरकीट करून तरी काय करतंस ? ह्येच्याबिगर झोपड्यातली उंदरं झोडप. " काशीबाई एकदा म्हणाली होती. दत्त्यानं च्यॅक च्यॅक केलं.

" जय पिकता थय इकत नाय मावशे ! " म्हणून चुलतीनं सांगितलं होतं.

दत्त्यानं हसून तोंड मिटलं.

चुलत्याची नशा अजून उतरली नव्हती. दत्त्याला वाटलं, जरा लेटावं. आतल्या आत गुळगुळला. तसाच बसून राह्यला. चुलतीनं त्याच्यापुढं च्या ठेवली.

" तू गो ? "

" मी पियालं. "

दिवस बुडतानाच दत्त्यानं काठी घेतली. बॅटरी खिशात कोंबली. गोणपाट खांद्यावर टाकलं. झिजवट पायानं तो बाहेर पडला.

गल्लीकुच्यांत शिरला. रस्त्यावरचा लाइट गल्लीत शिरलेला. खातून बिल्डिंगचा मागला पाइप फुटून भुळभुळत होता. त्यात भिजलेल्या पावाच्या तुकड्याला तीन-चार उंदरं कुरतडत होती. म्हादग्यानं दिलेल्या बॅटरीतला मसाला जोर पकडत नव्हता. तरी दत्त्यानं काठी उचलली. फटक्यासरशी उंदीर लिडबिडला. उचकी देत मुंडी टाकून पडला. गोणीत भरला. बाकीचे दोन टपोरे पावाचा एक एक तुकडा धरून नळाच्या भोकात शिरले.

मधल्या राडीवरनं उडी मारून तो पुढं झाला. खळ्ळकन आवाज झाला. नेम चुकला. नाहीतर ग्लास डोईवरच फुटायचा. वर बघायचं तर तोंडात घास पडायचा.

मागं एकदा बेरात्री हवालदारानं हाटकलं होतं. तेव्हा डोईवरचे केस धरून दत्त्याला लाफे चढवून दिले. " बोल, गोणमें क्या हाय ? " त्यानं फाकल्या तोंडाचा आपला घास दाखवला. तरी म्हणाला हवालदार, " तुझा बोचाच मारतो ! " आणि दरदर ओढत पोलिस-स्टेशनवर आणला. दत्त्यानं गोण उलटी करून झटकली. उंदराच्या वासानं हवालदाराला गळा भरून ओकारी आली. मग सोडून दिलं त्याला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गुदामाच्या कडेकडेने धुंडत तो मटण गल्लीकडं आला. सगळं चीपचाप पडलं होतं. वासाची हवा तोंडावर मारत होती. दुकानाच्या फळ्यांवर दोनचार जणं किनाऱ्याला वाहून लागल्यागत पसरून पडली होती. च्रुक करून एका घुशीमागं दुसरी चेकाळून लागली. घुशी तशा आटपत नाहीत. फटका टिचून पडला तर बरा, न्हाईतर आंगठा फोडतात. चार दिवस हाजरीला खाडा म्हादग्यागत. तितक्यात एक सरळच आला चालून नेमानं. नीट पडला. यवढ्यानं काय होत नव्हतं. अखंड पायपिट्टी झाली तरी चौदापंधराची भरती झाली नाही. गोणीचा एक कोपरा दिकून भरला नाही. चिचुंद्र्या मारून भागण्यातलं नाय. मास्तर कचकावतो हिशोबाच्या टायमाला.

दत्त्यानं एकदा बेडक्याची आयडिया वापरून बघितली होती. एक चिचुंद्री सोंड कापून उंदीर करून हिशोबात टाकली. मास्तरानं डोळा फुलवून नेमकी सोंडकापी उचलली. वर धरून तपासली नीट. नाकपुड्या हलवल्या. शेपटीच्या बुडात दाबून बघितली. मग बाजूला फेकून कचाचा दात खात दत्त्याची माय काढली होती. तेव्हापासून चिंचुद्र्या बंद.

पहाटेला दूधवाली गाडी बाटल्या वाजवत रस्त्याकडेला थांबली. तिच्या लाइट-मध्ये आलेला एक खट्ट्या उंदीर फटकावून त्यानं गोणीत भरला. कुटनं तरी घूस आली नाकाखालीच. पहिल्या फटक्यात ती डोईपर्यंत उडाली. बुकलून पडली. आंधळ्यागत पायात घोटाळली. लायनीनं तीन सटके खाऊन तिनं रक्त टाकलं. गोण तिच्यापुढं धरली. टर्र टर्र करून गळा फुगवत आत शिरली. गोण हलवून दत्त्यानं खांद्याला लावली. पाटलोणीवर उडालेले शिंतोडे फुटून पसरत होते.

तोंड चेपून आलं. तंगड्यात वळ भरले. एका जांभईनं त्याला भांगाराच्या दुकानाच्या फळीवर बसवलं. पाटीवरली घूस अजून टर्र टर्र करत होती. मग आपाप चीप झाली. दत्त्यानं गोण उलटी करून झटकली. बॅट्री लावून पाहिलं. एकोणीस नग भरले. गोळा करून गोणीत टाकले. हाजरी होत नव्हती. तंगडत निघाला. लांबलेली दिव्याची सावली आखडून पायात यायची.. मागं जायची. दुसरी तशीच यायची. जायची. करून दोन टाकीच्या नाक्याकडं आला. डोक्यावर गच्च भरलेली गोणी घेऊन बेडक्या येताना दिसला. टायमाला भेटला करून दत्त्या आडवा गेला. त्याला भेटला. वार्ता केली.

"सा दे फकस्त. शप्पत." जड जिभेनं दत्त्या कळवळला.

"घूस मुतली तुज्यायशीच्या भोकात! आखंड झोपडीची इज्जत घालवलीस चुलतीचं प्वाटपानी पिकवून!"

पिसाळलेला उंदीर डसल्यागत दत्त्या आतल्या आत किंचाळला, कानशिलावरची शीर वळवळली. खांद्यामधे आपली मुंडी दाबून सरसावला. पाठीवरली गोण घसरली.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

थुका बाजूला टाकला आणि उसळून त्यानं बेडक्याच्या पेकाटात लाथ घातली. बेडक्या उडाला. फरफटला गटारीपर्यंत. सावरून अंग झाडत उठला. बुबुळं फास्टून त्यानं नेम धरला. पाय फाकून ताठ झाला. आन् आंडील बैलागत तो दत्त्यावर धावला. भरीव गुच्चा दिला ठिवून. तसाच एक पोटाखालच्या बेचकीत सणकावून. कमरेत वाकून दत्त्या भेलकांडला. मुरगाळून रेकला. बैलाच्या मुतागत ओकला.

बेडक्यानं आपली गोण पाठीवर मारली आणि तो पळत सुटला चौदाव्या गल्लीकडं.

दत्त्यानं झीट सावरली. मोहल्ला भकास पडला होता. कानामधनं हवा सुटली. गोण उचलली. पिचल्या पेकटानं चालला. गुदमरून घाम फुटला. ठोसा गोळा होऊन पोटाखाली उतरायला लागला. गोस्यांत चमक उठली. थांबून वाकला. डोळे गच्च मिटून कळ जिरवली. अन् तो तंगडत निघाला.

पोस्टाच्या पेटीकडं आला. तोंड दुमडून गोण टेकवून ठेवली. आतून फणफणून आलं. बसला. तिथंच कलंडला. आतडं गाठाळून आलं. पाय ताणून जवळ खेचले. वळ आत ओढून धरला.

तांब्या ठणठणला. आखडलेला पाय झटकला. अंग गोळा करून उठला. गादीकडं जाऊन ध्यान टेवायला सांगितलं. चिंबलेल्या तोंडानं गळयातला चिकटा खरवडून टाकला. रस्ता ओलांडून झोपडीकडं येताना गल्लीतला कोंबट दर्प भपकारून आला. बाजूचा सांडपाण्याचा नाला भळाळून रस्त्याच्या उताराकडं पसरत होता.

जमालाचं कोंबडं पंख फडकावून झोपड्यावरनं आरवलं. तिथलं धुकं फाटलं.

झोपड्याबाहेर चुलती भांडी घासत होती. धुक्यातनं ती ढिल्ली दिसली. तिकडं झोपड्यात तिचं पोर जीव तुटेस्तवर किंचाळत होतं.

"पोरास उचलून घे. लय रडता." चुलती बोलली.

तिच्यापुढनं तो झोपडीकडं आला. त्यानं अर्धे झापड उचलून नीट उघडलं. तंवर पोर बकबक करून रडायचं मिटलं.

तो आत गेला. चुलत्याचं खाटलं खालीच पडलेलं. बाजूला भुईवर चिरगुटावरल्या पोराभवती आठदहा उंदरं घोटाळताना दिसली. दोनतीन पायशाला झटत होती. पाचचार टाळूकडं. लाल ओघळ झिरपलेला. तिथंच एक चिचोळया नाकानं फुंकर घालत कुरतडत होता.

दत्त्यानं उंदरं नजरेनं टिपून धरली. आवाज न करता काठी उचलली. पहिल्या सटक्यात पायगतीकडले दोन अर्धे बोचडे टिचले. तिंतक्यात उशाकडले खट्टे रेघा ओढत आडवेतिडवे घुटमळले. फिरून चिरगुटाकडं आले. बघून दत्त्या नाचला थै थै. त्यानं फटकारा उडवला. हुकला. म्हणताना त्यानं एकामागोमाग तडाखे ओढले. चट्टयात दोन मुरगाळून लोळले. टिपके टाकत कुशीवर पडले. निसटलेला एक लडदू

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गोळा होऊन दत्त्याकडं बघत होता. लडदू चटक्यानं पुढं आला. मागे फिरला. सांदीतनं कोपऱ्याकडं गेला. बिळाशी थांबला. वळून परत तिरका आला. त्यानं टाळूकडला चिकट तुकडा लाल तार धरून बेतानं ओढला. उलटला आणि वाशावर चढला. उडी मारून दत्त्यानं त्याला फटकावला. खाली पाडला. तंवर बिळाच्या तोंडाशी आणखी एकानं च्रुक केलं. दत्त्याच्या नजरेला काट मारून तो थेट चिरगुटाच्या पायथ्याशी आला. दत्त्यानं तिथंच टिचून टेचला. कोपऱ्यात काठी टाकून त्यानं पटापट होते तेवढे नग गोळा केले. झाली हाजरी करून सद्र्याच्या पुढल्या खोळात भरले. लडबडत तो बाहेर पडला. रस्ता ओलांडून पोस्टाच्या पेटीकडं धावला. वाकून बघायला लागला. पेटीभवती फिरला. गोण उलटीसुलटी उस्कटलेली. उचलून झटकली. आखंड खाली. पिळवटून छातीभर गार शीळ वाजली. कानशिलावरची शीर वळवळली. येडबडून तो गादीकडं धावला.

"रे काय झालं ?"

"माझी उंदरं ..." जड जिभेनं दत्त्या आक्रसून ओरडला.

गादीवाल्यानं खाली उडी टाकून धावाधाव केली.

दत्त्याच्या हातातली सद्र्याची खोळ सुटली. हडबडून तो चहूकडं बघायला लागला. पळत सुटला. नाक्यावर येऊन थांबला. सिग्नलचे मलूल पिवळे दिवे उघडमिटत होते. उतरत्या धुक्यातनं कोणीतरी आडगल्लीत पळताना दिसला. जीव खाऊन दत्त्या धावला. पाठलाग करत वळणावरल्या सफेद चकचकीत कमऱ्यात शिरला. तिथं गाढव फुरफुरत होतं. दोन्ही हातानं बाजूचा ढीग उपसला. घामानं निंबून तोंड वासलं.

उदसलेल्या कचऱ्याच्या ढिगाऱ्यातून तो बाहेर आला. पापण्यांत पाणी उभं राहिलं. घपापला. नजर ताणली. आभाळातली बिळं धुंडत भरकटल्या पावलांनी निघाला.

लांबून माणसं गोळा झालेली.

गोमाशे खालमुंडीनं त्याच्या अंगावरनं गेला.

चुलता येऊन खाटल्यावर चिताड.

डोळे टिपत काशीबाई चिरगुटावरल्या माश्या निवारत होती. हुंदका आवळून चुलती जीव कालवत गदमदलेली.

दत्त्या आत आला. थांबून चुलतीच्या थरथरत्या पाटीवरनं नजर फिरवली. कोपऱ्याकडं गेला. बसला आणि डोळे नसल्यागत चिरगुटाकडं बघत चीप राहला.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

२

## निर्मिती प्रक्रिया : आनंद यादव

नोव्हेंबर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात श्री. दा. पानवलकरांची पुण्यात अनपेक्षितपणे भेट झाली. दुपारी चार वाजता आले. उंचेला बांधा, गव्हाळ वर्ण, भेदक मिस्किल डोळे. पुरुषी आवाजाला दणकटपणाची धार. चेहरा काहीसा उन्हातान्हात हिंडण्यामुळे रापल्यासारखा वाटणारा. परिस्थितीशी टक्करा देऊन, ओवडधोवड जीवन भोगून एकूणच व्यक्तिमत्त्व धडधाकट झाल्यासारखे; खूप काही पाहिलं भोगल्यासारखं.

आटदहा वर्षांपूर्वी पहिली भेट झाली तेव्हा, ( ही भेट मुंबईतली ) अनगड भाषेमुळे आणि मोकळ्याढाकळ्या वागण्यामुळे मला ते विशेष आवडले...ठरवलं होतं या माणसाशी मैत्री करायची. त्याच्या कथांइतकाच तो वेगळा, स्वत्वाने जगणारा आहे. उगच शिष्टाचाराचे मानदंड सांभाळत औपचारिक बोलणारा नाही.

आले आणि गप्पा सुरू झाल्या. बोलताना कळलं की चांगले साताठ दिवसांच्या सवडीने पुण्याला आले आहेत. ऐकून बरं वाटलं. कधीमधी उभ्याउभी भेटीगाठी होत. त्यामुळं गप्पा मनापासून कधीच रंगल्या नाहीत. या वेळी काही तरी मोकळंढाकळं, अघळपघळ बोलायचं असं ठरवलं...मनात योजलं, त्यांच्या एखाद्या कथेची निर्मिति-प्रक्रिया जाणून घ्यावी. पण त्यांची मुलाखत वगैरे घेतो आहे असं त्यांना वाटू द्यायचं नाही. नुसत्या गप्पाच मारायच्या आणि त्यातूनच विचारत राह्यचं. दोनएक दिवसांच्या अंतरानं दिवस ठरवला. वेळ नक्की केली.

माझ्या घरापासून थोड्याच अंतरावर त्यांचे मेव्हणे श्री. जांभेकर यांचेकडे ते उतरले होते.

ठरल्यादिवशी अचानक पाऊस पडत होता. त्या पावसातच दुपारी चार वाजता त्यांच्याकडे गेलो.

“ चला, झोप झाली की नाही ? ”

“ आलात होय. मला वाटलं पावसात येता की नाही ?...अर्थात तुम्ही नसता आला तरी मी येणारच होतो. ”

उठले. चूळ भरून चहा घेतला. आणि छत्र्या उघडून परत आम्ही माझ्या घरी चालत आलो. हळूहळू गप्पा रंगत आल्या. मोकळा रस्ता आणि पावसाळी हवा, ( पानवलकर म्हणाले, ‘ ही इंग्लिश हवा मस्त ’ ) यामुळे एक अंतर्मुखता निर्माण होत होती.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी वाङ्मयाचे तोषागार
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची घडण जाणून घेण्याच्या उद्देशानं मी विचारलं, "तुमचं बालपण कुठं गेलं ?"

"वयाच्या आठनऊ वर्षापर्यंत कवटेमहांकाळ, मंगळवेढे या खेडेवजा तालुक्यात गेले. नंतर सांगलीला आलो. आम्ही कुळवाडी आणि भुई लोकांच्या (नदीत मासे मारणारे कोळी) वसतीतच राहात होतो. त्यामुळे बऱ्याचशा अडाणी आणि रासवट माणसांची संगत साथ लाभली. या लोकांच्या भजनीमंडळात मी जाऊन बसत असे. 'शिणल्या बिगर गळ्यावर गाणं चढत नाय' असे कुणीतरी तेव्हा बोललेलं अजूनही कोरल्यासारखं माझ्या मनावर आहे..."

बोलण्याच्या ओघात पुष्कळच माहिती पानवलकर सांगून गेले. "मॅट्रिक झाल्याबरोबर घर चालवण्यासाठी नोकरी पत्करावी लागली. सातारा, जयसिंगपूर, कोल्हापूर, कागवाड येथे सेंट्रल एक्साईजमध्ये कारनिशी करून मग मुंबईला कस्टम्स खात्यात बदली झाली. या खात्यात ऑफिसर म्हणून बढती मिळाल्यावर कामाला वेग आला. सगळा खाक्याच निराळा. इकडची दुनिया तिकडं व्हावी असं झालं. नोकरीला काळवेळ नाही. कामाला धरबंध असा नाही. भेटणाऱ्या माणसांच्या एक एक तऱ्हाच; भानगडी, लफडी, कुलंगडी. अनेक घटनाप्रसंगांतून जाताना घडणारा संघर्ष, जाणवणारा मनावरचा ताण, पंचेंद्रिये चोवीस घंटे दावणीला जुंपलेली. काही माणसं भन्नाट डोक्याची भेटायची. सहकारी अधिकाऱ्यांचे चमत्कारिक, हरहुन्नरी, विविध नमुने. मानवी विचारांचं, विकारांचं रात्रंदिवस पिसून चकणाचूर होणं, अशा आणि इतरही अनेक गोष्टी सतत बघाव्या, कराव्या लागत. त्यातून मुंबईसारखा टेक्नीकलर मुलूख मुलखावेगळा. जगातल्या अनेक भाषा, चालीरीती, आठरापगड जातिजमाती, त्यांचे व्यवहार, रीतीभाती, संस्कृती यांचा इथे संकर झालेला. सगळंच 'हायब्रीड' वातावरण आणि भरीत भर मुंबईची ओली खाकी हवा. या सगळ्यांचा त्यांच्यावर कळत नकळत गेली पंचवीस-तीस वर्षं परिणाम होतो आहे. अशा वातावरणात बुडून न जाता पोहत राहणे हेही एक टेंपरामेंट. मनात, नजरेत सहज काही उतरत जायचं, कानावर भाषा आदळायच्या, या स्वाभाविक नित्याच्या बाबी. यातूनच काही घडत राहायचं. आरंभाचा उगम व शेवटची समाप्ती उमगत नसायची. मनाचा तळठाव घेणारंही काही घडून जात होतं. सतत काही बरावाईट बदल होत गेला. त्याची तशी फारशी कदर वा जाणीवही नसायची...सगळं काही आपल्या मनानं चाललेलं..." असं त्यांनी एका संथ ओघात सांगितलं.

"तुमची 'कमाई' ही कथा अशाच प्रकारातून सुचली का ?"

"तसाच काहीसा प्रकार. परदेशातून आयात केलेल्या रेयॉन यार्न (सेमीसिल्क)-च्या गोडाऊनवजा कारखान्यात मी सुपरव्हिजन ड्यूटीला होतो. दिवसभर, कित्येकदा रात्री तिथं कामं निघत होती. तिथं असा एक, वीसएक वर्षांचा छोकरा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हमाली कामाला येत असे. त्याच्या तिरस्थळी वागण्यावरून तो नजरेत येऊ लागला. त्याच्या हालचाली, वागण्याची तऱ्हा काहीशी गूढ पण खेळकर वाटायची. मन काहीसं भरकटल्यासारखं त्याचं. कारखान्याचा मालक, सरकारी माणूस यांच्याशी वागण्याचा, बोलण्याचा त्या पोराला पोच दांडगा. स्वाभाविक येणारी अरगट भाषा वगळता ते पोरगं चलाख वाटायचं. माझी खाजगी कामं खुषीनं करायचं. पोरगं तसं इब्लिस. एका ठिकाणी कधी ठरायचं नाही. मधूनच केव्हातरी ' जरा जाऊन येतो ' म्हणून पसार व्हायचं ते तासन्‌तास गायब. त्याचा मुकादम हैराण. मालक त्याची आईमाई काढायचा. हे पोरगं परत यायचं ते छपरातून उतरल्यागत. कळायचं नाही. आपल्याच आगंमागं असल्यासारखं, म्हणायचं ' हे काय इथंच हाये '. त्याच्या एकूण वागण्या, बोलण्यावरून कळायचं ' हे प्रकरण काही तसं सरळ नाही '. मुंबईत असे नमुने कमी नाहीत. या बेण्याशी दोस्ती करून बघावी असं मनानं घेतलं. आणि हळूहळू त्याला विश्वासात घेण्याचा प्रयत्न करू लागलो...''

बोलता बोलता त्यांनी त्या पोराची सर्व माहिती सांगितली. हे पोरगं तिथं कामाला येत होतं. पण ते काम म्हणजे त्या पोराचा ' साईड बिझनेस ' होता. एरवी ते म्युनिसिपल वॉर्डातल्या ' मलेरिया डिपार्टमेंट 'मध्ये कामाला होतं. त्याचं काम म्हणजे रात्रभर हिंडून कमीत कमी पंचवीस उंदीर मारायचे. हे उंदीर काठीने मारायचे. रोज हेच काम. तेसुद्धा रात्री. शिळे, फुटलेले, कुजके उंदीर हिशेबात धरले जात नाहीत, किंवा उंदीर म्हणून चिचुंद्र्या, घुशी चालत नसत. म्हणून हिशेबात उंदीर कमी पडले तर हे उंदीरमारे, उधार उसनवारी करत. जास्तीचा उंदीर हिकडं ओढायचा. क्वचित घुशीचे उभे काप करून दोन नग मोजायचे. पण ही लबाडी वॉर्डातला मुकादम उघड करीत असे. तो शेपूट, कान तपासून नगाचा हिशेब धरायचा. आख्खा खट्ट्या असेल तरच एक नग मोजणार...

पानवलकरांनी एक दोन उंदीर त्या पोराकडून मारवून घेतले. तेही एक टेक्निकच. एरवी साधा प्राणी किती हिंस्र असू शकतो हेच बघता आलं. हे सारं जिज्ञासा म्हणून. त्या पोराला भेटायला येणारा पोरगा, त्यांचे हिशेब, हमरातुमरी, पटवून घेण्याची रीत, हाही एक महत्त्वाचा व्यवहार. पोटं भकाळी गेलेल्या पोरांचा. त्या पोराशी बातचीत करताना त्याच्या झोपडीतल्या उद्योगाचे तपशील समजले. त्यानं चहाला बोलावलं तर आमंत्रणाचा तात्काळ स्वीकार केला. कारखान्यातले सापळ्यात पकडलेले उंदीर दुसऱ्या पोराला उसने दिले जात होते. पण पुढे ' सीझन ' संपल्यागत झालं. ' उंदरं हुशार. सापळ्यात आडकायला मागेनात ' असं झालं...

...ह्या पोराला चुलतीचा लोभ लागला. तिच्या भवंती तो सारखा करायचा. चुलता दारुड्या. रोज झगडा, आदळआपट, शिव्यागाळी. चुलता पोराला छळायचा व त्याच्या ' कमाई 'वर दारू प्यायचा. अशी बरीच माहिती पानवलकरांनी त्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पोराकडून काढली. हे पोरगं सकाळी नेहमीसारखं कारखान्यात कामावर आलं तर त्याच्या याह्यावर, गालावर रक्ताचे ठिपके दिसले. एकदा तर चड्डीवर डाग दिसला. पोरगं कसनुसं झालेलं दिसलं..."

"तुम्ही सांगता हे खरोखर विलक्षण आहे. अशी काही कोवळी तरुण पोरं झोपडपट्टीत राहून नाना धंदे करीत असतात. त्यातला हा उंदीरमारीचा उद्योग. पोटासाठी. रोजची दोन रुपयाची हजरी लागायसाठी ! या प्रकाराची कुणा सर्व-सामान्य माणसाला कल्पनासुद्धा येणार नाही— पण या विषयावर लिहिण्याचे तुम्हाला जेव्हा सुचलं, तेव्हा तुम्ही त्या मुलाच्या वस्तीचा सगळा परिसर पाहून आलात का ? किंवा मी हा प्रश्न तुम्हाला असा विचारीन की, एखादं कथाबीज तुमच्या मनामध्ये पडलं तर तुम्ही त्या कथाबीजाला योग्य असा जो मनोमन परिसर निवडता, तो परिसर, किंवा त्यासारखा परिसर तुम्हाला प्रत्यक्ष पाहून यावं असं वाटतं का ? म्हणजे असं की कथेतील वातावरणनिर्मिती त्यामुळं व्हायला मदत होईल."

"मनात जेव्हा एखादं असं काही तीव्रतेनं सुचत राहतं तेव्हा, त्याची कथा होऊ लागते. परिसरही दिसू लागतो. आणि तो आपण कधीतरी कुठेतरी पाहिलेल्या परि-सरासारखा वाटू लागतो. मनानं मी तेथे असतो. तिथली माती, हवा, वास काहीतरी नादरूपासह सांगत राहतात. ते तसे समजावून सांगता येणार नाही. 'हुंकार' या माझ्या कथेमधले वातावरण, परिसर प्रलयंकारी रात्रीचे, भर मुसळधार पावसातले. तसे काही कारण नव्हते पण एका रात्री धुवांधार पावसात मी तेथे चिखल तुडवत फिरलो. अंधाराच्या सावल्या, झाडांची भुतं आणि देवळांची काळोखातली भिजणारी शिखरं पाहिली. हा परिसर लहानपणी माझ्या पायाखालचा होता. आता 'हुंकार' कथेच्या संदर्भात हा परिसर व येथील वातावरण मंत्रानं भारल्यासारखे उतरले आहे अशी माझी समजूत आहे. केव्हातरी तनमनात भिनलेली ही अनुभूती. कथेत हे सर्व कितपत जाणवते हे रसिकांनी ठरवावयाचे आहे."

"'कमाई' या कथेतील परिसर तुम्ही बराचसा कल्पनेनं उभा केला आहे का ?"

"काहीसा — नेमका असा ताळा मांडणं नसतं. वास्तवाची तरल कल्पना मनात उभी राहणं हाही एक भाग असतो. मुंबईत झोपडपट्ट्यांना कमतरता नाही. दत्त्या असाच एका झोपडीत राहात होता. त्यानं एकदा 'च्याई'ला बोलावलं होतं. त्यानंतर त्या 'पट्टी'त सर्वभर फिरलो. एकदोन टाळकी ओळखीची वाटली. त्यानी तोंडं चुकवली. 'कमाई' लिहिताना हे असं काही आपल्या नजरेपुढून सरकत होतं. भयाण बकाल असा परिसर लिहिताना उतरत होता. पात्रं त्यातून फिरत होती..."

"ही कथा लिहिली पाहिजे असं तुम्हाला का वाटलं ?"

"जितीजागती दारिद्र्यानं गोठलेली माणसे. कोण कुणासाठी कसा जगतो ? दुःख, वेदनांचा जाळ कुणाकुणासाठी धगधगतो आहे ? माणसांचा 'उंदीर' होऊन तो


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

झोपड्यांच्या सांडपाण्याभोवती लडबडतो आहे. अनुत्तरित, तोंड शिवलेलं जगणं. हेही एक भेसूर जगच माणसांच्या जगातलं. लिहिल्याशिवाय राहवत नाही असे क्षण, तासन्तास, दिवस. हाही एक मनाचा कल असेल. विचार करता करता लय लागत राहिली. आणि काहीतरी ' बरं ' लिहून हातावेगळं होत राहिलं..."

" मराठी लेखकावर तुम्ही नाराज दिसता. सगळेच मराठी लेखक असे आहेत का ? "

" काही चांगले लेखक आहेतच. पण बऱ्याचशा कथा ' ॲनिमिक ' वाटतात. लेखन हा ज्याच्या त्याच्या कुवतीचा व मनाच्या कलाचा भाग आहे. आळंबळं करून काही होत नाही. नाराजी कथांविषयी, लेखकांविषयी नाही हे लक्षात घ्या. कुणी कुणाला उपदेश करण्याचा सवाल नाही. लेखकाचं मन सतत जागं निर्भर असावं. अंगावर झेपावणाऱ्या अनुभवावर झडप घालता आली पाहिजे सर्वार्थानं. लेखक सी. आय. डी. सारखा असावा. सावलीसारखा. स्वतःला न पाहणारा; सावध. त्यानं त्याचं लेखनाचं काम करावं. स्वतःचं प्रदर्शन नको. म्हणजे असं की, लेखकानं आपण आपल्या ख्यालात लिहीत राहावं. त्याला एक वेळ ' अस्तित्ववाद ' वगैरे काय आहे हे माहीत नसले तरी फारसे बिघडत नाही. पण मानसिक व शारीरिकतेच्या विभिन्न पातळ्यांवरचे कसदार, धगधगीत अनुभव त्याला रिचवता आले पाहिजेत. व्यक्त करता आले पाहिजेत ताकदीनं..."

" हे तर खरंच आहे. लेखकाजवळ अनुभव समृद्ध असतील तर त्याच्यासारखा श्रेष्ठ दर्जाचा लेखक होणार नाही. मलाही तुमच्यासारखंच वाटतं. पण या आपल्या म्हणण्याचा काही लेखक स्वतःच्या सोयीसाठी विपर्यास करतात. तो असा की नुसते अनुभव समृद्ध असते तर झोपडी-झोपडीतून लेखक निर्माण झाला असता, असे ते म्हणतात आणि स्वतःच्या अनुभवाच्या बाबतीतलं दारिद्र्य लपवण्याचा प्रयत्न करतात. वास्तविक तुम्हाला काय किंवा मला काय नुसत्या अनुभवसमृद्धीवरच भर द्यायचा नसून प्रतिभावान लेखक अनुभवसिद्ध असावा लागतो असं सुचवायचं असतं. त्याच्याजवळ अनुभव नसतील तरीही तो कथा लिहू शकेल, पण त्या कथा तशा जीवनाचे भेदक, सूक्ष्म संमिश्र सकस दर्शन घडवणाऱ्या उतरत नाहीत; असं आपल्याला म्हणावयाचं असतं नाही का ? "

" बरंचसं तसं. पण ' प्रतिभा ' हा शब्द मला भारी वाटतो. कळत नाही म्हणा हवं तर. पण ती एक ' गुप्त शक्ति ' आहे. जीवनाच्या तीव्र व धगधगत्या अनुभूतींचा सूक्ष्म संवेदनांनी कळत न कळत सतत शोध घेतला जातो. या वेळी प्रतीत होणाऱ्या जाणिवा लेखकाला बेचैन करून सोडतात, व्यापून टाकतात. त्या अवस्थेतून जे लेखन होतं ते सकस उतरतं, मनावर संस्कार करणारं असतं. हे सगळं सहज घडत राहतं. तेव्हा ही ' शक्ती ' जाणवते. सरस्वतीसारखी ती गुप्त असते. "

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" मला सांगा, कथा सुचवल्यावर लगेच तुम्ही लिहायला बसता ? "

" नाही. तसे जमत नाही. नोकरीच्या कामात वेळ खूप खर्ची पडतो. नोकरीच्या वेळा रात्री, दिवसा केव्हाही असतात. त्यामुळे नोकरीवर जाण्याआधी जाण्याची तयारी आणि थकून आल्यावर डोक्यातली भणभण आणि अंगातला शीण उतरवण्यासाठी विश्रांतीची, झोपेची गरज. यामुळे कथा मनात असूनही, लिहिण्याची इच्छा असूनही लिहिणं घडत नाही....त्यामुळं दुसरा एक फायदा होतो, कथा सतत घुमत राहते मनात, डोक्यात. तिच्यातील संवाद, बारकावे मनोमन तयार होत राहतात. असे अनेक दिवस चाललेलं असतं. मग होईल तशी कथा लिहितो. वेळ मिळेल तसं चालूच असतं. काही वेळा कामाच्या भरात एखादा नवाच तपशील सापडतो..."

" म्हणजे लेखनाला काळवेळ असं काही नसतं ? "

" तसं कौतुक करायला वेळच मिळत नाही राव..."

" तेही खरंच. "

" लिहिण्याची जबर भूक लागली आणि फुरसद सापडली तर मग केव्हाही, कुठंही, कितीही लिखाण लिहून होतं. काही वेळा ' लोकल 'मधेही लिहिलेलं आहे. थोडं जरी लिहून झालं तरी तेवढेच समाधान व आनंद मिळतो. पुढला मजकूर मनात टेवून इतर कामाला लागावं लागतं. "

" श्रीनिवास कुलकर्णींचं लेखनही अशाच प्रकारे चाललेलं असतं. मला एकदा ते बोलल्याचे आठवतं. म्हणजे तुमची प्रत्येक कथा दोन दोन तीन तीन महिने लेखनासाठी घेते म्हणा. "

" प्रत्येक कथेबद्दल असं काही सांगता येणार नाही. फुरसद मिळाली की लेखन लौकर होण्याची शक्यता असते. "

" समजा, तुम्हाला भरपूर वेळ मिळाला, तर तुमची कथा भरभर लिहून होईल असं तुम्हाला वाटतं का ? "

" तसं काहीच नक्की सांगता येणार नाही. कारण एखादी कथा फार हैराण करते. पाहिजे तो रंग, रूप मनासारखे बनत नव्हेत. खरं सांगू का, एखाद्या लेखकानं कथालेखन करून जगायचं ठरवलं तर हा एक भीक मागायला लावणारा छंद आहे हे त्यानं लक्षात ठेवावं. याबाबतीत सीधा सरळ मामला नसतो. चांगल्या कथेला शास्त्र असे नसते. अहो, बऱ्याच वेळा मनात सगळं सुचलेलं असतं पण लिहिताना नेमका सूर लागत नाही. हवं तसं लयीत लिखाण उतरत नाही. रिकामा मनस्ताप होतो. काही वेळा विलक्षण काही भावलेलं असतं. पण पहिली ओळ कागदावर धड उमटत नाही. शब्दांची पोकळ टरफलं उडत राहतात. ना रस, ना कस. कधी कधी एखादा अनुभव असा झपाटतो की बस्स. आणि जमता जमता काहीतरी खोटेपणा जाणवायला लागतो. मग हे सगळं कशाला, असं वाटत राहतं. लेखनात सणसणले

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मनोवृत्ती डोक्याला मुंग्या आणते. मग सणक येते. कुठंतरी दूरवर भटकून याव किंवा कुठंतरी जाऊन गाणं ऐकत बसावं; नुसत्या तंब्रोऱ्याच्या झंकाराच्या वलयांकित प्रवाहात जाऊन उभं राहावं. आणि बऱ्याच वेळा, मी कुठल्याही गाण्याला बैठक मारून बसतो, एकएक वेळा असं गाणं 'अॅपेटायझर' होतं अन् अपुऱ्या लेखनाला लय गवसते. तरीही दिवसचे दिवस लिहीतच असतो..."

"'कमाई' कथेचं लेखन किती दिवस चाललं होतं हे आठवतं."

"असेल दीडदोन महिने. सलग एका बैठकीतलं हे लिखाण नाही."

"मला आणखी एक सांगा, 'कमाई' कथेचा नायक जो 'दत्त्या' आहे तो तुम्हाला त्या पोरावरनं सुचला, त्या पोराची किंवा त्या पोराच्या चुलता-चुलतीची जी माहिती तुम्ही प्रत्यक्ष सांगितली तिच्यापेक्षा बरीच वेगळी माहिती, तुमच्या कथेत त्या पात्रांविषयी त्यांच्या संबंधाविषयी आलेली आहे..."

"माहितीचा भास हा आधारभूत असतो इतपतच त्याचे महत्त्व. बाकी सर्व पात्रांतील भावबंध, त्यांची अंतर्गत नाती हा मानसिक अनुभूतीचा एक भाग म्हणा हवं तर..."

"ही निर्मिती केवळ काल्पनिक आहे; का तशी करायला काही कारणे आहेत?"

"कारण आहे. काय झालं. ते पोरगं ज्या दिवशी ओल्या डोळ्यांनी कामावर आलं आणि त्यानं त्याच्या चुलतीचं मूल मेल्याचं सांगितलं; त्या दिवशी माझ्या मनात तो पोऱ्या, त्याची चुलती आणि तिचे मूल, तो बेवडेबाज चुलता यांच्यात काही वेगळेच संबंध निर्माण होऊ लागले. ते पोरगं चुलतीवर एवढं लोभावलं की त्याचे काहीतरी तसे वेगळे वळण असावे असा संदर्भ लागू लागला. चुलत्याला दारूशिवाय कसलीच शुद्ध नाही. शिवाय तो बिनकामाचा. पोरगा उंदरं मारून दारूसकट घर चालवायचा. अशा स्थितीत काहीही शक्यता अटळ होती. मग या अंगाने काल्पनिक नाती गुंतवत कथेची वडण होत राहिली..."

"चुलती पुतण्याचे असे लैंगिक संबंध कसे काय तुम्ही निर्माण केले?"

"...झोपडपट्टीच्या बकाल वातावरणात लफडी फार. आणि इथं तर दारिद्र्य-दैन्याची लक्तरं लोंबतायत. पोटची पाडणं, वाट्टेल तसले संबंध असणं इथं अशक्य नसतं. अशाच एखाद्या चुकार संबंधातून अशा एका चुलतीचं रूप आकाराला आलं. तिचं कथेतलं वागणं बोलणं सुसंगत होत गेलं. पुतण्या-चुलत्याच्या वागण्यातली नादान धडपड. झगडा भांडणं अपरिहार्य..."

"प्रत्यक्ष त्या पोरानं, चुलतीचं तान्हं पोरगं कशानं मेलं, ते काही कळलं नाही, पण उंदरांचं नाव घेतलं, असं असताना तुम्ही मात्र कथेत ते पोरगं उंदरांनीच खाल्लं आणि त्या उंदरांना मारण्याचा प्रयत्न त्या दत्त्यानं केला, असं दाखवलं आहे ते कशासाठी? इथं वास्तवाची फारकत झाली नाही काय? तुमच्या कथा वास्तवातील भान बऱ्याच प्रमाणात सतत राखणाऱ्या वाटतात म्हणून म्हणतो..."

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" कथेतील वास्तव तसे वेगळे; कल्पनेच्या अंगानं जाणारे असते. कथा म्हणजे 'रिपोर्ताज' नव्हे—कथेचा शेवटही कुठल्याही अर्थाने पटणारा अपरिहार्य असा उतरला आहे असे मला वाटते. कथेतल्या या शेवटानं परिणामकारक झोका घेतला आहे. कथा लिहिताना अशा पूर्वयोजना मनात असतातच असे सहसा होत नाही. कधी कधी कथा जमून जाते ती अशी, असे फार तर म्हणता येईल. समीक्षेच्या परिभाषेत कथेचा 'हा' शेवट 'कलात्मक' असण्याची शक्यता आहे...पण तसा माझा अट्टाहास नसतो. 'कलात्मकता' ही ओढूनताणून कथेत आली तर कथा जमत नाही..."

" त्यातल्या 'कलात्मकतेचे' स्वरूप थोडं स्पष्ट करून सांगा ना. "

" ...म्हणजे असं की त्या पोरानं रात्रभर उंदीर मारून 'कमाई' केली आणि त्या कमाईवर चुलतीचुलत्यासकट तगून दिवस काढले. चुलतीचा विलोभनीय लोभ त्याच्या रक्ताला सुटला. उंदीर मारीत उंदराची जुगत निरखलेली; नस फुलवणारं पोराचं वय, त्यातच वातावरणाचं धूसर अंग...शेवटी त्याच्याच चुलतीचं मूल उंदरांनी खाल्लं...मुलाची टाळू फोडणारे उंदीर तो स्वतःच्याच 'कमाई'साठी मारत होता. पण ते पोर उंदरांनीच खाल्लं याचं त्याला भान नसतं. एकापरीने ते पोरही त्याचीच 'कमाई'. ती उंदरांनी खाल्ली. या संदर्भात दत्याला, उंदरांनीच पोराला टाळू फोडून मारलं याची जरासुद्धा दखल नसावी हा एक सूक्ष्म धागा सहजगत्या कथेला झोका देऊन जातो.

" हे जीवननाट्य तर फारच सुंदर तुम्ही दाखविलं आहे, पण प्रत्यक्षातील वास्तवाला त्या शेवटामुळे धक्का पोचला असं तुम्हाला वाटत नाही काय ? "

" हे तसे ठोक जीवननाट्य म्हणता येणार नाही. एक भीषण नियती त्या पोराच्या कर्माला भवली. प्रत्यक्षातील वास्तव हे मर्यादित स्वरूपाचे, केवळ आधारभूत असते—कथेतील वास्तव व्यापक पातळीवरचे, गर्हिऱ्या मानवी मूल्यांना आव्हान देणारे आहे. मात्र तसा अभिनिवेश नाही..."

" तसं वाटतं खरं...पण विरोधनाट्यही साधण्यासाठी तो शेवट आला की काय अशी मला शंका येते. म्हणजे असं की तो उंदरांना मारतो आणि शेवटी उंदीरच त्याच्या मुलाला मारतात...पण हे जे तुम्ही दाखवलं आहे, ते कलाटणीवजा मुळीच वाटत नाही. अतिशय स्वाभाविकपणे आलं आहे. मुलाच्या टाळूवर तेल घातलेलं असतं. त्यामुळं उंदीर मुलाची टाळू फोडतात. असंही पुष्कळ वेळा घडतं, असं खेड्यात ऐकलं आहे. त्याचा तुम्ही बरोबर वापर करून घेतला आहे. मला दुसरं असं विचारायचं होतं की, या कथेतील म्हादग्या, डॉ. गोमाशे, पानांचा गादीवाला या पात्रांचं आणि गांडूवगिच्यातल्या व जुगाराच्या प्रसंगाचं कथेत नेमकं प्रयोजन काय ? मला त्यांचं प्रयोजन कळलं नाही म्हणून विचारतो."



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" कथेतल्या प्रत्येक तपशिलाचं उघडउघड असं ठाम स्वरूपात जरी प्रयोजन सांगता येत नसलं तरी या गोष्टी त्या कथेतील सर्वस्पर्शी भीषणता, बकालपणा व्यक्त करत एकूण वातावरण भीतीच्या गाभ्र्यानं जिवंत करत राहतात व सर्वरूप अशी प्रत्ययकारी निर्मिती डोळयांपुढे उभी राहते. या सर्वांतूनच कथेची पाळंमुळं खोलवर घुसून पसरली आहेत. म्हणून या कथेचा एकूण ' फील ' यायला या गोष्टी साहाय्य करीत असतात. तुम्ही म्हणता त्या पात्राचा, घटनाचा त्या वातावरणात त्यासाठीच वापर झालेला तुम्हाला दिसेल. नेमकं त्याच कार्य सांगता येणार नाही; पण कार्य आहेच."

" आता उल्लेखिलेली पात्रं आणि घटना त्या तुम्हाला भेटलेल्या मुलानं सांगितलेल्या, की तुम्ही कल्पनेने निर्माण केलेल्या ? "

" त्या मुलानं सांगितलेल्या सरसकट सगळ्या घटना नाहीत. म्हादग्या हे पात्र त्याच्या मित्रावरून घेतलेले. पण बाकी पात्रं, घटना, प्रसंग झोपडपट्टीतल्या एरवीच्या जीवनात भेटणारे आहेत...कथालेखनाच्या ओघात हे सगळं घडत गेलेलं..."

" अशा प्रकारच्या कथातून येणारी तुमची भाषा काही वेगळीच असते. त्या वातावरणाचा उग्र दर्प घेऊन ती येत असते. मराठी कथाक्षेत्रात अशी भाषा फक्त तुमचीच आहे. तुम्हाला ही कशी काय लाभली ? ही तुम्ही कशी कमावली ? "

" कमावली वगैरे– हे फार होतं. मी ' कमाई ' कथेत वापरलेली भाषा ही बहुतांशी तेथील, त्या परिसरातील आहे. मला भेटलेल्या ' त्या ' पोराच्या तोंडचे अनेक शब्द, वाक्प्रयोग मी या कथेत आणण्याचा प्रयत्न केला. अशी भाषा झोपडपट्टीच्या परिसरात ऐकायला मिळते. हे भेटलेलं पोर कोकणातल्या एका खेडेगावातल्या तळाच्या समाजातलं होतं. त्याच्या बोलण्याच्या लकबी, दचकावायला लावणारे शब्द मला आपलेसे करावे वाटले. त्या शब्दांना नादही होता. परिसर, वातावरण, लोक यांची हवा असलेली ही भाषा. या भाषेवर पुनः इतर भाषांचेही संस्कार घडले. ती जी भाषा, ती कथेची भाषा. भाषा स्वतःच्या शब्दनादासकट साधली तर ती जिवंत भाषा होते. कथेला ती पूरक बनते. आयुष्यभर होणाऱ्या संमिश्र संस्कारांचाही तो भाग आहे. शिवाय आपला मुलूख, माणसं, व्यवसाय, भोवतालचे वातावरण यांचेही एक अजाण नाते तेथे गुंतलेलं असते. त्यातूनच अशी भाषा येते. मात्र ती अंगी लागली पाहिजे. कथेतून भाषा अशी वेगळी काढता येत नाही. '

" अशा कथा लिहीत असताना तुम्हाला या विशिष्ट भाषेचे भान लागते ठेवावे काय ? "

" तसेच नेमके नाही. पक्का अंदाज मनात असतो कथेतल्या वातावरणातूनच ती उगम पावते, प्रवाही बनते...ती त्या त्या कथेची भाषा असते. माझी म्हणून नसते."

" हे बरोबर वाटतं. कारण वेगवेगळ्या वातावरणातल्या कथांची तुमची भाषा वेगळी असते–."


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" त्याला कारण मी मघाशी सांगितलं तेच. त्या त्या कथेतल्या वातावरणातून ती येते--"

" तुम्ही एखाद्या इंग्रजी, मराठी साहित्यिकाच्या कथा नमुना म्हणून मनासमोर ठेवून वगैरे तुमचे कथालेखन करता काय ?...किंवा दुसऱ्या भाषेत मी असं म्हणेन तुमच्यावर कुणाच्या कथांचा परिणाम वगैरे आहे काय ? "

" कुणाचं अनुकरण करणं किंवा आदर्श ठेवण ही माझी वृत्ती नाही. गरजही भासत नाही त्यात मला रस वाटत नाही, असं म्हणा फार तर. फार थोडं पण चांगलं असं इग्रजी लिखाण, कथा कादंबऱ्या वाचतो, वाचल्या...पण आपण तसं काही लिहावं अशी भावना मला झाली नाही. मग माझ्यावर परिणाम होण्याचे तर दूरच. मॅट्रिकमधे हवे तितके यश मिळाले नाही व नोकरी पत्करणे भाग पडले. जवळ जवळ सात-आठ वर्षे या दरम्यान मी कसलेच पुस्तक चाळले नव्हते. मला भटकायची सवय; गाणी मग ती भजनं असोत नाहीतर अब्दुल गनीच्या कनाती-तला तमाशा असो, चवीनं पाहात होतो. सांगलीच्या सांभारे वैद्यांच्या वाड्यात बाळ-पणी गंधर्वांचे कीर्तन भजन ऐकल्याचे अंधुक आठवते...अशी काही स्मरणचित्रं फिल्मसारखी केव्हातरी समोर येतात...कदाचित अशा भासण्या-वाटण्यात देखील लेखनाला आवश्यक मसाला ठासून भरलेला असतो. शेवटी यातून लेखकानं निवड करावयाची असते..." असं म्हणून पानवलकरांनी अनेक बारीकसारीक प्रसंगांच्या आठवणी सांगितल्या, अनेक तपशील जिवंत केले.

गप्पा कशा सहज चालल्या होत्या. मधूनच इकडचे तिकडचे बोलणे निघत होते. एखादा वादही झडत होता. ते अगदी साध्या भाषेत बोलत होते, तरी मार्मिकपणा जाणवत होता. स्वतःच्या कथांबद्दल जाणकार कलावंताला जी सहज जाणीव असते तशी त्यांना होती असं चर्चा करताना वाटत होते. ' कमाई ' हे शीर्षक अर्थपूर्णतेने त्यानी दिलेलं आहे हे त्यांच्या चर्चेतून कळलं. कथेतील अनेक ठिकाणची सूचकता कशी सहज आली आहे, याचे ते दाखला देऊन स्पष्टीकरण करत होते हे सगळे लक्षात घेता त्यांची कलात्मकतेची जाण किती पक्की आहे हेही अनुभवाला येत होतं चार साडेचार तास गप्पा होऊन ही बैठक संपली.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# कादंबरीकार गो. नी. दांडेकर

## चंद्रकांत बांदिवडेकर

गो. नी. दांडेकरांची 'शितू' कादंबरी १९५३ मध्ये प्रकाशित झाली तेव्हापासून गेली २५-२६ वर्षे गो. नीं. नी प्रचुर कादंबरीलेखन केले आणि त्यांना अमाप लोकप्रियताही मिळाली. आप्पासाहेब दांडेकरांच्या कादंबऱ्यांचा विचार करताना काही ठळक गोष्टी सहज लक्षात याव्यात. गो. नी. दांडेकरांचा लेखक म्हणून जो पिंड आहे तो अतिशय सात्त्विक आणि भावनाशील आहे. त्या बाबतीत त्याचे गोत्र सानेगुरुजींशी जुळणारे आहे. गो. नी. मनाने ऐतिहासिक किंवा गतकाळातच रमणारे पुनरुत्थानवादी लेखक आहेत. जिद्दीला पेटले तर 'आम्ही भगीरथाचे पुत्र'सारखी समकालीन जीवनाला आवाक्यात घेणारी कृती लिहू शकतात, पण त्यांच्या लेखनाला आपला खरा सूर सापडतो तो गतकालीन जीवनाचा वेध घेण्यात. मग शिवकाल उभा करण्याच्या उद्देशानं लिहिलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्या असोत अथवा ज्ञानेश्वरांचं भावजीवन तल्लीनतेने व्यक्त करणारी 'मोगरा' असो. जुन्या मूल्यांना जिद्दीनं कवटाळून असणारा 'पवनाकाठचा धोंडी' त्यांना भारून टाकतो. जुन्या सात्त्विक परंपरागत मूल्यांची प्राणपणानं जपणूक करणारी 'मृण्मयी' त्यांना मोहून टाकते. ग्रामीण जुन्या जीवनाची चौकट विस्कटून जात असताना 'पडघवली'ची कथा त्यांना विद्ध करते. यांत्रिक युगापासून खूपच दूर असलेली 'पूर्णामायची लेकरं' त्यांच्या भावनेचा कौतुक विषय होऊन बसतात. 'आनंदभुवन'मधलं महारोगानं पिडलेलं दाम्पत्यसुद्धा ख्रिश्चन आश्रमात धर्मावर झालेला आघात पाहून विद्रोहाचं निशाण फडकावतं. 'कुणा एकाची भ्रमणगाथा'मध्येही त्यांना गतजीवनातील कटु-मधुर अनुभव मिष्किलपणे म्हणा किंवा भारावून जाऊन म्हणा न्याहाळावेसे वाटतात.

### वैचारिक प्रक्षोभाचा अभाव

गो. नीं. ना सात्त्विक, सरळ आणि उदात्ततेच्या संस्कारगत कल्पनांना कवटाळून बसणारी माणसं अधिक मोहित करतात. याचकाच्या पुढे आपला देह समर्पित

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

करणारी कुणी मीरा त्यांना वर्षानुवर्षे झपाटून टाकते आणि 'मृण्मयी'मध्ये साकार होऊन येते. जीवनात सहजपणे संस्कारानं म्हणा किंवा जुन्या श्रद्धांच्या परिणामानं म्हणा, स्वीकारलेल्या श्रेयाच्या कल्पनांसाठी झगडणारी माणसं त्यांना प्रभावित करतात. त्यांच्या भावनात्मक आंदोलनाचा मनानं ते प्रत्यय घेतात व नंतर त्या भावनात्मक आंदोलनांना साकार करण्यासाठी कथेची बांधणी करतात. कथा सांगण्याचं चांगलं कसब गो. नीं. कडे असलं तरी कथेची विचारपूर्वक जुळवाजुळव करावी, कथेमध्ये उत्सुकता, जिज्ञासा उत्पन्न करावी असा त्यांचा उद्देश कधीच नसतो. त्यांना पुढं ठेवायची असतात ती काही माणसं. ही माणसंही अशी तऱ्हेवाईक, विक्षिप्त, प्रचंड वा असामान्य असतात. आपलं सामान्य असंच जीवन काही श्रेयांच्या कल्पनांनी भारून जगू पाहणारी ती असतात. साहजिकच विवेकाला स्तिमित करील, विचारांना आवाहन करील, भावनांमध्ये प्रचंड उलथापालथ घडवील अशी घटना वा तसं चरित्र गो. नीं. च्या कथावाङ्मयाचा विषय होत नाही. ती भावुक असतात. एकेरी असतात. आपल्या सहज संस्कारांना घट्ट चिटकून बसणारी असतात. यामुळेच गो. नीं. च्या लिखाणात प्रक्षोभक असं काही असत नाही. गो.नीं.ची प्रचंड निरीक्षणशक्ती जाणवते, स्मरणशक्तीचं कौतुक वाटतं पण गो. नी. विचारवंत किंवा चिंतनशील लेखक नव्हेत ही त्यांची मर्यादाही स्पष्ट होते. गो. नी सामान्य माणसाच्या अनुभवविश्वाचे व्यवस्थित आविष्करण करतात. त्यांची पात्रे आपले भावसमुच्चय, आपल्या आस्था, आपले विचार घेऊन येतात. त्यांत बदल घडवायला ती तयार नसतात. म्हणूनच त्यांच्यात 'वाढ' नसते. त्यांचे दर्शन स्पष्टपणे घडून जाते. ती पात्रे आकस्मिक वर्तनानं चकित करणार नाहीत, वाचकाला बुचकळ्यात टाकीत नाहीत, त्यांना धक्के देत नाहीत. गो. नीं. ची पात्र विविध धंदे करणारी, विविध भाषा बोलणारी, विविध वयाची असतात, पण त्यांचा आंतरिक आत्मा जवळजवळ सारखाच असतो. म्हणूनच विविध व विपुल पात्रनिर्मिती करूनही एखाद्या वैचारिक वादळाचं निमित्त व्हावं अशी शक्ती गो. नीं. च्या पात्रांत दिसत नाही.

## निसर्गप्रेमी लेखक

गो. नीं. ना निसर्गाचं अपरंपार वेड आहे. निसर्गाची अशी वेड लावणारी ओढ फारच कमी लेखकांच्यापाशी असते. निसर्गाची त्यांची ओढ केवळ डोळ्यांना सुख-विणाऱ्या संवेदनापुरती मर्यादित नाही. निसर्गातल्या प्रत्येक वृक्षाचं, पानाचं, प्राण्याचं वेगळं वेगळं व्यक्तित्व त्यांना जाणवत असतं. निसर्गाची त्यांच्या मनावर मोहिनी असतेच, जादू वा भूल पडतेच, पण त्या जादूत निसर्गाचं वैविध्यपूर्ण रंगरूप व त्याचे आकार वितळलेले नसतात. त्यांना वृक्ष-वल्लरींची नावं माहीत असतात. त्यांचे गुण-धर्म माहीत असतात. त्यांचं ऋतुमान माहीत असतं, प्राण्यांच्या लकबी माहीत असतात.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांच्या गुणधर्मांचं ज्ञान असतं. कधी एखाद्या वनस्पतिशास्त्रज्ञासारखं गो. नीं.चं रूप दिसू लागतं. पण हा निसर्ग त्यांना प्रिय असतो, त्यांच्या आंतरिक व्यक्तित्वाचा तो एक भाग बनून गेलेला असतो. कधी हा निसर्ग त्यांना झपाटून टाकतो व 'माची-वरचा बुधा' सारखी सुंदर नेटकी कलाकृती त्यांच्या हातून लिहिली जाते. गो. नीं.-ना मातीची अनावर ओढ आहे. त्यातही कोकणच्या मातीची ओढ प्रचंड आहे. ओढीनंच गो. नीं. ची मानसकन्या मनू वैवाहिक जीवनाचं दिव्य करते आणि वैवाहिक सुखाचा कणही मिळाला नसला तरी मातीच्या सेवेत तिला जीवनसार्थक्याची तृप्ती लाभते. गो. नी. जमिनीशी संबंधित सर्व प्रकारच्या श्रमांची मोठ्या बारकाईनं वर्णन करतात. शेतकरी जीवनाचे तपशील त्यांच्या कादंबऱ्यांतून मोठ्या नेटकेपणानं येत असतात. प्रत्यक्ष काम करणाऱ्या माणसांची तल्लीनता व ते काम यांचं रेखीव चित्र हे गो. नीं. चं एक खास महत्त्वाचं देणं आहे.

## शितू : भावुक प्रेमाची गाथा

'शितू'ची पाठवणी करताना गो. नी. लिहितात, "अनेकांनी डोळे पुशीत आपले अंतर हालले असल्याची कबुली दिली." या वाक्यात गो. नीं. नी शितूचंच वैशिष्ट्य सांगितलं असं नाही, त्यांनी एकूण आपल्या लेखनाचंच वैशिष्ट्य सांगितलं आहे. साहित्यास्वादाच्या वेळी गलबलून जाणारा, डोळे पुसणारा वर्ग गो. नीं च्या पुढे असतो आणि या वर्गाच्या अभिरुची, भावना, श्रद्धा व समजुती यांना गो. नी. जपत असतात. कोकणकन्येच्या निर्मितीसाठी किती परिश्रम त्यांनी घेतले याचं वर्णनही गो. नीं. नी केलं आहे. एकदा एखाद्या पात्राचा परिसर ठरला की, त्याच्या उभारणीसाठी बारकाईनं अवलोकन करणं हे गो नीं. चं महत्त्वाचं वैशिष्ट्य आहे. आणि ते जवळ जवळ सर्वच कादंबऱ्यांतून आढळून येते. शितूच्या पाठवणीत गो. नीं. नी आणखी एक सांगितलं आहे. "शितू हे एक प्रेमकाव्य आहे. चहूदिशांनी कोंडमारा झालेली प्रेमभावना कुण्यातरी मार्गानं बाहेर निसटून कोणा एकाचे हाती आपले सर्वस्व सोप-विण्यासाठी धडपडत असते. ईश्वरीय प्रेमाचे हे देणे परिस्थितीमुळे कितीही काजळले तरी कुण्याना कुण्या रूपाने आविष्कृत होणे हा त्याचा धर्म आहे." तसंच "शुद्ध प्रेम फलस्वरूप आहे—जशी चंदनाची झाडे. त्यांना फळे न देताही त्यांचे जीवन कृतार्थ झाले. प्रेमाचे तसे आहे." "शितूच्या निर्मळ मनी या ईश्वरीय प्रेमाचा उदय झाला. त्याला आप्पांच्या संस्काराचे खत मिळाले. विसूच्या देवभावाने पूजा करून ते धन्य झाले." "त्या दिव्य प्रेमाची ही गाथा." त्यात प्रेमाविषयी व्यक्त झालेली भावना व दृष्टी 'शितू' पुरती मर्यादित राहिली नाही. गो. नीं. नी जवळ जवळ सर्वच कादं-बऱ्यांतून अशाच तऱ्हेच्या दिव्य प्रेमाचं चित्रण केलं आहे. हे प्रेम सात्त्विक आहे, उत्कटही आहे, पण ते एकरस आहे. प्रेमाच्या तरल, बदलत्या, असंख्य रूपे घेणाऱ्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

भावेच्छा गो. नी. कुठे रंगवू शकले नाहीत. शितूच्या आरंभीच एक नाटकी प्रसंग आहे. 'शितू'चा विसू म्हातारा झाला आहे, वेडा झाला आहे. त्याला नागाबद्दल विलक्षण चीड आहे, कारण त्याचे आप्पा काळा नाग चावून वारले आहेत. त्याच्या व शितूच्या प्रेमाचे धिंडवडे या घटनेनंतर झाले आहेत. त्यानं काळा नाग पकडला. वारुळात सोडून दिला. या घटनेनं भिकू जोगदेवाला विसूच्या जीवनाचं मर्म जाणून घेण्याची इच्छा झाली आहे. भिकू जोगदेवाला ही 'आपली माणुसकी हरपली नाही' हे दाखविण्याची संधी लाभते. उधळत येणाऱ्या पिसाळलेल्या बैलाला अंगावर घेऊन तो त्याच्या मुस्कटात मारतो. या घटनेत म्हातारा विसू हलला आहे आपलं भंगलेलं स्वप्न सांगायला तयार झाला आहे. वेळशी गावातली तीस वर्षांपूर्वी घडलेली प्रेमकथा विसू सांगायला सुरुवात करतो.

एक गोड, सुंदर कुणबी जातीची कन्या शितू दुर्दैवी आहे, कारण गावच्या दृष्टीनं तिनं दोन नवरे 'खाल्ले' आहेत. ती पांढऱ्या पायची आहे. तिला आप्पा खोतांचा आधार आहे. गो. नीं. च्या साहित्यात खोत दुष्ट नसतो. श्रीमंत अत्याचारी अन्यायी असतोच असं नाही. विचारानं, मनानं, आचरणानं आदर्श, "देवानं आप्पांना दोहो हातानी दिलं आणि त्यांनी ते गावाला चौ चौ हातांनी वाटलं!" साहजिकच गो. नीं.च्या कादंबरीत आर्थिक विषमतेच्या पोटी उद्भवणारे संघर्ष टळतात व ते सात्त्विक माणसं विरुद्ध दुष्ट माणसं असं ढोबळ रूप धारण करतात. गो. नीं. नी विसूला शरद्‌बाबूंच्या श्रीकांतप्रमाणं हूड, उनाड, भटक्या, मनस्वी पण अंतर्यामी अतिशय प्रेमळ दाखवला आहे आणि त्याला उठावदार करण्यासाठी आणि त्या निमित्ताने खेडेगावातील भाऊबंदकी, स्वार्थ, मिळकतीच्या वाटण्या वगैरे वस्तुस्थिती दाखविण्यासाठी विसूचा भाऊ सदू निर्मिला आहे. व्रात्य विसू थोडा मऊ व्हायचा तो शितूजवळ. या दोघांच्या निष्पाप, उत्कट, पवित्र स्नेहबंधांचे सुंदर चित्र गो. नीं. नी काढलं आहे. शितूची त्यागमयी, सोशिक, भावोत्कट वृत्ती प्रकट करणारे अनेक लहानमोठे प्रसंग त्यांनी निर्मिले आहेत. शितू विसूचं कोवळं पण उत्कट प्रेम खूप खोलवर गेल्यावर विसू महाडला शिकण्यासाठी जातो. सदूनं फायनलपर्यंत मजल मारल्यावर शिक्षण सोडलं. घराच्या व शेतीच्या कामाकडे लक्ष घातलं. शितूच्या प्रतीक्षारत कोमल मनात काटे रुतत असत ते सदूच्या बोचऱ्या बोलण्याचे.

विसू शितूचं पुनर्मीलन होतं ते विसू मॅट्रिक होऊन आल्यावर. जुनं खोलवर गेलेलं प्रेम आता शारीरिक अतृप्तीच्या जाणिवांनी अधिक बंधहीन होऊ पाहात होतं आणि ही उत्कट लालसा मनी बाळगून ही धुंदीच्या क्षणी स्वतःला व स्वतःपेक्षाही विसूला —विसूच्या लौकिकाला, आप्पा खोतांच्या विश्वासाला, आपल्या पांढऱ्या पायाच्या छायेपासून विसूला वाचवायचं होते. शितूला—एका मनानं विलक्षण सात्त्विक खेडवळ तरुणीला आप्पा खोतांना काळा नाग चावतो आणि त्याचं छत्र नाहीसं झालं तेव्हा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गावच्या विरोधालासुद्धा मोठी धार येते. खरं म्हणजे आप्पांच्या मृत्यूमुळं निर्माण झालेल्या भयानक रितेपणाच्या पोकळीत विसूला गरज असते ती शितूच्या प्रेमाची, पण गावच्या गटार गप्पांनी विटलेली शितू यांच वेळी विसूला संभाळू शकत नाही! आपल्या दुर्दैवी जीवनाचा त्रास होऊ नये म्हणून शितू विसूपासून दूर जाऊ पाहते, पण त्यामुळे विसू अधिक दुःखी होतो. त्याला एका नायकिणीच्या नादी लावण्याचाही कट केला जातो आणि विसूचा पाय घसरू नये म्हणून शितूला यावं लागतं. येताना नदीचा प्रवाह पोहून पार करण्याचा प्रयत्न ती करते. त्यात बुडून मरते. विसू आप्पा आणि नंतर शितू दोघांच्या मृत्यूच्या धक्क्यानं भणंग आयुष्य स्वीकारतो.

या कथेचा आरंभ जसा नाटकी आहे तसा शेवटही भडक वाटतो. विसूच्या घरी नायकिणीचं येणं आणि त्या वेळी विसूला वाचविण्यासाठी शितूला आणताना तिचं नदीत बुडून मरणं—या घटनांत नाटकीपणा आहे. विसू–शितूची ही दुर्दैवाचा शाप असलेली प्रेमकथा एकेरी आहे. ती डोळ्यांत पाणी आणणारी आहे, पण समाजाची फारशी भक्कम चौकट तिला लाभलेली नाही. भावनांना हलविण्याच्या प्रसंगात गो. नीं. चा हरिदासी गोष्टीवेल्हाळपणा नाटकीपणाने काही घटना घडवून आणतो व प्रगल्भ वाचकाला त्यातला कृत्रिमपणा बोचत राहतो.

या कथेला कोकणची पार्श्वभूमी आहे. कोकणची नैसर्गिक चित्रंच गो. नीं. नी शब्दांकित केली आहेत असं नव्हे तर कोकणी ब्राह्मणांची व कुणब्यांची भाषाही त्यांनी उत्तम तऱ्हेने वापरली आहे. कोकणचे खेळ, कोकणातच घडू शकणाऱ्या विशिष्ट घटना, कोकणच्या वृक्षवेलींचा वास आणि मळयांचा, बागांचा रंग यांचा समरसून उपयोग करून घेतला आहे. पण कोकणी माणसाचा निबर आत्मकेंद्रितपणा, तुसडेपणा, एक प्रकारचा सिनिक दृष्टिकोण याची प्रतीती या कादंबरीत प्रकर्षाने येत नाही.

## वास्तवाची मर्यादा

गो. नी. कौशल्यानं दृष्टीला दिसणाऱ्या व कानाला ऐकू येणाऱ्या ऐंद्रिय वास्तवाच चित्र रेखाटतात. पण त्याच्या मागच्या गुंतागुंतीचा वेध घेण्याचा त्यांचा प्रयत्नही नसतो. परिणामतः विविध बोल, असंख्य माणसांच्या व्यवहाराचे व क्रियाव्यापारांचे तपशील अचूक असले तरी एक रेखा व रंगांनी आकारित झालेलं चित्र आपण पाहतो आहोत असा भास होत राहतो. त्याच्यामागे चित्राला गहनतेचं परिणाम देणारं वास्तवाचं भान गो. नीं. च्या कादंबऱ्या करून देऊ शकत नाहीत. ही मर्यादा फार मोठी आहे. गो. नीं. च्या साहित्यात समांतर (Horizontal) वैविध्य आहे. खोलपणाच्या वैविध्याची परिमाणे नाहीत.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## पडघवली : गतकालाची स्मरणगाथा

गो. नी. मनानं जसं समकालीन जीवनात वावरत नाहीत, तसेच त्यांचे मन नागरजीवनातही रमू शकत नाही. नागरजीवन, यंत्रसंस्कृती, संमिश्र समाजव्यवस्था, त्यातील व्यक्तींच्या समस्या व व्यथा गो नीं ना जाणवत नाहीत. गतकालीन जीवनातील श्रेय व प्रेय कल्पना गो. नी. उराशी जपतात. त्यांच्या ‘ पडघवली ’ ( १९५५ ) कादंबरीचा ‘ परिचय ’ या दृष्टीने तपासण्यासारखा आहे. “ ‘ पडघवली ’ ही कादंबरी नव्हे. ते एका नष्ट होऊ घातलेल्या खेड्याचं शब्दचित्र आहे.” “ प्राचीन समाजव्यवस्थेवर हे जे वादळ कोसळले आहे त्याचा साक्षी होऊन मी व्यथित मनाने ही पडझड प्रत्यक्ष अनुभवली आहे.” हे शब्दचित्र व्यथित मनोभूमिकेतून निर्माण झाले आहे. ही व्यथा गो. नीं. नी अनुभवली आहे याचा प्रत्यय पडघवली वाचताना येतो हे तर खरेच. पण या व्यथेचा संदर्भ पाहिला पाहिजे. गो. नीं. ना प्राचीन समाजव्यवस्था मोह घालीत होती. या प्राचीन समाजव्यवस्थेच गो. नीं. नी काढलेलं चित्रही एकांगी आहे, कारण एका विशिष्ट मनाच्या काचेतून या चित्राकडे पाहिलं गेलं आहे. ते मन हळवं आहे, भावनाविवश होणारं आहे. कोमल आहे, पण उच्च मध्यमवर्गीय संस्कृतीनं, त्यातही ब्राह्मणी संस्कारांनी ते मन मर्यादित झालेलं आहे. आधुनिकतेचे संस्कार या मनावर फारसे झालेले नाहीत.

लोककथा, दैवीकथा, राखणदार नाग, स्वप्नात येऊन नागाच्या गंडमाळा कापण्याचा आदेश व तशी पुढे कृतीही, रावोभटजींचं दिव्य, गिरोबाचं झाड, भुतंखेतं, सामक्षा होणं, मंत्रांचा प्रभाव या सर्वांचा गो. नीं. नी वातावरणनिर्मितीसाठी किंवा एकूण ‘ पडघवली ’ला जिवंत व्यक्तित्व देण्यासाठी उपयोग करून घेतला आहे आणि हा उपयोग श्रद्धाळू मनानं करून घेतलेला आहे. निसर्गाची तपशिलासहित काढलेली चित्रंही पडघवलीला मूर्तता देतात गावातील माणसं एकमेकांशी आपुलकीनं बांधलेली आहेत. राक्षसासारखा काम करणार गेंगाणा कुणबी व त्याचा खोत यांचे संबंध प्रेमळ आहेत. गेंगाणा राक्षसासारखं काम करतो, खोताशी तो इमान राखून असतो, पण तरीही त्याची जीवनराहणी खोतापेक्षा फारच खालच्या दर्जाची असते व ती का असते असे सामाजिक व्यापक जाणिवेतून उद्‌भवणारे प्रश्न गो. नीं. ना छळत नाहीत. कारण गो. नी ग्रामीण जीवनाकडे ज्या सुखवस्तू मध्यमवर्गीय दृष्टिकोणातून पाहतात तीच स्थितिशील आहे. भोळीभाबडी आहे. म्हणूनच येसदासारखा कुणबी गो. नीं. ना फार महान वाटला तरी एकूण सामाजिक संदर्भात विचार करताना जुन्या शोषण करणाऱ्या रूढींनाच तो कवटाळून बसणारा एक सज्जन पण भाबडा माणूस वाटतो.

‘ पडघवली ’ उजाड होते ती व्यंकू भावजीसारख्या खल, लंपट, फसव्या पण हुषार माणसामुळे–हे समस्येचे फार सुलभीकरण वाटते. प्रस्तावनेत शहरीकरणाचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रश्न गो. नीं. नी उपस्थित केला आहे पण प्रत्यक्ष कादंबरीमध्ये या वास्तवाचा संदर्भ चुकूनही येत नाही पडघवलीतील काही माणसे जुन्या मर्यादा सोडतात, नीतिनियम धाब्यावर बसवतात म्हणून पडघवलीची समृद्धी संपते हा दृष्टिकोण समंजस वाचक स्वीकारू शकत नाही. खेड्यात हिंदु-मुसलमानांचे संबंध बिघडू लागल्याचे गो. नी. सूचित करतात, पण त्याला अधिक पुष्ट संदर्भ ते देत नाहीत.

तरीही 'पडघवली'मध्ये काही सामर्थ्य आहे. पघडवलीत सुंदर निसर्गचित्रे आहेत, जुन्या जमान्यातल्या आस्थांचे, श्रद्धांचे, भावुकतेने केलेले चित्रण आहे. हे सर्व चित्रण अंबूसारख्या समंजस, सद्‌भावनापूर्ण पण खेडवळ स्त्रीच्या मनाच्या पातळीवरून केलेले आहे. म्हणूनच वर निर्देशिलेल्या उणिवा प्रत्यक्ष वाचताना तेवढ्या बोचत नाहीत, सह्य होतात. ज्या स्त्रीची जीवनाविषयीची जाण 'मातीची सेवा केली तर पडघवली ताकभाताला कमी पडू देणार नाही' इतकी मर्यादित व आत्मसंतुष्ट आहे. तिच्या मनाला पडघवलीची पडझड व्यथित करील यात शंका नाही, पण म्हणून 'त्या जीर्णशीर्ण कोसळू पाहणाऱ्या खेड्यातील घरकुलाकडे वळावे ही गो. नीं. ची अपेक्षा पूर्ण होईल असे वाटत नाही. मानवी व्यथेला विचारांचा भक्कम आधार नसला तर ती अती हळवी होते आणि परिणामकारकतेत उणावते.

## पवनाकाठचा धोंडी : स्थितिशील परंपरांची ओढ

एका बाजूनं गो नी. प्रयोगधर्मी लेखक आहेत. हे प्रयोग तंत्राचे वा अभिव्यक्तीच्या प्रणालीचे नसतात. गो. नी. निरनिराळे परिसर निवडतात. त्या परिसरातील लोक-जीवन, व्यवहार, व सांस्कृतिक धार्मिक रीतिरिवाज, निसर्ग, भाषा, बोलण्याच्या लकबी या सर्वांचं विलक्षण बारकाईनं अवलोकन करतात. पण त्यांच्या या प्रयोगधर्मीपणाची एक मोठी सीमा आहे. ती सीमा म्हणजे हा प्रयोगधर्मीपणा बाह्य वास्तवापुरताच मर्यादित राहतो.

'पवनाकाठचा धोंडी' (१९५५) 'बदलत्या परिस्थितीच्या पुराबरोबर वाहात जावयाचे नाकारणाऱ्या एका झुंजार माणसाची ही कथा' आहे. या कथेचा परिसर मावळ प्रदेशाचा आहे. हा माणूस झुंजार आहे खरा, पण तो स्थितिशील परंपरागत जीवन जगत असतो ते लक्षात घेतलं तर व्यापक अर्थानं तो जडशीळ झालेला असतो. पवनाकाठच्या धोंडीची ही कथा आकर्षून घेते ती त्याच्या विलक्षण जिद्दीमुळे. तो ज्या जुन्या पद्धतीचा व मूल्याचा आग्रह धरतो त्याबद्दल आधुनिक मनाच्या वाचकाला किंचितही आस्था वाटणे अशक्य आहे. दांडेकर सामंती समाजव्यवस्थेचे पुनरुत्थान करू पाहणाऱ्या विचारसरणीचे लेखक वाटतात. ते अशा व्यक्तींशी मनाने समरस होतात. भावविवशतेनं लिहितात. धोंडी हवलदार स्वतःला दहा एकर जमिनीचा राजा समजतो. तो स्वाभिमानी आहे, जिद्दी आहे, विलक्षण तेजस्वी आहे. त्याचा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पीळ दांडगा आहे. बलुत्याची प्रथा कालबाह्य झाली असली तरी ती जागी ठेवण्याचा त्याचा हास्यास्पद प्रयत्न त्याच्या वरील गुणामुळेच वाचक सहन करू शकतो. म्हैस आणून दुधाचा धंदा करणाऱ्या कोंडीला दांडेकरांनी नीटसे समजून घेतले नाही. त्याच्यावर शहरी प्रभाव दाखविताना तो जितक्या खोलात जाऊन दाखवायला हवा होता तेवढा दाखविला गेला नाही. कोंडीचे पैसे घ्यायला नकार दिल्यामुळे झालेल्या वेदनेचा पुरेसा मागोवा दांडेकर घेऊ शकले नाहीत. वहिनी मायला डॉक्टरांचे औषध द्यायला नकार देणाऱ्या भावाबद्दलची स्वाभाविक चीड व त्यातून उद्भवणारी मानसिक गुंतागुंत आणि त्याचा परिणाम धोंडीला मारण्याचा प्रयत्न दाखवला गेला असता तर कोंडीचे स्वभावरेखन अधिक विश्वसनीय व अधिक भरीव झाले असते. पण गो. नीं. नी तसे दाखविले नाही, कारण धोंडीला विरोध म्हणजे चांगल्याला विरोध असे सरळसोट वर्गीकरण दांडेकरांनी करून टाकले. परिणामी कादंबरीला एकांगीपणाने एका व्यक्तीचे केलेले गुणगान एवढाच मर्यादित अर्थ आला.

या कादंबरीला जमेच्या बाजू आहेत. जिथे लोकव्यवहार, लोकव्यापार, सण, उद्योग, खेळ यांची हृक्‌प्रत्यय देणारी वर्णने करण्याचे प्रसंग येतात, तिथे दांडेकरांची लेखणी विलक्षण ताकदवान होते. पोळ्याचा सण, बैलांच्या स्पर्धा, कुस्त्या, गावजेवणे असली वर्णने खूपच प्रत्ययकारी होतात. भारतीय सामान्य माणसाच्या मनात खोल रुजलेल्या भावनांना उभारी आणून त्याला गलबलून सोडण्याचे गो. नीं. चे कसब दांडगे आहे. एकत्र कुटुंबाच्या व्यवस्थेतील स्नेहमय संबंध आजही शहरी माणसाला जुन्या स्मृतींना जाग आणल्यासारखे सुख देतात. पण अशा प्रसंगात फारसा संमिश्रपणा, जटिलपणा नसतो. मानवी मनाच्या अद्‌भुतपणाची जाण नसते. ते एकांडे असतात. ही कादंबरी वाचताना एका समाजव्यवस्थेशी आपला परिचय होतो आहे असे वाटत नाही एका व्यक्तीशी परिचय होतो असे वाटते. विशेष म्हणजे व्यवस्थेतील अनेक घटकांचा बाह्य परिचय गो. नी. देतात, पण त्या घटकांचे गुंतागुंतीचे अंतःसंबंध व त्या संबंधाच्या तळाशी असलेले वास्तव यांची जाण गो. नी. देत नाहीत. धोंडीसारखी त्यागी, भावुक, श्रद्धाळू माणसे दाखवताना गो. नीं. मधील लेखक अधिक आवेशात येतो धोंडीचा तुटकेपणा वैयक्तिक वाटतो. सामाजिकतेची, प्रातिनिधिकतेची तिला बैठक नसते म्हणून कादंबरीत सघनपणा येत नाही.

गो नी. दांडेकरांचे एक भाग्य असं आहे की, जे अन्य कुणाही मराठी लेखकाला लाभलेलं नसावं. बाह्य जीवनाचे वैविध्यपूर्ण रूप जितकं दांडेकरांना पाहता आलं तितकं अन्य कुणालाही पाहता आले नाही. एका काळी वैरागी होऊन अनेक प्रदेश धुंडाळणाऱ्या, अनेक स्थलांना पायाखाली घालणाऱ्या, अनेक तीर्थांना भेटी देणाऱ्या गो. नीं. नी 'कुणा एकाची भ्रमणगाथा' ( १९५७ ) लिहावी आणि आत्मप्रत्ययाच्या स्पर्शाने ती रसरशीत व्हावी हे स्वाभाविकच होतं. नर्मदा नदीची परिक्रमा करण्याच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उद्देशाने निघालेल्या एका आगळ्या साधूच्या जीवनातला हा अनुभवांश मोहाच्या झाडाखाली बसून जीवनाचे प्रत्यावलोकन चालले आहे. साधूच्या जीवनातले प्रसंग विनोदी, गंमतशीर, भयकारी, करुणाजनक. हा साधू आगळा अशासाठी वाटतो की, हा तसा धर्मनिष्ठ नाही. वैराग्यवृत्तीनं विरक्त झालेला नाही. परंपरागत धर्माची बंधनं ओझ्यासारखी यानं मनावर वागवली नाहीत. जीवन जगण्यासारखं आहे असं मानणारी, निसर्गसौंदर्याची खूप आसक्ती असलेला हा साधू चित्तशुद्धी, उपासतापास, साधना, ध्यान, मठ, महंत, इत्यादींकडे मिस्किलपणे पाहू शकतो, कारण त्याच्यामध्ये ढोंग नाही. मृत्यूविषयी त्याला भय आहे, पण वेगळं आकर्षणही आहे. त्यानं घेतलेल्या अनुभवांत भयानक भुकेचे, दारिद्र्याचे अनुभव आहेत. जंगली प्राण्यांशी झालेल्या सामन्याचे, कुत्र्याशी झालेल्या मैत्रीचे अनुभव आहेत. महारवाड्यातले व देवळातले अनुभव आहेत. हे सामान्य मध्यमवर्गीय वाचकाला वेगळे वाटतात. गो. नीं. च्या चटकदार निवेदनशैलीमुळे आकर्षकही वाटतात.

विरक्त मठाधीशाच्या दर्दभऱ्या प्रेमकहाणीनं या आकर्षणात भर घातली आहे. पुरी व लक्ष्मी यांच्या चिरविरहात परिणत होणाऱ्या संयत प्रेमाबरोबरच दोन पुरुषांशी संसार करणारी पण महारोगी बनून भीक मागत राहणाऱ्या आपल्या प्रियकराबद्दल ओढ असलेली जगाच्या दृष्टीनं कलंकिनी पण व्यापक अर्थानं मोठं मन असलेल्या स्त्रीची प्रेमकहाणी या कादंबरीचे मूल्य वाढवते: " अँसुवन जल सींच सींच प्रेमबेलि बोई "– मीरेनं कृष्णाबद्दल म्हटलं आहे पण या लौकिक जगात अशी कितीतरी प्रेमवेडी माणसं अस्वस्थ करून टाकतात. या प्रेमकहाण्यांशी संबंध आला एका साधूचा! एवढंच नव्हे तर या साधूच्या जीवनातच रामाधारजींच्या आश्रमात एक विधवा तरुणी यशोदा प्रेमाचं देणं घेऊन येते! जीवनाचं सार्थक झाल्याचा आनंद देणारा यशोदेचा सहवास साधूला मिळतो. अल्पकाळ यशोदा व साधू यांच्या अतिशय अबोल परंतु तीव्र, संयत परंतु सच्च्या, मूक पण समंजस प्रेमाचा विकास अतिशय हळुवारपणे एका विशिष्ट रेषेपर्यंत गो. नीं. नी दाखविला आहे. स्त्रीची अनेक रूप साधूनं पाहिली पण यशोदा आल्यानंतर प्रथम जाणवलं ते हे की " बाहेरून दिसतं ते स्त्रीचं खरं स्वरूप नव्हेच मुळी. " यशोदेने त्याच्या जीवनदृष्टीतच परिवर्तन केलं. " आता कुठं कळू लागलं आहे. एक सबंध तप डोळ्यांवर पट्टी बांधून हिंडीत होतो. आता दृष्टी फाकली आहे. स्त्रीजातीच्या वेदनांची व्यथा चहूकडे दरवळतेय. आता तो गंध घ्यायची शक्ती लाभलेय. " यशोदा आणि साधू यांचं प्रेम लौकिक अर्थानं सफल होण्यासाठी निर्माण झालेलं नव्हतंच मुळी. जनमताची, मनावरच्या परंपरागत बंधनांची दडपण फेकणं यशोदेला शक्य नव्हतं आणि तिला बरोबर घेऊन परिक्रमा करण्याची शक्ती ही त्या दुबळ्या साधूमध्ये नव्हती. गो. नीं. ची माणसं अशा धातूची नसतातच. पण ही भ्रमणगाथा एक हवाहवासा संस्कार मनावर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सारखा करीत राहते. तो म्हणजे, "एवढं तीव्र दुःख सोसून हा माणूस जगतो. त्यानं जगलंच पाहिजे. ईश्वराघरचं हे दान विस्कटून टाकायचा कुणालाचा अधिकार नाही." जीवनाचा हेतू काय, वेदनेचा अर्थ काय, तिचे स्थान कोणतं असले प्रश्न निर्माण झाले तरी गो. नी. त्यांचा पाठपुरावा करीत नाहीत. कारण या प्रश्नांच्या मागोव्यासाठी लागणारी अमूर्त चिंतनाची क्षमता गो. नीं. मध्ये नाही. ते मूर्ततेचे, प्रत्यक्षाचे चित्रकार आहेत.

गो. नीं. ची ही कादंबरी अतिशय लोकप्रिय झाली त्याचं एक कारण वर सुचविल्याप्रमाणे मध्यमवर्गीय वाचकाला न मिळणारे अनुभव आहेत. गो. नीं. ची प्रकृती कथानिवेदकाची आहे. त्यामुळे वेळोवेळी निवेदित केलेल्या अनुभवांत चटकदारपणा आहेच. लक्ष्मी, पुरीजी, पांडवधर्मी स्त्री, यशोदा, साधू यांच्या प्रेमकथांमुळे आकर्षण निर्माण झालं आहे. या सर्वच प्रणयाला सात्त्विकतेचं, त्यागाचं, पावित्र्याचं अधिष्ठान आहे. हे वाचकांना आवडणारं असतं. जीवन वेदनामय असूनही ते जगण्यासारखं असतं, ते जगावं, ह्या जगण्यातला निखळ आनंद त्याज्य नसतो, श्रेय असतो असं 'कुणा एकाची भ्रमणगाथा' आवर्जून सांगते. हे खूप आवडणारं असतं.

घटनांच्या निवेदनात गो. नीं. नी खूपच स्वातंत्र्य घेतलं आहे. ते त्यांनी स्वीकारलेल्या रूपबंधाशी संगतही आहे. नर्मदामैयाच्या तीरावर एक मोहाचं झाड. विरळ फांद्याचे. त्याच्या सावलीत बसून नर्मदेच्या अथांग पाण्याकडे पाहात जीवनाच्या भटकन्तीचा हिशोब करतो आहे भ्रमणगाथाकार. स्मृतींच्या रूपानं निवेदित झालेल्या घटनांत साहचर्याचा संबंध आहे. कालानुक्रम नाही. यातील बहुतेक घटना कुणीतरी कुणाला तरी सांगत आहे. त्यामुळं गो. नीं. च्या निवेदकाच्या शैलीला योग्य असंच मोकळेपण मिळालं आहे. कधी नाटकीपणा आला आहे, किंचित भडकपणा आला आहे. अधिक परिणामकारक करण्यासाठी कृत्रिमपणाचा आश्रयही घेतला गेला आहे, पण असे प्रसंग फारच कमी आहेत.

ही भ्रमणगाथा तरुण वयाच्या मर्यादेत संपते. यातल्या घटना सामान्यपणे एकट्याच्या जीवनातल्या आहेत. त्यात वैविध्य असलं तरी गुंतागुंत नाही. सामाजिक विशाल पृष्ठभूमीचा आधार नाही. त्यामुळे कथेला महानतेचं परिमाण लाभत नाही. पांडवधर्मी स्त्रीच्या भावनांचं आविष्करण करताना कथेत काही मूलभूत नैतिकतेचे प्रश्न उभे केले जातील अशी किंचित आशा उत्पन्न होते, पण गो. नीं. चा तो पिंडच नाही. जीवन जगण्यासारखं असतं मग वासना वाईट का, निदान तिला तो जीवनप्रेमी साधू सारखं टाळण्याचा प्रयत्न का करतो, कुठेही गुंतून न घेण्याची त्याची धडपड का? असे प्रश्न गो. नी. विचारतच नाहीत. एक सुंदर, रसरशीत पण व्यक्तिजीवनाचा मर्यादित सात्त्विक अनुभव अतिशय आकर्षकपणे गो. नीं. नी निवेदित केला आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## भाषाप्रभू दांडेकर

गो. नीं. ना साधीसुधी, भोळी माणसं फार मोहवितात. ‘ पूर्णामायची लेकरं ’ अशाच लोकांची कथा. गो. नीं नी म्हटलं आहे, “ वऱ्हाडाच्या खेड्यातील मंथर गतीने, ठेचकाळत चालणाऱ्या जीवनाची ही कथा. ” पण ही जीवनाची कथा होण्यापेक्षा काही माणसांची कथा झाली आहे. एखादा पांडेबाबा सोडला तर सर्वच माणसं अतिशय साधी, एकमार्गी. बोलणं ऐसपैस. त्यांच्या भाषेची, बोलण्याच्या लकबीची विलक्षण जिवंत प्रतीती गो. नी. आणून देतात. या लेकरांच्या सामूहिक व्यक्तिमत्वाचं सुंदर चित्र रेखाटलं गलं आहे. त्यांच्या भोळ्या भाबड्या समजुती, परंपरांचं महत्त्व, स्वभावाच्या भाबडेपणातून निर्माण होणाऱ्या अडचणी, समाजजीवनाचं व्यक्तीवर आलेलं दडपण याचं भावपूर्ण चित्र आहे. खांद्यांवर बसलेल्या मोकिंदानं घट्ट पकडलेलं असताना भूताच्या कल्पनेने त्याला तिथंच टाकून पळणं यासारखे प्रसंग किंचित अतिशयोक्त वाटतात. नंगेबाबाच्या आगमनानंतर सर्व गावजेवण घालण्याचं लचाड पांडेबाबा ज्या तऱ्हेनं बमरामच्या गळयात घालतो ती तऱ्हा वक्तृत्वपूर्ण व अतिशयोक्तपूर्ण वाटते, पण या लेकरांच्या भाबडेपणाकडे पाहून सह्य होते. वऱ्हाडी भाषेचा मूळचा गोडवा या कादंबरीत वेगळीच रंगत आणतो. या भोळ्या लोकांच्या अज्ञानातून, खुळेपणातून निर्माण झालेला विनोद सुखावून जातो. दुल्लभचंदाला विरोध करून आपली शेत त्याच्यापासून राखून ठेवण्याचा रूपरावाचा प्रयत्न नव्या जमान्याचा परिणाम वाटतो. ही सर्वच माणसं आपआपल्या परी मोहून टाकतात. या कादंबरीला खोली नाही पण वेगळ्या प्रदेशाचं यथातथ्य दर्शन घडविण्याचं गो. नीं. चं उद्दिष्ट निश्चितपणे साध्य होतं.

## माचीवरचा बुधा : मातीच्या हाकेतील काव्य

गो नीं च्या निसर्गाच्या अवलोकनाचं, निसर्गाविषयीच्या निखळ उत्कट प्रेमाचं अतिशय प्रत्ययकारी दर्शन ‘ माचीवरचा बुधा ’ ( १९५८ ) मध्ये होते. या चित्रणाला बारकाइनं केलेलं नुसतं वर्णन म्हणता येणार नाही, कारण ते सर्व गो. नीं. च्या जिवंत, चैतन्यमय भावनेचा अर्थात अनुभवाचा भाग होऊन अवतरलं आहे. नरहर कुरुंदकरांनी या रूपसुंदर कादंबरीची शेरेबाजी शैलीत वासलात लावताना अनेक खोटे आरोप केले आहेत. गो. नी. निसर्गावर चेतनगुणोक्तीचा आरोप करतात व तो कृत्रिम व यांत्रिक असतो असं त्यांनी म्हटलं आहे. ही कादबरी त्यांनी नीटशी वाचलेलीही दिसत नाही, कारण बुधा ‘ डोळ्यांना न दिसणारा म्हातारा ( ? ) ’ आहे असा गैरसमज त्यांनी करून घतलेला आहे आणि त्यात नसलेला विसंवाद पाहण्याचा प्रयत्न केला आहे. गो. नी. त्याच्या अधू डोळ्यांचं विस्मरण तर होऊ देत नाहीतच,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पण ठाकराच्या झाडपाल्याच्या औषधानं त्याचे डोळे हळूहळू सुधारतात असंही त्यांनी दाखविलं आहे. बुधाला व्यक्तित्व लाभलेलं नाही असाही एक आरोप आहे.

'माचीवरचा बुधा' हा निसर्गाची हाक ऐकल्यावर शहरी जीवनात अस्वस्थ झालेला माणूस. म्हातारपणी सुखानं दिवस काढता यावेत अशी परिस्थती त्याला लाभली आहे. चांगला प्रेमळ मुलगा आहे, सेवा करणारी गुणी सून आहे. भजनं गाणारे व सुखदुःखात आपुलकीनं विचारपूस करणारे शेजारी आहेत. पण त्याला अस्वस्थ करणारी मातीची हाक इतकी जबरदस्त आहे की. हे सर्व झुगारून आईच्या कुशीत जावं असं त्याला वाटू लागतं. त्यात आपण आईची योग्य सेवा केली नाही याची दुःखद जाणीव त्याला अधिक बेचैन करते. दांडेकरांच्या बुधाच्या अस्वस्थतेचं बेचैनीचं मोजक्या शब्दात प्रभावी चित्रण केलं आहे. हा बुधा आपल्या जमिनीवर जायचा निर्णय घेतो. त्याचा त्याच्या नातेवाइकावर, शेजाऱ्यावर परिणाम होतो. या घटनेत अन्तर्भूत असलेले भावनात्मक संबंध पुरेशा ताकदीनं गो. नीं. नी चितारले आहेत. विशिष्ट वयानंतर, परिपक्वतेनंतर गतकाळातील चुकांची वा अपराधांची एक तीव्र टोचणी माणसाला होत असते हे एक मानवी जीवनातलं सत्य आहे. त्यामुळंच बुधाला अपराधीपणाची जाणीव टोचत राहते. या भावनेनं विद्ध झालेला बुधा आपल्या गावी येतो. निसर्गाचं गोजिरं रूप तो फूल पडलेल्या डोळ्यांनी न्याहाळतो. आपुलकीच्या जगात पुनः प्रवेश झाल्याचा उल्हास बुधाला होतो. तिथल्या वासानं इक्संवेदनांनी वेडावलेला बुधा सर्व वस्तुजातात जिवतपणा असल्याचा तीव्र सुखमय अनुभव घेतो. "त्याच्या वयातली पन्नासपन्नावन्न वर्षं जणू त्या वासानं पुसून टाकली."—असा हरवल्याचा आनंदानुभव बुधाला वारंवार येऊ लागतो. हे 'हरवून' जाणं गाठीला थोडाफार निसर्गसौंदर्याचा संचय असल्याविना कळणं कठीण आहे.

बुधा आता वृद्ध नसतो. नव्या जोमानं जमिनीची सेवा करायला लागतो. ठाकराच्या झाडपाल्याचं औषधही त्याची दृष्टी सुधारतं. निसर्गाची ऋतुमानाप्रमाणे बदलणारी बदलती रूप अतिशय बारकाव्यानं गो. नीं. नी चितारली आहेत. या गतिमय चलचित्रात केव वृक्षवल्लरीच नाहीत, खार, कुत्रा, मधमाश्या, मैना, होले, कोळी, घारी, सरडे सर्व आहेत. माणसांच्या वस्तीच्या आसपास आढळणारे सर्व प्राणी इथे मूर्त जिवंत अस्तित्वानिशी आले आहेत. प्राणी एकमेकांचा क्रूर विध्वंस करतात हे ठीक आहे. पण तशा तऱ्हेचं भयंकर अरण्य हे नाही. बुधाचा कुत्रा समजुतदारपणे वागतो. हे प्राणिजीवनातलं सामान्य सत्य आहे. म्हणूनच माणसाला तो अतिशय आवडतो. या सर्व प्राण्यावर बुधा आपुलकीची शाल पसरतो. निसर्गाच्या कुशीत त्याचा अंतरात्मा सारखा विकास पावत असतो व त्याचा हा विकास गो. नीं. नी फार प्रगल्भतेनं दाखविला आहे. याच वेळी बुधा जुनेच अभंग जुनीच भजनं नव्या जाणिवेनं म्हणतो. आता नाद व सुरांची लय केवळ असते असं नाही, आंतरिक स्पर्शाची

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जाणीव व्यक्त होते. तो काही अभंग अनुभवतो–भोगतो. त्याच्या माणूसपणाचे बंद दरवाजे धडाधड उघडू लागतात. तो प्राण्यांबरोबर बोलतो, वृक्षवल्लरींशी संवाद करतो. काही वेगळेच परात्पर सूर त्याच्या व्यक्तित्वात आत्मिक संगीत निर्माण करतात. फळं ओरबाडून काढणाऱ्या पोराबद्दल बुधा म्हणतो, "पोरंच आहेत ती. त्यांनी नाही द्वाडपणा करायचा तर मग कुणी करायचा?" बुधा लगडच्या सरड्याला झाडावर ठेवू पाहतो. "आरं मी मारीत नाही तुला! उचलून नीट झाडावर ठेवीतो वेड्या!"—हं केवळ क्षणिक नसतं. ही बुधाच्या व्यक्तित्वाची समृद्धता असते. "आज एक सरड्यापाशीच बोलत हुता! कंदी कंदी भैताडावानी नांदुरकीच्या कड्यावर जाऊन कोकनाकडेच बघत बसतो!"—"त्यो भुंजाबाचं झाड हाये." बुधा एका वेगळया वरच्या जगात वावरतो आहे याची प्रखर जाणीव गो. नी. करून देतात.

बुधा माणसांच्या सहवासाचाही भुकेला होतो. कोकणच्या तळाशी कँप बनवून राहिलेल्या जवानांशी एकतर्फी संवाद करीत असतो. विमानाची वाट पाहात असतो. ते आलं नाही तर विलक्षण अस्वस्थ होतो! माणसं गेली, विमानही नेहमीप्रमाणं आलं नाही, हे पाहिल्यावर चिडलेला, धसफुसत असलेला बुधा कुत्र्यावर ओरडतो. मानी कुत्रा अन्नाला शिवत नाही. कुत्र्याचं वागणं कुरुंदकर म्हणतात त्याप्रमाणं समजूतदारपणाचं आहे हे खरंच आहे, पण ते विलक्षण विश्वसनीय व खरंखुरंही आहे. तांदूळ टाकणं परवडणार नाही, म्हणून नागलीच्या भाकरी करून पाखरांना टाकणाऱ्या बुधाचं व्यक्तित्व इतकं समृद्ध होत असतं की, बकरीनं खाल्लेला अर्धा वेल संपूर्णच तिच्यापुढे टाकतो. हा बुधा ज्या तऱ्हेने म्हाताऱ्या म्हशीची निःस्पृहपणे सेवा करतो ते सर्व त्याच्या समृद्ध व्यक्तित्वाचं अतिशय सशक्त प्रकटीकरण आहे. बुधा या सेवेतच मरतो. सुंदर मरण मरतो—निसर्गाच्या कुशीत जन्मलेलं पाखरू जसं निसर्गाच्या कुशीतच पंख पसरून मरून जातं त्याप्रमाणं.

या बुधाला आलेल्या आत्मिक अनुभूतीचं काही ठिकाणी मोठं प्रभावी वर्णन गो. नीं. नी केलं आहे. एकदा एक अतींद्रिय एकलेपणाचा अनुभव बुधाला झंझावून टाकतो. 'एकलेपणाचं वारं' त्याला आलं होतं! त्याच्याही आधी लहानपणी देवळात संध्याकाळी त्याला असंच, झझावलं होतं. या अनुभवाच्या पार्श्वभूमीवर आश्वनी पुनवेच्या रात्रीचा निसर्गाच्या साक्षात्काराचा जिवंत अनुभव त्याला आला होता तो पाहण्यासारखा आहे. "बुधा पाहतच राहिला. त्याचे दोन डोळे त्याला पुरेनासे झाले. त्याच्या मनी ती उत्कंठा इतकी दाटली, की मग त्याच्या अंगाअंगाला दिठी फुटली...या सगळ्यात प्राण आहे हे इतके दिवस कसं कळलं नव्हतं कोण जाणे!" हा अंतरीचा प्रत्यय अतिशय जिवंत वाटतो. एका विलक्षण जीवन सार्थक्याच्या अनुभवानं बुधाला मिळालेली तृप्ती—"तृप्ति तृप्ति म्हणतात ती हीच. त्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तृतीची वीणा झणझणू लागली. त्या लयीत हारपून बुधा बसून राहिला "—यानंतर मरण हेच अनिवार्य होतं.

गो. नीं. नी बुधाला एक समृद्ध व्यक्तित्व दिलं आहे. हे व्यक्तित्व अगदी वेगळ्या प्रकारचं आहे. जीवनातल्या गुंतागुंतीच्या पसाऱ्यातून बाजूला झालेल्या निसर्गाच्या कुशीत शिरलेल्या एका फारसं न शिकलेल्या माणसाचं हे अनुभवविश्व विलक्षण ताजं-तवानं वाटतं. अस्वस्थतेकडून तृप्तीपर्यंतचा हा प्रवास अनेक बारक्यासारक्या घटनां-तून घडलेला दाखविला आहे. घटना व्यापक अर्थानं. या घटनांत प्राण्यांची हालचाल, क्रीडा आहे. वृक्षवल्लरींचे गंध, रूपरंग आहेत. दूर असणारी माणसं आहेत, विमानही आहे. निसर्गाशी विलक्षण तन्मय झालेल्या माणसाचं व्यक्तित्व निर्माण करणं साधी गोष्ट नव्हती. गो. नी. त्यात पूर्णपणे यशस्वी झाले आहेत.

## कारुण्याचं आवाहन

दांडेकरांच्या प्रयोगधर्मी लेखकाला नवे प्रदेश धुंडाळण्याची हौस असते त्याच-प्रमाणे जिद्दीने नवे विषय हाताळण्याचीही त्याची तयारी असते. 'आनंदभुवन'-मध्ये त्यांनी कुष्ठरोग हा विषय घेतला आहे. महादेव मोरे शहरातून आपल्या गावी येतो. एका महारोग झालेल्या म्हाताऱ्या बाईच्या शवाची विल्हेवाट लावायला गावात कोणी तयार होत नाही. या गोष्टीनं कळवळून जाऊन तिची दाहक्रिया करण्याचे कार्य एका मित्राच्या मदतीनं करतो या बाईनं गावाची सेवा करण्याचे काम आयुष्यभर केलेलं असतं. पण महारोग झाल्यावर तिला गावाकडून कृतघ्न वागणूकच मिळते. महादेव मोरे तिची रोगानं केलेली दुर्दशा पाहून हादरतोच, पण स्वतः लहानपणी या बाईचं दूध आपल्याला प्यावं लागलं आहे हे कळल्यावर आपल्यालाही हा रोग होण्याची शक्यता आहे, या शंकेनं पछाडला जातो. त्याच्या या मनःस्थितीचं मोठं सुंदर चित्रण केलं आहे. पुढे या महादेव मोरेचं लग्न महारोगाची लक्षणं असणाऱ्या मुलीशी होतं. या मुलीला रोग लागतो तो तिच्या मैत्रिणीच्या सतत सहवासामुळे. ही मैत्रीण पुढे रोग आहे असं कळल्यावर आत्महत्या करते. या दोन सात्त्विक निष्पाप व समंजस माणसांना रोग होतो तो त्यांचा कोणताही अपराध नसताना. या दोघांनी एकमेकाला आपल्या भीषण भवितव्याची कल्पना दिली आणि रोगाशी दोघांनी झगडायचं, पळून जायचं नाही अशी प्रतिज्ञा केली. यांच्या परस्परांच्या सात्त्विक प्रेमाचं मोठं हृदयंगम चित्र गो. नीं. नी काढलं आहे. एकमेकाला सावरून घेत दुर्धर रोगाशी झगडणाऱ्या या जोडप्याचं उदात्त चित्र प्रभावशाली असलं तरी एकांगी वाटतं. एकमेकांबद्दलची अढी, धुसफूस, उगाचच निर्माण होणारी रागाची भावना यांचं थोडंसंही चित्रण गो. नीं.नी केलं नाही. भावनांचा एकांगी उत्कर्ष गो. नीं. नेहमी दाखवितात. कुटुंब, समाज यांनी या जोडप्याचा त्याग केला. मात्र या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पार्श्वभूमीवर जाधव दांपत्याचं अपार मित्रप्रेम वेधून घेतं. महारोगाच्या निर्मितीची, वाढीची, त्याच्या प्रतिकाराची सर्व माहिती कादंबरीच्या अनुभवाचा भाग बनून बसली आहे. प्रारंभी महादेव शकुंतलेबरोबर शेतावर कोप बांधून राहतो. पुढे रोग बळावल्यावर ख्रिश्चनांच्या कुष्ठरोगाच्या आश्रमात जातो. तिथं गो. नीं. नी एका वेगळ्या विषयाला हात घातला आहे. रोग्यांची सेवा करण्यासाठी उघडलेल्या आश्रमात धार्मिक दृष्टींनी रोग्यावर ख्रिश्चन धर्माचा संस्कार करण्यात येतो. महारोग्यांना ख्रिश्चन धर्मात ओढण्यासाठी केलेल्या या प्रयत्नांचं वर्णन गो. नीं. नी केलं आहे. ख्रिश्चन मिशनरींच्या प्रेमळपणाविषयी वाद नाही. त्यागाविषयी वाद नाही, पण त्यांनी महारोग्यांना कैद्यांसारखं टेवलं आहे ही गो. नीं ची तक्रार दिसते. या दृष्टीनेही गो. नीं. नी थोडंसं धर्माभिमानाच्या दृष्टीतून एकांगी वर्णन केलं आहे. ज्या धर्मात महारोग्यांना माणसासारखं वागवलं जात नाही, जगण्याचे अधिकार नाहीत त्या धर्माविषयी, त्या धर्माच्या लोकांविषयी केवळ आपण त्या धर्मात जन्मलो आहोत म्हणून आदर व प्रेम वाटावे हे का व कसं शक्य आहे या दृष्टीनं गो. नी. काही प्रश्न विचारीत नाहीत. याचे कारण गो. नीं. चा हिंदुधर्मावर व त्यातल्या जन्म, पुनर्जन्म, पुण्य, पाप, कर्म या सर्व गोष्टींवर विश्वास आहे. ज्या धर्मानं मिशनऱ्यांना मानवाबद्दल अपार सहानुभूती ठेवायला शिकवलं, प्रभूच्या लेकरांवर प्रेम करायला शिकवलं व महारोगासारख्या विद्रूप करणाऱ्या रोगाशी झुंज द्यायला शिकवलं त्या धर्माचं अधिक सहानुभूतीनं चित्रण अपेक्षित होतं. शेवटी मानवाला जो योग्य वागणूक देतो तो धर्म जवळचा. हिंदू धर्म बाह्य आचाराच्या चौकटीला अधिक महत्त्व देतो, मानवाविषयी अपार करुणा त्या धर्मात फार कृत्रिम दिसते, त्याचं तंत्र बहिष्काराचं असतं, पतितांना सामावून घेण्याचं नसतं ही सत्ये गो. नीं. च्या पुढे यायला हवा होती. महादेव मोरे कुष्ठ रोग्यांत अस्मिता उत्पन्न करतो ती फारच एकांगी, संकुचित वाटते. ही अस्मिता उत्पन्न करण्यापूर्वी रोग्यांची आर्थिक स्थिती, त्यांचा मानसिक आवाका, त्यांची मूल्यविषयक जाण याचा काही विशेष विचार करीत नाही. परंपरांसंबंधी रुजलेली निष्ठाच तो ठेवतो. या सर्व भागांत गो. नीं. चा पुनरुत्थानवादी धार्मिक दृष्टिकोणच जागा झाला आहे आणि तो फारसा स्पृहणीय वाटत नाही.

यामुळे कुष्ठरोग आश्रमातून या जोडप्याला बाहेर पडावं लागतं. हे जोडपं काही दिवस निसर्गाच्या कुशीत वावरतं. योगायोगानं त्यांची भेट भाऊशी होते. ( हे चित्र बाबा आमटे यांचे आहे. ) भाऊ आपल्या प्रतिभेनं, कार्यकौशल्यानं, माणुसकीच्या प्रचंड गहिवरानं महारोग्यांमध्ये केवढा तरी जोम उत्पन्न करतात. महारोग जेवढा शारीरिक कारणांनी उत्पन्न होतो, तेवढाच तो मानसिक कारणांनी वाढीस लागतो. या रोगाशी सामाजिक, मानसिक, शारीरिक, सर्व दृष्टींनी लढायची जबरदस्त अस्मिता भाऊ उत्पन्न करतात. या कार्यात देह धारातीर्थी ठेवण्यापर्यंतच कार्य करण्याची


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विलक्षण जिद्द मोरे दांपत्यात निर्माण होते. तिसऱ्या भागाचा हा विषय गो. नीं. च्या भावनाविश्वाला अतिशय अनुकूल. रोग्यांमधला हा उत्साह, जोश, शारीरिक श्रम करण्याची हौस, सांस्कृतिक कार्यक्रम करण्याची उदंड स्फूर्ती या सर्वांचं गो. नीं. नी समरसून वर्णन केलं आहे. या भाऊंच्या आश्रमाचं रूप 'आनंदवनभुवन' हे नाव सार्थक करणारं होतं.

या कादंबरीत जो एकांगीपणा आला आहे त्याचं विवेचन वर केलं आहेच, पण अलीकडे दुर्मिळ होत चाललेलं पण खरंखुरं उत्कट सेवाभावी दांपत्यप्रेम, निर्व्याज मित्रप्रेम, समाजसेवेची आंतरिक दुर्दम्य इच्छा, शारीरिक श्रमाचं प्रत्यक्ष काम यांची सामर्थ्यशाली चित्रं या कादंबरीला जिवंत बनवतात. आजच्या माणसाच्या जगातून लुप्तप्राय होत चाललेले भावसंबंध पुनः निर्माण व्हावेत अशी आंतरिक सुप्त इच्छा सर्व मानवांना असल्यामुळे या भावनामय विश्वात वाचक गुंगून जातो. गो. नीं. च्या साहित्याची ही एक शक्ती आहे.

एखाद्या व्यक्तित्वाच्या सात्त्विकतेनं, तेजस्वितेनं, कर्तृत्वानं भारावून जाऊन त्यावर कृतज्ञतेनं शब्द-पुष्प उधळून कृतार्थ व्हावं ही दांडेकरांच्या लेखनातील एक प्रेरणा आहे. व्यक्तित्वातील उत्कट भावनाशीलतेनं भारावून जाऊन ते 'मृण्मयी' सारखी कादंबरी लिहितात तर महान कर्तृत्वाला चकित होऊन 'आम्ही भगीरथाचे पुत्र'-सारखी कादंबरी लिहून कृतज्ञतेनं या कर्तृत्वाला मानपत्र अर्पण करतात. पंजाब, दिल्ली व राजस्थान या प्रदेशांना नवीन जीवन देण्यासाठी भाकरा धरण बांधण्याच्या कार्यात प्राण खर्ची घालणाऱ्या असंख्य भगीरथपुत्रांचे अमर असे स्मृतिचित्र या कादंबरीच्या रूपानं गो. नीं. नी साकार केले आहे.

पंजाबची जी खेडी या महान यज्ञात जलमय होऊन हौतात्म्य पावली त्यांतील खेडुतांच्या स्नेहपूर्ण साध्या व संतुष्ट, स्थिर जीवनाचं चित्र गो. नीं.नी काढलं आहे. यंत्रानं त्यांच्या जीवनाला गती आणली नव्हती, नास्तिकतेने धर्मश्रद्धा खंडित केली नव्हती. ईर्ष्येनं वा स्वार्थानं जीवनात कटुता आणली नव्हती. माणसं सरळ मनाची, साध्या राहणीची. त्यांचं सर्व जीवन या ना त्या रूपानं जमिनीशीच बांधलेलं होतं. जमिनीवर त्यांचं आईसारखं प्रेम. पण मातीला, काही लोकांनाच सतलजवर धरण बांधून, निपाणी प्रदेशाला समृद्ध करावं असं वाटू लागलं होतं. या कादंबरीच्या नायकामध्ये ही आकांक्षा गो. नीं. नी निर्माण केली आहे. त्याला भावनात्मक प्रसंगाचं खतपाणी घातलं आहे. धार्मिक श्रद्धेच्या केंद्रस्थानी असलेले राधाकृष्णजी राजस्थानच्या निपाणी प्रदेशात कासावीस झाले व ते कष्ट सहन न होऊन पुढे लवकरच वारले. राजस्थानचा प्रदेश सतलजच्या पाण्यानं भिजवावा अशी त्यांची इच्छा होती. हौरीराम या हुषार मुलाच्या मनात दक्षिणेतल्यासारखे कालवे व धरणं सतलजवर असावीत ही आकांक्षा उत्पन्न झाली होती. (हाच मण्टूराम पुढे बांधकाममंत्री


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

होतो.) राधाकृष्णदासजींच्या मृत्युसमयी विलासपुरच्या राजेसाहेबांनी यासंबंधी त्यांना काही करण्याचं आश्वासन दिलं होतं. जीवन हा राजासाहेबांचा मानलेला पुत्र. त्याच्या शिक्षणाची सोय त्यांनी केली होती. त्यांच्या इच्छेचा मान राखण्यासाठी जीवननं मोठ्या निग्रहानं, चिकाटीनं इंजिनिअरिंगचं शिक्षण पुरं केलं होतं. सतलज धरण बांधण्याच्या कामी सर्वस्व समर्पण करण्याचा निश्चय त्यानं केला होता. यामागे राजेसाहेबांनी केलेल्या मदतीबद्दलची कृतज्ञता अधिक दिसते. स्वतःच्या प्रेरणांची, प्रवृत्तींची पुरेशी विश्वसनीय बैठक दांडेकरांना निर्माण करता आली नाही. तहानेनं मरणाऱ्या बकरीला पाणी पाजण्यासाठी छोटासा पाट काढण्याची कल्पना बालपणी दाखविली आहे, तरी ज्या जिद्दीनं व निष्ठेनं तो सतलज धरणाच्या पूर्वतयारीचं अचाट काम घेतो त्यासाठी अधिक साजेसं व्यक्तित्व दांडेकरांनी जीवनला द्यायला हवं होतं, तसं झालं नाही त्यामुळे ही कादंबरी कथात्मक वाटते, निवेदनप्रधान वाटते.

जीवन शिक्षण घेत असताना स्वातंत्र्याचा लढा तीव्र होतो. त्याचा मित्र जोगेंद्र वैयक्तिक सशस्त्र क्रांतीच्या प्रयत्नांचा पाठपुरावा करतो. देशाबद्दलचं उत्कट प्रेम व जोगेंद्रसारख्या आत्माहुतीसाठी झेपावणाऱ्या मित्रांची आवाहनं याचा जीवनावर कमी प्रभाव असतो असं नव्हे, पण आपल्या व्यक्तित्वाच्या प्रेरणा व मर्यादा, तसेच आपण हाती घेतलेल्या कार्याचं साफल्य या दृष्टींनी तो देशभक्तीच्या आविष्काराचे प्रखर मार्ग टाळतो. या सर्व कादंबरीत लढाऊ वृत्तीच्या, न्याय व समता याविषयाची विलक्षण चाड असलेल्या जोगेंद्राच्या व शांत, धिम्या वृत्तीच्या, अधिक रचनात्मक प्रवृत्तीच्या जीवनचा संघर्ष अनुभवविश्वाला एक वेगळी पातळी देतो.

इंग्रजांच्या राजवटीत धरणाच्या कार्याची आवश्यकता आहे हे जाणवतं, पण काम कधी गती घेऊ शकत नाही. स्वातंत्र्य मिळाल्यावर मात्र कामाला गती येते. सतत बारा वर्ष जीवन या धरणाच्या कामाची पूर्वतयारी म्हणून अभ्यास करीत असतो. राजेसाहेबांकडून फक्त महिना पन्नास रुपये त्याला मिळत असतात. या कार्यात मदतनीस म्हणून त्याचे चार युद्धानंतर अपंग झालेले वा पेन्शन मिळत असलेले जिवाभावाचे मित्र असतात. या धरणाचा प्रचंड व्याप लक्षात घेतला तर अपुऱ्या साधनसामग्रीनिशी या पाच जणांनी केलेले प्रयत्न जिद्दीचे व निष्ठेचे वाटले तरी फारसे विश्वसनीय वाटत नाहीत. या कार्यासाठी जीवन वाहिल्यावर आपल्या वैयक्तिक सुख-दुःखाकडे, वैवाहिक जीवनाकडे, कौटुंबिक स्वास्थ्याकडे दुर्लक्ष करून जीवन जे अपार कष्ट घेतो, ज्या अडचणींना व दुःखांना तोंड देतो त्याचा प्रत्ययकारी अनुभव गो. नी. नी चितारला आहे. या पाच मित्रांच्या भावनात्मक संबंधांचं मोठं देखणं रूप चितारलं आहे. मधूनच विरळ अशी निर्मळ विनोदाची पखरण वेधक वाटते.

कादंबरीच्या उत्तरार्धात अनेकांगी संघर्षाचं रूप दिग्दर्शित केलं आहे. नोकरशाही आणि वरचे अधिकारी ज्या तऱ्हेनं देशाच्या संपत्तीचं भक्षण करीत आहेत, जिवाची




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



बाजी लावून काम करणाऱ्या कामगारांचं शोषण करीत आहेत, नेकीने काम करू पाहणाऱ्या जीवनासारख्या तरुणांची गळचेपी करीत आहेत त्याचं चित्रण केलं आहे. जीवनचा मानसिक संघर्ष अनेकमुखी होता. एका बाजूला अतिशय धिम्या गतीनं चाललेलं धरणाचं काम व त्यात दिसून येणारं वरिष्ठाच दिरंगाईचं, भ्रष्टाचाराचं, खाबूगिरीचं धोरण, दुसऱ्या बाजूला गरिबांच्या मजुरांच्या शोषणाकडे डोळ्यावर कातडं ओढून पाहावं लागत असल्याचं दुःख, जोगेंद्राला आश्रय दिला असतानाही कामगारांना तो भडकावीत असता सहन करावी लागणारी मुस्कटदाबी, जोगेंद्राच्या विचारात व आचरणात अतिरेकीपणा असला तरी त्यातल्या न्यायबुद्धीबद्दल, सत्यतेबद्दल, व शुद्ध हेतूबद्दल वाटणारी अमाप श्रद्धा, थकून-भागून घरी आल्यावर या तापट व क्रोधी मित्राचे सहन करावे लागणारे वाग्दाण, पत्नीच्या मूक वेदना, गावकऱ्यांचे शिव्याशाप-यांतून ज्या विलक्षण तितीक्षेनं जीवनला आपलं अभीप्सित साधायचं होतं, त्याचा ताकदीने प्रत्यय गो. नीं. नी दिला आहे. जीवनच्या वाढत्या वयाबरोबर त्याची वाढत जाणारी प्रगल्भता प्रत्ययकारी वाटते व हा सर्वच भाग मोठा कलात्मक उतरला आहे. जोगेंद्र व जीवन यांचा संघर्ष दोन प्रवृत्तींतला असला तरी तो शेवटी देशाला उपकारक व परस्पर पोषक कसा आहे याचं सुंदर दिग्दर्शन गो. नीं. नी केलं आहे. प्रचंड धरण बांधण्याऱ्या रचनात्मक कार्यात शोषण, भ्रष्टाचार, यांच्याकडे थोडंफार दुर्लक्ष करणं भाग पडतं, स्वातंत्र्याचा विचार तसंच वैयक्तिक दुःखाचा विचार बाजूला टेवून रचनात्मक कामं करावी लागतात. जीवन या प्रवृत्तींचा प्रतिनिधी आहे. अन्याय, अत्याचार, शोषण यांच्या प्रत्येक रूपाविरुद्ध तत्क्षणी झुंजारपणे लढणाऱ्या प्रवृत्तींचा जोगेंद्र प्रतिनिधी आहे. यांच्यातला संघर्ष मोठ्या भारदस्तपणे दाखविण्यात आला आहे. धरण पूर्ण झाल्यावर उस्कटलेल्या संसारामुळे अश्रू ढाळणाऱ्या माणसांचं दुःख दूर करण्यासाठी जोगेंद्र आजारी असतानासुद्धा जातो हा भाग लक्षणीय आहे.

या प्रचड कार्यात जीवनवर विश्वास टाकून परिश्रम करणारे जीवनचे मित्र चटका लावून जातात. मूकपणे दुःख सोशीत असणारी विनयवती प्रभावी वाटते. पंतप्रधानांच्या व्यक्तित्वाचे काही पैलू व काही क्षण आल्हादकारी वाटतात. श्रमाची प्रचंड कामं करीत असतानाही सामूहिक चित्रं ठसठशीत उठावदारपणे शब्दांकित केली आहेत. खेडी बुडत असताना वेडा जग्गू गोविंदसागराच्या अथांग पाण्यात उडी घेतो नव्या निर्मितीसाठी जुन्या वेड्या समजुतींचं हे बलिदान. इथेच जग्गूच्या व्यक्तिरेखेचं खरं उद्दिष्ट लक्षात येतं.

ही कादंबरी मोठी आहे पण महान आहे असं म्हणता येणार नाही. तरी भगीरथपुत्रांच्या त्यागाचं, परिश्रमाचं, जिद्दीचं, मानसिक शारीरिक कष्टाचं जे भव्य शिल्प उभारलं आहे ते निश्चितपणे मराठीत फार मोलाचं आहे. या कादंबरीच्या लेखना-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

साठी गो. नी. दांडेकरांनी जे विलक्षण परिश्रम घेतले त्याचा आवर्जून उल्लेख अशा-साठी करायला हवा की, केवळ प्रतिभेच्या बळावर ललित लेखन करणाऱ्यांची संख्या मराठीत अमाप आहे. ललित लेखनाचं रोप उगवायला ही प्रचंड व्युत्पन्नता व अभ्यास लागतो याची बूज या कादंबरीत ठेवली गेल्यामुळेच मोठेपण लाभलं आहे.

## लाडकी कन्या

गो. नी. दांडेकरांची ' मृण्मयी ' अतिशय लाडकी कन्या आहे. ते म्हणतात, "' मृण्मयी ' ही अशी कादंबरी आहे की, तसं मी कधीही पुनः लिहू शकणार नाही. मृण्मयी ही माझ्या कल्पनेप्रमाणे सर्वोत उत्तम कादंबरी आहे." (ललित, जुलै १९७६) एका याचकाला शरीर देऊ करणाऱ्या मीरेची कथा गो. नीं. च्या चिंतनाचा विषय झाली व १९३९ नंतर सतत तशी चिंतनविषय बनून राहिली. वास्तविक या मीरेमध्ये व जोश्यांच्या पुढे आपलं शरीर टाकू पाहणारी मनू यांच्यामध्ये तसं साम्य नाही. गो. नीं. ची ' मृण्मयी ' त्या अनुभवाच्या परिणतीकडे अपरिहार्यपणे जात नाही. मीरेची कथा मृण्मयीला प्रेरक ठरली एवढंच म्हणता येईल.

' मृण्मयी 'ची नायिका मनू चैतन्यानं रसलेल्या धरित्रीशी तन्मय होऊ पाहणारी स्त्री आहे. धरतीची सहिष्णुता, तिचं सृजनत्व व सौंदर्य तिला सहस्रशीर्ष व सहस्र-पाद झालेल्या ' त्याचं ' क्रीडारूप तिला वाटतं. मनूच्या व्यक्तित्वाची संपूर्ण निर्मितीच जणू धरतीमय बनण्यासाठी झाली होती. धरतीशी एकरूपत्वाचं नातं जुळायला भारतीय संस्कृतीत मान्य असलेलं ' सर्वं खलु इदं ब्रह्म ' हे बीजतत्त्व तिच्या मनात वडिलांनी पेरलं होतं. तुकाराम-ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाच्या अभ्यासानं, मननानं ते रोप तरारलं होतं.

मनूच्या या आकर्षणाचा पाया गो. नीं. नी मजबूतपणे घातला आहे. मनूच्या वडिलांना कोकणच्या भूमीची अनिवार ओढ. पोटासाठी विदर्भात जावं लागल्यावर मुळं उखडल्याचा अनुभव. पैसे जमवून कोकणला जाण्याची आकांक्षा पुरी न होताच त्यांचा मृत्यू. मनूच्या आईवर पोळ्या भाजून दिवस काढण्याची पाळी येते. दारिद्र्यात स्वाभिमानानं जगू पाहणारी मनू वडिलांकडे शिकलेली ज्ञानेश्वरी वाचून दाखविते. तिला कोकणची मायभूमी पाहण्याची इच्छा आहे. या ओढीपोटी आलेलं स्थळ विशेष विचार न करता स्वीकारते. पण वाट्याला येतो सासूचा छळ व बाहेरख्याली नवऱ्याची उपेक्षा व अपमान. सासऱ्याची पितृवत माया व धरित्रीची सेवा करण्याचा अपार आनंद या दोन गोष्टी मनूला मिळतात. वेश्यागमनी नवरा मारला जातो. मनू आपलं दुःख मातीच्या सेवेत विसरूनच जाते असं नव्हे तर तिला आत्मिक आनंदही मिळतो. शेजारच्या जोश्यांची वाकडी नजर पडते. त्यांना धडा शिकविण्या-साठी त्यांच्यापुढे आपल्या सासऱ्याच्या समोर चटई पसरते. जोशी मान खाली


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

घालून जातात. शरीराविषयी काडीमात्र आसक्ती न राहिलेली मनू गो. नीं. ना उभी करायची होती. ज्ञानेश्वरी जगणारी मनू.

गो. नीं. ची ही मनू जुन्या संस्कारांनी संपन्न आहे, सात्त्विक व तेजस्वी आहे. मातीवर व निसर्गावर प्रेम करणारी आहे. पण गो. नीं. ना वाटतं तशी समृद्ध व्यक्तित्वाची नाही. सात्त्विकतेच्या प्रचुरतेमुळे तिच्या हाडामांसाच्या भावना दुर्लक्षिल्या गेल्या आहेत. एका विशिष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञानानं भारली जाऊन एकेरी जीवन जगणारी ही नायिका वाचकाच्या श्रद्धेला, आदराला पात्र ठरली तरी विदग्ध रसिकाला मुग्धचकित करण्याची शक्ती तिच्यामध्ये नाही. दांडेकरांची ही मानसकन्या त्यांच्याप्रमाणेच सभोवतालच्या प्रत्यही परिवर्तित होत जाणाऱ्या जगापासून दूर स्वतःच्या श्रद्धांचे, विश्वासांचे व आस्थांचे बेट तयार करून त्यातच मनोमन मग्न असणारी मनू एक सात्त्विकतेचा क्षीण संस्कार करून जाते. तिच्यातून व्यक्त होणारा जीवनाशय अतिशय मोजका असतो. दांडेकरांना आपल्या व्यक्तित्वाला अनुरूप व्यक्तित्व मिळालं होतं. पण त्यात भारदस्तपणा येऊ शकला नाही.

## चरित्रात्मक कादंबरीचा मानबिंदू : मोगरा फुलला

गो. नी. दांडेकरांचा अंतरात्मा भारतीय संस्कृतीशी पूर्णपणे समरस झालेला आहे. या घटनेचे काही मूलभूत दोष आहेत. काही फायदेहा आहेत. एक मोठा फायदा असा की, ते कादंबरीरूपाने जीवनानुभव आविष्कृत करतात. एक प्रकारचा भारावलेपणा येतो, तन्मयता येते, उत्कटता येते. तोटा होतो तो असा की, अनुभव सामान्यत एकेरी व भावुकतेकडे झुकलेला असतो. विरोध व ताण त्यात नसतो, पण निखळ भारतीय कादंबरी असे ज्या कादंबरीचे वर्णन सार्थपणे करता येईल अशी त्यांची एक महत्त्वाची यशस्वी कादंबरी—'मोगरा फुलला' (१९७५)

ज्ञानेश्वरांच्या जीवनावरील ही कुटुंब कहाणी आहे. ज्ञानेश्वरकालीन सामाजिक, राजकीय स्थितीचे वर्णन करणे हे या कथेचे प्रयोजन नाही. आवश्यक तेवढा परिस्थितीचा निर्देश आहे. ही कहाणी ज्ञानेश्वरांच्या आईची मैत्रिण कावेरी, विठ्ठलपंताचे सुहृद भट्टदेव, रुक्मिणीचे वडील गोविंदपंत व जनी दासी यांच्या मुखाने सांगितली आहे.

ज्ञानेश्वरांच्या जीवनाचा मोगरा कसा फुलत गेला आणि त्याचा परिमळ कसा दरवळत गेला, जीवनकार्य संपल्यावर शैवधर्मसंप्रदायाप्रमाणे त्यांनी आनंदाने संजीवनी समाधी कशी घेतली याचं अतिशय उत्कट निवेदन गो. नीं. नी केलं आहे. भारतीय जीवनमूल्यांनी संस्कारित झालेली दृष्टी नेमकी कशी असू शकते याचं चित्रात्मक दर्शन या कृतीत होऊ शकतं.

केवळ कर्तव्यबुद्धीनं संसार करणाऱ्या पण मनोमनी विरक्त असलेल्या बापाची व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

धर्मपरायण माउलीची चार मुलं. जगावेगळी व असामान्य. एका बाजूनं जीवनातील व्यवहार अधिक नेटकेपणाने चालावा म्हणून सर्व शक्ती पणाला लावणारी तर दुसऱ्या बाजूला कमलपत्राप्रमाणे अलिप्त. जगाविषयी विलक्षण प्रेम बाळगणारी पण तितकीच आत्मानंदात मग्न. एकमेकावर अलोट प्रेम करणारी पण प्रसंगी त्या प्रेमभावनेतून सहजपणे अनासक्त होणारी. सामाजिक किंवा लौकिक दृष्ट्या अपार दुःख भोगत राहणारी परंतु त्यांच्या दृष्टीनं आनंदाच्या डोहात सतत डुंबत राहणारी. अशी ही जगावेगळी मुलं गो. नीं. नी अपार सहृदयत्वान रेखाटली आहेत.

या कादंबरीच्या अनुभवाला आत्मानंदाचा स्पर्श आहे. मान, अपमान, दारिद्र्य, भौतिक गरजा यांविषयीची वृत्तीच वेगळी आहे. भावनात्मक प्रसंगांचं रेखाटन करताना गो. नी. चैतन्यशक्तीनं भारल्यासारखे वाटतात. त्यांच्या शैलीतला रसाळ वक्तृत्वावेश त्यांना सहाय्य करतो. रुक्मिणीशी विवाह करण्याचा निर्णय घेताना विरक्त विठ्ठलपंताची झालेली मानसिक आंदोलने, श्रीपादस्वामींच्या चरणावर लोटून घेताना रुक्मिणीची झालेली मनःस्थिती, ज्ञानेश्वरांच्या जन्माच्या वेळी कावेरी व भट्टदेवांची उलघाल, सटवीचा पती व मुलगा भिक्षा मागण्यासाठी दारी येतो त्या वेळची कावेरीची कातरता, ग्रामस्थांनी लेकरांवर संस्कार करावेत म्हणून प्राणत्याग करण्यापर्यंतची तयारी असलेल्या विठ्ठलपंतांच्या मनाचा धीरोदात्तपणा, निवृत्तीची समाधीतली तल्लीनता, निवृत्ती व ज्ञानदेव यांचे आध्यात्मिक साक्षात्काराचे संयत आनंदकल्लोळ, समबुद्धीच्या ज्ञानेश्वरांच्या मनावर आईच्या चारित्र्यासंबंधी निंदा ऐकताना झालेला आघात व त्यानंतरची त्यांची प्राणत्यागाची तयारी, भट्टदेव इतर सर्वांची अगतिकता, या प्रसंगी मुक्तेचे आर्तपणे प्रकटलेले ताटीचे अभंग व त्यांचा भाव-समृद्ध प्रसंग-संदर्भ, ज्ञानेश्वरांच्या ग्रंथनिर्मितीच्या प्रेरणांचा विलक्षण भावपूर्ण मागोवा, ज्ञानेश्वरादी भावंडांची वाढती लोकप्रियता व त्यामुळे बदललेले भक्तिमय वातावरण, एका कोपिष्ट ज्ञानवृद्धाकडून मिळालेला पुरस्कार, ज्ञानदेव व नामदेव यांची भेट, ज्ञानदेवांच्यात देवभेट, समाधी प्रसंग आणि या प्रसंगी स्थितप्रज्ञेचा मेरुमणी असलेल्या निवृत्तिनाथांचा झालेला समवृत्तिभंग—असे कितीतरी प्रसंग भाविक वाचकाऱ्याच नव्हे तर भारतीय संस्कारांनी संपन्न सहृदयाच्या मनावर प्रचंड प्रभाव टाकतात. येथे दुःख उदात्त समर्पण घेऊन येतं—आत्मिक सुखाचा ठेवा देऊन जातं. ज्ञानेश्वरीच्या प्रवचन-प्रसंगी कादंबरीकार स्वतःच प्रवचन व साहित्यानुभव यातले अंतर विसरून जातो की काय अशी शक्यता होती. पण गो. नीं. नी प्रवचनांचा भावपूर्ण संदर्भ उत्तम तऱ्हेनं निर्मिलेला आहे. ही प्रवचने म्हणजे ज्ञानेश्वरांच्या जीवितकार्याचा सर्वात महत्त्वाचा भाग. तो टाळणंही कठीण आणि हाताळणंही कठीण. पण गो. नीं. ना ती किमया साधली आहे.

गो. नीं. ची काही पात्रे खूप उंचीवर जातात. ज्ञानेश्वरांच्या जन्माच्या वेळी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कावेरी कृतकृत्य भावनेनं आपल्या पित्याशी भांडते तेव्हा खूप उंचीवर गेल्यासारखी वाटते. गो. नी. सख्यत्वाचे, मित्रत्वाचे संबंध रेखाटण्यात अतिशय कुशल आहेत त्याची प्रचीती येथेही येते. विरक्त होऊन संसारत्याग केलेला भट्टदेव ज्ञानेश्वरांच्या कुटुंबात अगदी अलिप्त प्रकारचे संसारसुख भोगतो. भट्टदेवाची ही व्यक्तिरेखा एकेरी असली तरी प्रभावशाली वाटते. विठ्ठलपंतांच्या विवाहापासून ज्ञानेश्वरांच्या समाधिप्रसंगापर्यंत या भावंडांच्या विकासाचे साक्षी असलेले भट्टदेव ज्ञानेश्वरभक्तच म्हणावे लागतील. योग व ज्ञान यांचे महत्त्व मान्य करूनही या कादंबरीत भक्तीच्या उत्कट आनंदाचा प्रत्यय सारखा मिळत असतो. शरीर व सांसारिक जीवन याविषयी विरक्त दृष्टिकोण असूनही त्यांच्यामुळे होणारा वेगळा आनंद गो. नीं. नी यात फुलवला आहे. मोगऱ्याचा परिमळ महत्त्वाचा व श्रेय असला तरी तो ज्या पाकळ्यांत समाविष्ट असतो त्यांचे महत्त्व कमी नसते. शेवटी गो. नीं.च्या दृष्टिकोणात शैवांचा सर्वेश्वरवादच प्रभावी ठरतो. " ज्यात बंधन मानीत होतो, ती तर भवसमुद्र तरून जाण्याची सांगडी. "

या कादंबरीत तत्कालीन परंपरांचा प्रतिनिधी कावेरीचा बाप व विठ्ठलपंत यांचा संघर्ष आहे. तो धार्मिक स्वरूपाचा आहे तसाच थोडा वैयक्तिकही आहे. कावेरी रुक्मिणीची अभिन्न सखी. या योजनेमुळे कादंबरीला भरीव असे भावनात्मक अधिष्ठान लाभते.

ज्ञानेश्वरांच्या चरित्राचे निवेदन करणारी ही कादंबरी नसून त्यांच्या आंतरिक व्यक्तित्वाचा वेध घेणारी व भारतीयत्वाने अथपासून इतिपर्यंत ओतप्रत भरलेली ही एक यशस्वी कलाकृती आहे. भावावेशात लिहूनही कलात्मक भान कुठेही सुटलेले नाही.

या कादंबरीच्या वातावरणनिर्मितीसाठी गो. नीं. नी जे कलात्मक कौशल्य दाखविले आहे त्याला तोड नाही. विशेष गुंतागुंत नसलेली माणसे गो. नीं. ना अनुकूल ठरली आहेत. तत्कालीन चालीरीतींची अचूक जाण यात दिसते. भल्या पहाटे उठणे, नदीवरून पाणी आणणे, सडासंमार्जन करणे, रांगोळ्या घालणे, फुले वेचणे, पूजा करणे, गुराढोरांचे बघणे, हवनक्रिया, सांजवात, भिक्षेकऱ्यांचे कोरान्न मागणे, उजवा शंख सापडणे, काष्ठपुतळीचा खेळीया येणे, दृष्टांत होणे, गाडकीचा वरचष्मा या सर्वांमुळे तत्कालीन वास्तवाचा प्रखर भास होतोच, पण त्याहीपेक्षा कौतुकास्पद गोष्ट म्हणजे तत्कालीन मराठीचा प्रयोग. हा प्रयोग भाषेच्या जाणत्यांना कदाचित कुठे कुठे खटकेलही, परंतु इतर वाचकांना तत्कालीन वातावरणाची प्रतीती देणारा वाटतो. ही भाषा जुनी म्हणून दुर्बोध वाटत नाही. कालबाह्य वाटत नाही. अतिशय गोड व जिवत वाटते. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव इत्यादी ग्रंथांच्या सतत पठणाचा कलात्मक पदर या भाषेला झालेला आहे. गो. नी. संतवाङ्मयाचे श्रद्धाळू वाचक आहेत व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांना या कादंबरीच्या रूपाने त्यांच्या व्यक्तित्वाला साजेसा विषय मिळाला. यामुळेही कादंबरीच्या यशात भर पडली. मराठीतील चरित्रात्मक कादंबरीचा हा एक उत्कर्ष-बिंदू आहे असं म्हटलं तर फारसं चुकीचं ठरणार नाही.

## ऐतिहासिक कादंबऱ्या

गो. नी. दांडेकरांनी ऐतिहासिक कादंबरी-लेखनाकडे वळावं आणि त्यातही शिव-कालीन समाजजीवनाची निवड त्यांनी करावी यात आश्चर्य असे काही नव्हतेच. गो. नी. मनाने समकालीन समाजापेक्षा पूर्ववर्ती समाजात वावरणारे. समकालीन घटनांचा, अवतीभोवतीच्या माणसांचा फारसा गुंतवून ठेवणारा मोह त्यांना होत नाही. नव्या समाजात घुसमटून गेलेली, अस्वस्थ झालेली वा मनानं भूतकाळात रमणारी माणसं त्यांना अधिक आवाहन करतात. नागर जीवनाचे, आधुनिक काळा-तील समाजव्यवस्थेतील गुंतागुंतीच्या व धावपळीच्या जीवनपद्धतीचे, परस्परांशी असलेल्या स्वार्थी संबंधांच्या परिणामी निर्माण झालेल्या व्यक्तित्वातल्या काटेरीपणाचे भाष्यकार नाहीत. गतकाळातील पराक्रमांनी बहरलेल्या वातावरणाकडे त्यांनी वळावे हेच स्वाभाविक होतं. भारतीय संस्कृतीचं, हिंदू धर्माचं, हिंदू समाजातील आदर्श जीवनमूल्यांचं अपूर्व आकर्षण गो. नीं. ना आहे. साहजिकच ज्या जमान्यात या संस्कृतीवर व मूल्यांवर होणारं परकीय आक्रमण परतवून लावण्याचं महान कार्य घडलं त्या जमान्याविषयी गो. नीं. ना अपरंपार कुतूहल असणं, विलक्षण जिज्ञासा असणं हे अगदी स्वाभाविक. हिंदू संस्कृतीवर जमत असलेली राख झाडून पुनः तिला तेजस्वी करणारं शिवाजीचं कर्तृत्व व त्या कर्तृत्वाचा उगम असलेलं चरित्र यांनी गो. नीं. ना विलक्षण भारून टाकावं हे उचितच होतं. बाबा पुरंदरे यांनी त्यांच्याकडून शिवकाल उभा करण्याचं घेतलेलं अभिवचन हे निमित्त ठरलं. यासाठी गो. नीं.चं संपूर्ण व्यक्तित्वच तयार झालं होतं. संयुक्त महाराष्ट्राच्या निमित्तानं स्वातंत्र्योत्तर काळात मराठी जनतेची अस्मिता जागी झाली व शिवरायाच्या कर्तृत्वा-विषयीचं अपार कुतूहल पुन्हा जागं झालं याचा परिणामही शिवकाल उभा करण्या-साठी झाला असणं शक्य आहे.

गो. नीं. च्या ऐतिहासिक कादंबऱ्यांविषयी बाबासाहेब पुरंदरे यांनी काही गोष्टी अतिशय मार्मिकपणे नमूद केल्या आहेत. मराठी कादंबरीकारांत इतिहासाची नव्हे तर ऐतिहासिक काळाशी सर्वार्थानं समरस होण्यासाठी अपूर्व परिश्रम करणारा लेखक म्हणून दांडेकरांना अग्रस्थान द्यावे लागेल. पुरंदरे लिहितात. "'दया दार उघड' लिहिताना राजश्री आप्पासाहेब दांडेकर यांनी अपार कष्ट घेतलेले आहेत. हजारो कागदपत्रं वाचून त्यांनी टिपणं केली आहेत. त्या कागदपत्रांतून व्यक्त झालेलं शिव-पूर्वकालीन मराठी जिणं त्यांनी बारकाईनं अभ्यासलं आहे. सारं संतवाङ्मय त्यांनी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वारकरी बनून वाचलं आहे. त्यांचं पाठांतर अपरंपार आहे. गेली पंचवीस वर्षं ते मावळपट्टीत सतत वावरत आहेत. त्यांचा संसार सजला आहे मावळातच, मावळातल्या नद्या, ओढे, डोंगर, कपाऱ्या, अरण्य, गुहा, गडकोट, वाडेहुडे, देवळं, दर्गे, मशिदी, मठ, विहिरी, घराणी, जातीपाती, भांडणं, खेळ, रीतिरिवाज, मानपान, भाषा, पीकपाणी, उन्हाळे आणि पावसाळे आप्पासाहेबांच्या सलगीतले आहेत. त्यांच्या इतका भटकणारा साहित्यिक मी तरी दुसरा पाहिला नाही. त्यांच्या ह्या सर्व अनुभवांचा आणि अभ्यासाचा प्रत्यय या कादंबरीत वाचकांना जागोजाग येईल. शिवपूर्व कालातील मावळपट्टीच्या जीवनाचं प्रातिनिधिक चित्र म्हणजे 'बया दार उघड.'"

### वेगळेपण

"आजपर्यंत मराठीत लिहिल्या गेलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांपेक्षा 'बया दार उघड' ह्या कादंबरीची जडणघडण वेगळी आहे. आजपर्यंत ऐतिहासिक कादंबऱ्यांत प्रामुख्यानं महापुरुषांची चरित्रं आणि राजकीय उलाढाली रंगविल्या गेल्या. 'बया दार उघड' ही मात्र शिवकालीन सामाजिक कादंबरी आहे. तत्कालीन सामाजिक जीवनाची ओळख फार जवळून या कादंबरीत वाचकांना होईल. मावळच्या पाचवीला पुजलेल्या भाऊबंदकीत आणि सुलतानी रंगेलीत मावळमुलूख कसा भाजून निघत होता आणि एकूण जीवन कसं उद्ध्वस्त होत होतं याचं दर्शन इथं होईल. समाजाच्या विविध अंगांचा तपशील लेखकानं फार बारकाव्यानं भरला आहे. त्यात गोतसभा दिसेल. लोकांची वतनप्रियता दिसेल. सुलतानी राजवट दिसेल. सामाजिक संकेत, मानापमान, निष्ठा, परंपरा, संबंध आणि रीतिरिवाज असतील. शिवाय तत्कालीन सांस्कृतिक जीवनाचीही ओळख घडेल. त्या वेळची हत्यारं, वस्त्रं, कागद, लेखण्या, ग्रंथ, औषधं, पदव्या, देवस्थानं, किल्ले, वाडे, बांधकामं, खेडी, सरकारी कामकाज, न्यायनिवाडे वगैरे गोष्टींचा तपशील अगदी नेटक्या वास्तवतेनं आप्पासाहेबांनी भरला आहे. याचा प्रत्यक्ष या आणि पुढील चार शिवकालविषयक कादंबऱ्यांत सहजपणे येऊ शकेल." (बया दार उघड.)

बाबासाहेब पुरंदरे यांनी लिहिलेल्या या पुरस्कारापेक्षा वेगळं लिहिणं कठीणही आहे आणि अनावश्यकही.

'हर हर महादेव'च्या प्रस्तावनेत बाबासाहेब लिहितात.—"त्यांच्या ह्या कादंबऱ्या व्यक्तिप्रधान वा घटनाप्रधान नाहीत. त्या आहेत कालप्रधान वा परिस्थितिप्रधान. शिवकालीन समाजस्थिती हीच प्रस्तुत कादंबऱ्यांची नायिका असून, शिवकालीन इतिहास हा त्यांचा नायक आहे. कोणाही विशिष्ट व्यक्तीला वा घटनेला प्राधान्य न देता 'शिवकाल' व 'शिवकालीन' देशलोकस्थिति ललित माध्यमातून प्रभावीपणे मांडायची ही मोहीम सामान्य नव्हे."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'हरहर महादेव' या कादंबरीत शिवाजीमहाराजांच्या व हिंदवी स्वराज्याच्या उदयाचा कालखण्ड आला आहे. मावळपट्टीत सुल्तानी अंमल कसा होता, मावळी मने आणि मनगटे या अंमलाच्या धाकाखाली कशी जगत होती याचे अत्यंत प्रभावी चित्रण 'हरहर महादेव' मध्ये आले आहे इथे क्रांती जन्माला आली. ठिणगीची ज्योत झाली अन् ज्योतीची ज्वाला! सुल्तानी अंमल त्यात होरपळून गेला. पण हे केवळ योगायोगाने घडत नाही. त्यामागे काही योजनाबद्ध प्रयत्न, ध्येयवाद व उदात्त तत्त्वज्ञान होते, आणि तेच शेवटी यशस्वी झाले. अडाणी पण प्रामाणिक मावळ्यांना त्या तत्त्वज्ञानातील कानामात्रावेलांटी ही कदाचित उच्चारून वा लिहून दाखविता आली नसेल, पण हे 'आपलं स्वतःचं', 'देवधर्माचं', 'गोरगरिबांचं', 'मायबहिणीचं' राज्य होणार आहे हा ठाम विश्वास ह्या मनात आणि मनगटांत त्या क्रांतीच्या तरुण नेत्याने पेरला. सुरुंगाच्या दारूसारखा ठासून भरला, अन् मग त्या नेत्याच्या नजरेची नुसती ठिणगी पडताच, स्वसुखाची पर्वा न करता, हे सुरुंग सुल्तानी तख्ताखाली उडाले. हिंदवी स्वराज्य असे जन्माला आले. पण हा सारा पोत शिवकालात कसा कसा भरला गेला, त्यात देशकालपरिस्थितीचा, भोसले माय-लेकरांचा व संतसंप्रदायांचाही भाग कसा होता हे 'हरहर महादेव'मध्ये श्री. गो. नी. दांडेकरांनी फारच कौशल्यानं कशीदलं आहे. हा कशिदा केवळ शब्दांच्या रेशमी धाग्यांनी विणलेला नाही. ह्या रेशमी धाग्यांच्या सुरुवातीला अभ्यासाची टोकदार सुई आहे व होती, हे पानापानावर दिसून येईल."

गो. नीं. च्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतून शिवाजीच्या जन्मवेळापासून स्वराज्याची प्रस्थापना झाली तोपर्यंतचे शिवकालाचे दर्शन घडविले आहे. नायक म्हणून शिवाजी कमी वेळा पुढे येतो. पण त्या एकूण व्यक्तित्वाचा मोठेपणा, कर्तृत्वाचा आलेख, स्वभावाचे चित्र कादंबऱ्यांतून येणाऱ्या पात्रांच्या, घटनांच्या परिस्थितीच्या विवरणातून व संघर्षातून प्रकट करण्यात आले आहे. एकदोन व्यक्तित्वांना प्रामुख्य देऊन शिवाजीच्या साक्षेपी व्यवहाराचा जिवंत प्रत्यय दिला आहे.

'दया दार उघड'मध्ये निजामशाहीच्या अंमलाखाली सरदारांनी केलेल्या गरीब रयतेच्या छळाचे प्रत्ययकारी चित्र आहे. धर्मावर सर्व बाजूंनी आक्रमण, स्त्रियांवर अत्याचार, गरिबांकडून वेठबिगार, ब्राह्मणांवर क्रूर अत्याचार, मंदिरांची मोडतोड, मूर्तींची विटंबना, किंचित विरोध करणाऱ्यांनाही क्रूर शिक्षा यांचे हृदयद्रावक चित्र आहे. निजामी अंमलदारांच्या या कारवायांची कारणमीमांसा केली आहे ती अशी : "कारण अगदी साधं होतं. उत्तरेकडून दिल्लीच्या पातशहाच्या सैन्याच्या शहाजाद्यांचे आवाज वारंवार कानी पडत होते. आपली सद्दी आहे तोवर हाती लागेल ते भोगून घ्या, उद्याचे कुणी पाहिले आहे? पळवा, लुटा, जबरदस्तीनं हिरावून घ्या. बळजबरी करा. शेवटी न मिळाले तर पेटवून द्या असा साधा, सरळ हिशेब निजाम-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

शाही फौजेच्या मनी वागत होता "..." अशा अभ्रांच्या सावलीतही वारा मावळं नांदत होती. खिन्न मनानं. काय करावं ते न आकळून."

या परिस्थितीत कसाबसा जीव जगवावा, मारेकऱ्यांची धाड आली तर जंगलात पळून वेळ काढावा, जे भोगावं लागतं आहे, ते प्राक्तनाच आहे असं समजून पशुवत् जगावं हाच सामान्य मावळ्यांचा हिशोब होता. थोडीशी संपन्न माणसं सरदारांच्या व अंमलदारांच्या पुढे गोंडा घोळून किंवा हांजी हांजी करून किंवा आपल्याच लोकांना छळण्याच्या कार्यात सहभागी होऊन आपला स्वार्थ साधत होती. या दृष्टीनं कुळकर्णीपण सांभाळण्यासाठी चित्रावशास्त्र्यांचे व्याही ज्या तऱ्हेनं वागताना दाखवले आहेत ते प्रभावी उदाहरण आहे. काही चित्रावशास्त्री, कान्हेरेशास्त्री यांच्यासारखी माणसं अंतरीच्या श्रद्धा कायम ठेवून जगत होती, पण त्याची फार किंमत त्यांना द्यावी लागत होती. या परिस्थितीत आपलं वेगळं राज्य स्थापावे या आकांक्षेने गंभीररावानं केलेले प्रयत्न शिवाजीच्या प्रयत्नांचं पूर्वचिन्ह दाखवितो. शिवाजीसारखं संघटनकौशल्य, बुद्धिचातुर्य, धोरणीपणा या सगळ्यांचा गंभीररावाकडे नव्हता. शिवाजीचे प्रयत्न आकाशातून अवतरले नाहीत, ते दैवी वरदानही नव्हते, ते मानवी प्रयत्न होते हे व तत्कालीन परिस्थितीत तसं होणंच स्वाभाविक होतं हे दांडेकरांनी विस्तारानं दाखवलं आहे. शिवाजीचं अपरंपार कर्तृत्व मान्य करूनही त्याला काळाचा किंवा परिस्थितीचा भक्कम पाया होता हे दाखवून एक प्रकारे लेखकानं आरोपित दैवीपणाचा व आकस्मिकपणाचा हा मुद्दा खोडून काढला आहे. खुद्द शहाजी महान पराक्रमी सरदार होते, त्यांच्याकडे बारा जिल्ह्यांची मुख्यत्यारी होती, त्यांच्या मनात स्वराज्याची आकांक्षा होती, जिजाबाईंच्या मनात तर ती चांगलीच दृढ होती हे गो. नीं नी मोठ्या कौशल्यानं दाखवून शिवाजीच्या कर्तृत्वासाठी भूमी कशी परिपक्व झाली होती याचा निर्देश केला आहे. पारतंत्र्याची बोचरी जाणीव, धर्मावरील संकटाचं दुःख, डोळ्यांदेखत आयाबहिणींची लुटली जाणारी अब्रू, परकीयांचा क्रूर अरेरावीपणा यामुळे जिजाऊंच्या मनात अंगार कसे धगधगत होते याचं चित्रण गो. नीं नी संक्षेपानं केलं आहे. या दृष्टीनं बटकी म्हणून विकत घेतलेल्या चित्रावशास्त्र्यांच्या मुलीची योजना करून दांडेकरांनी अन्यायाची, अत्याचारांची परमावधी झाल्याचं दाखविलं आहे. या प्रसंगानंतरच शहाजीराजे जिजाऊंना पुण्यात स्वतंत्रपणे राहण्याचा सल्ला देतात. स्वराज्याची मुहूर्तमेढ ती ही.

'बया दार उघड' मध्ये मध्यवर्ती पात्रे आहेत—सुलतान शेलार, चित्रावशास्त्री, सुलतान-गोजाईचा मुलगा राणोजी. हा राणोजी पुढे चित्रावशास्त्र्यांच्या कन्येच्या पाठीमागे लागलेल्या अरब हलीमावर तलवार उगारतो, पुढे जिजाऊंचा दौलतबंकी होतो. 'हरहर महादेव' मध्ये यालाच प्रमुख स्थान मिळते.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## लोकस्थिती

'हरहर महादेव'मध्ये राणोजी, तानाजी यांना पुढे आणले आहे. शिवाजीही पुढे येतात. गो. नीं. नी कोणाही एका व्यक्तीला महत्त्व देऊन कादंबरी लिहिली नाही; कारण त्यांना त्या काळाचे चित्र उभे करायचे होते. पुनः अनेकपक्षी, व्यामिश्र, गुंतागुंतीची व्यक्तिरेखा दांडेकर काढू शकत नाहीत. आधुनिक जीवनापासून दूर असलेलं पण ऐतिहासिक भव्यतेच्या काळात न्हाऊन निघालेलं मराटभोळा व्यक्तित्व चित्रित करणं त्यांना अधिक जमतं. 'हर हर महादेव'चा बराचसा भाग तत्कालीन लोकजीवनाचं चित्रण करण्यात खर्च झाला आहे. कलादृष्ट्या ते आवश्यकही होतं. 'हर हर महादेव' या मंत्राचा परिणाम व्हावा अशी परिस्थिती कशी होती हा या कादंबरीच्या आशयाचा महत्त्वाचा भाग. दांडेकरांना शिवाजीचं सामर्थ्य महान वाटलं तरी अतिमानवी वाटत नाही. शिवाजीसारखं व्यक्तित्व जोमानं अंकुरावं अशी लोक-स्थिती कशी होती हे दांडेकरांनी दाखवलं आहे. मावळ प्रांताची जहागिरदारी शहाजीकडे होती पण राज्य आदिलशाहीचं होतं. सामान्य जनतेच्या नशिबी दारिद्र्य, वेठबिगार, अपमानकारक वागणूक, पिळवणूक, क्रूर छळ हेच होतं. देशमुखीच्या घरगुती वैरात बाजीराव बेचिराख होतो तर सावाजी पुढे मुसलमान होतो. दांडेकरांनी शिवाजीच्या कर्तृत्वाचा पाया शहाजीच्या पराक्रमात, त्याच्या विशिष्ट स्थानात, त्याच्या व जिजाऊंच्या मनातील हिंदवी स्वराज्य-स्थापनेच्या स्वप्नात दाखवून शिवाजीच्या कर्तृत्वातील अतिदैवी व दिव्य अंश कमी केला आहे. जिजाऊंच्या मावळखोऱ्यातल्या आगमनानंतर जनजीवनात केवढा प्रचंड प्राण ओतला गेला व समाजजीवन कसं बदलू लागलं याचं चित्रमय वर्णन गो. नीं. नी केलं आहे. गावगाडा पुन्हा कसा चालू होतो याचं तपशीलवार वर्णन ही गो. नीं. च्या लेखनातली मोठी जमेची बाजू आहे. रामदास शिवाजीची प्रत्यक्ष भेट दांडेकरांनी दाखविली नाही, पण रामदासांसारख्या संघटनाकुशल व देशकालपरिस्थितीची जाण असलेल्या माणसाचे प्रयत्न शिवाजीच्या कार्यास कसे पूरक होत होते याचं दिग्दर्शन केलं आहे. देशकालपरिस्थितीच्या चित्र-मय वर्णनांनी भक्कमपणे बांधीत आणलेली ही कादंबरी उत्तरार्धात मात्र रहस्यमय व गुंतागुंतीच्या घटनांच्या आकर्षक रोषणाईनं सामान्य वाचकाला दिपविणारी झाली असली तरी जाणत्या वाचकाला उताराला लागल्यासारखी वाटते.

## नाटकीपणा

गो. नीं.च्या कथानकात वाघांची माणसांशी झुंज आहे, सत्या बेरड, तानाजी यांच्या शक्तीच्या, पराक्रमाच्या आकर्षक घटना आहेत, जत्रेतल्या बगाड्याचे रोम-हर्षक वर्णन आहे. तलवारी, भाले, पट्टे चालविणाऱ्यांच्या कौशल्याची चित्रे आहेत.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कुस्त्यांचे फड आहेत. रानावनांतून फिरणाऱ्यांचे जोखमी किस्से आहेत. कादंबरी अर्धी अधिक झाल्यावर कथावस्तूला केंद्र लाभते. जानकीच्या पतीला बाजीराव देशपांड्याला तोरणा किल्ल्याच्या तळघरातून सोडवून आणण्याची बिकट कामगिरी राणोजी स्वीकारतो. ती पार पाडतो. या कामगिरीचं सर्व वर्णन रोमांचकारी वाटलं तरी त्यात फारच सुलभीकरण आहे. अशा रहस्यमय कामगिरीचं जे विलक्षण थक्क करणारं, बौद्धिक चातुर्यानं जमवलेलं विवरण असतं तसं गो. नी. करू शकत नाहीत. राणोजीला फारशा अडचणी येत नाहीत हे खरे. "चौकस नजरेनं राणोजी अवघ न्याहाळीत होता. जे तो इच्छित होता ते अगदी सहजगत्या घडून येत होतं." हे वाक्य कथानकबांधणीच्या ढिसूळपणावर व सोपेपणावर झक्क प्रकाश टाकतं राणोजीचे हे सर्व प्रयत्न सिनेमात शोभावेत इतपत आहेत. योगायोग, कृतक गुंतागुंत, श्वास रोखून धरावा इतक्या द्रुतगतीनं घडणाऱ्या घटना व नंतर सुटकेचा निःश्वास टाकावा अशी उकल, तोरणा किल्ला जिंकून घेताना जे डावपेच केले जातात त्यातही नाटकीपणा खूप जाणवतो. सरमा बेरडाचं आगमन तर हास्यास्पद ठरावं इतकं बालिश आहे. सामान्य मराठी वाचकाला हुंदके यावेत, डोळ्यांत पाणी जमावं असे कौटुंबिक प्रसंग उभे करण्यात गो. नी. वाकबगार आहेत. त्यांची शैली हरिदासी आहे. रसाळ शब्दांनी उत्कटता वाढवणारी, निवेदनानं भारावून टाकणारी पण नाटकी, अतिशयोक्तीची झालर असलेली, थोडीशी दिखाऊ.

## शिवाजीमहाराजांचं साक्षेपी व्यापकत्व

यानंतरच्या 'दर्याभवानी' मध्ये शिवकालीन कोकणची परिस्थिती नायिका आहे व महाराजांची आरमार उभारणी ही पार्श्वभूमी आहे असं जे पुरंदऱ्यांनी म्हटलं आहे ते सार्थ आहे. या कादंबरीत शिवाजीमहाराजांचं प्रौढ, विचारी, प्रगल्भ, साक्षेपी असं व्यक्तित्व प्रकर्षानं पुढं येतं. पुनः बाबासाहेब पुरंदरे यांचे विचार उद्धृत करण्यासारखे आहेत. "शिवाजी महाराजांचं या कादंबरीत घडणारं दर्शन अत्यंत विलोभनीय आहे. समर्थांनी म्हटलं, 'शिवरायाचं आठवावं रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप। शिवरायाचा आठवावा साक्षेप।'—या कादंबरीचं वैशिष्ट्य म्हणजे तो साक्षेप' या कादंबरीतून नेटकेपणानं सांगितला आहे. लोकांशी बोलणं कसं, हत्यारांशी वागणं कसं, वाडेकोटाशी जवळीक कशी, घोडीपाडी, प्रजाजन आणि गलबतं यांच्याविषयी माया कशी, गुणावगुणांची निरखपारख कशी, मुलखाची टेहळणी कशी, नद्यादर्यांची जपणूक कशी हा साक्षेप इथं दिसेल. यातूनच उभी राहणारी महाराजांची जिवंत मूर्ती आपल्या अंतःकरणात कायम राहते. स्वराज्य स्थापीत असताना माणसांचा व धनाचा संग्रह आणि उपयोग कसा करावा, आरमार व ते स्वावलंबी होण्यासाठी लागणाऱ्या इतर सर्व गोष्टींची जमवाजमव व घडण कशी करावी, धर्म,


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जात, यांच्या पलीकडे जाऊन योग्य माणसं कशी मिळवावी व त्यांचा उपयोग कसा करावा, हा सर्व साक्षेप अतिशय साक्षेपानं गो. नीं. नी मांडला आहे. अफझलखानाच्या वेळी येणारं संकट केवढं प्रचंड होतं किती सर्वग्रासी होतं व अशा वेळी महाराज किती शांत व धिम्या बुद्धीनं कार्य करीत होते याचं उत्कृष्ट दर्शन गो. नीं. नी घडवलं आहे."

दांडेकरांचे दर्या व त्यावरचे जीवन याचे अवलोकन दांडगे आहे. दर्यावरचे वारे, त्याचा लहरीपणा, दर्यावर्दी लोकांचं कौशल्य, कर्तृत्व, वाहनांची विविध रूपं, जहाजांचे वेगवेगळे भाग, दर्यावर्दी लोकांच्या जीवनातील अस्थिरता, असुरक्षितपणा, अन्याय व अत्याचार, चाचेगिरी हे सर्व दांडेकरांनी बारकाईनं अभ्यासलं आहे. साहजिकच त्याच्या कादंबरीत दर्यावर्दी जीवनाचा बराचसा साक्षात्कारी प्रत्यय येतो हे खरं आहे. तत्कालीन कोकणपट्टीवरचा बाजार, व्यापार, लोक, उत्सव, शिल्पसौंदर्य, देवळं या सर्वांचं वर्णन प्रभावशाली झालं आहे.

यातली एकेरी पण जिवंत माणसं मनावर ठसठशीत प्रभाव टाकतात. जिद्दीचा कोकणी बाबलभट्ट, झुंजार मायनाक या महत्त्वाच्या व्यक्तिरेखा आहेत. अवघड वाटांतून वाट काढीत जाणं, गड चढणं इ. वर्णन करताना गो. नी. आत्मप्रत्ययाच्या आवेशानं भारलेले असतात. काही प्रसंगी गो. नीं. विलक्षण भावविवश होतात व कलात्मक तोल ढासळतो. शिवाजी कोण आहे याची निश्चित कल्पना नसतानाच धनगर त्याला मिळालेली सुवर्णमुद्रा ते गड चढल्यावर त्यांच्यावरून ओवाळून फेकून देतो हा प्रसंग यापैकीच.

'झुंजार माची' (१९७२) या कादंबरीतही महाराजांचा साक्षेप आहेच. मोक्याच्या जागी गड बांधणे, ते चौबाजूंनी सामर्थ्यशाली व स्वावलंबी बनतील याचं अवधान ठेवणं, स्थानिक लोकांना समजून घेणं, त्यांना महत्त्व देऊन आपलंसं करून घेणं पण त्यांच्या वेड्या कल्पनांचा मुलाहिजा न ठेवणं, महाराजांची स्त्री-विषयीची उदात्त दृष्टी, निःपक्षपाती न्यायदान, गरिबांच्या मोलमजुरीबद्दलची दक्षता, महाराज म्हणजे आधार आहेत असं वाटावं यासाठी घेतलेले कष्ट, जनतेची महाराजांवरची अलोट भक्ती व त्यांच्याविषयीची आदरयुक्त भीतीही–या सर्व पैलूंचं दर्शन या कादंबरीत घडवलं आहे. वैयक्तिक सुखदुःख बाजूला ठेवून स्वराज्याचं अहोरात्र चिंतन करणं, हाताखालच्या माणसांच्या वैयक्तिक सुखदुःखाविषयी सहानुभूती ठेवणं, महाराजांची सौंदर्यदृष्टी यांचाही गो. नीं नी साक्षात्कार घडविला आहे. गड हा त्या युगातली राज्याची धुरा होती. गो. नीं. चा 'गड' हा अतिशय प्रेमाचा विषय. साहजिकच या कादंबरीत गो. नीं. च्या आवडीचं चोज पुरवून घ्यायला भरपूर संधी मिळाली आहे.

मराठी राज्याचं दुर्दैव असं होतं की थोडीशी घडी बसते, स्थिरस्थावर होते न होते तोच उत्तरेकडून यावनी सेनेचं प्रचंड आक्रमण व्हावं. त्याचबरोबर रजपुतांची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांना मदत असावी. महाराजांना या वेळी समझौत्याची भूमिका घ्यावी लागली. राजकीय घटनांचं विस्तारानं वर्णन, निवेदन गो. नी. करीत नाहीत, कारण वाचक-वर्गाचा त्याच्याशी परिचय असतोच. स्वराज्याची उभारणी करणारा विचारी, मुत्सद्दी व कर्तृत्ववान साक्षेपी राजा म्हणून शिवाजीची प्रतिमा त्यांना उभी करावयाची होती. ती करण्यात ते यशस्वी झाले आहेत.

## भडकपणा

दांडेकरांनी काही घटना भडक व नाटकी वाटाव्यात अशा तऱ्हेनं वर्णिल्या आहेत. 'बया दार उघड 'मध्ये चित्रावशास्त्र्यांच्या पाठीवर आसूड ओढताना सुलतान शेलार एक हजार होन देण्याचे आश्वासन देतो व त्यानंतरचा सर्वच प्रसंग कृत्रिम व भडक वाटतो. चोरून महत्त्वाच्या गुप्त बातम्या ऐकायचे व कथेचे धागे जुळ-वायचे ही जुनी परंपरा गो. नीं. च्या कादंबरीतही दिसते. सुलतान चित्रावशास्त्र्यांची गुप्त खलबते सावजी चोरून ऐकतो, सावजीचा कट मोलकरणीच्या कानावर पडतो. चित्रावशास्त्र्यांची कन्या बटकी म्हणून विकली जाते व शेवटी ती नेमकी त्यांच्या-समोर तोंड बांधलेल्या स्थितीत येते ! चित्रावशास्त्री व राणोजी यांची योगायोगानं गाठ पडते. हे सर्व प्रसंग बेगडी वाटतात. जमिनीत पुरलेलं धन मिळविण्याचे शकुन तर वारंवार होतात. शिवाजीच्या प्रयत्नांसाठी आर्थिक बळ कुठून मिळते याचे समाजशास्त्रीय वा अर्थशास्त्रीय उत्तर गो. नीं. च्या पाशी नसते व यामुळे कादंबरीतला मोठा भाग कच्चा राहून जातो. महाराजांच्या तोफांचा व जहाजांचा कारखाना निर्विघ्नपणे चालतो ही घटना एकांगी वाटते. ही प्रचंड घटना तत्कालीन राजवटीला कशी कळली नाही ? कळली तर तिचे महत्त्व उमजले कसे नाही ! सिंधुदुर्गाचे बांधकाम चालले असताना सिद्दी व अरब हे शांत कसे राहिले ! या महत्त्वाच्या गोष्टींचा उलगडा या ऐतिहासिक कादंबऱ्या करू शकत नाहीत.

## स्थितिवादी दृष्टिकोण

दांडेकर मनानं रोमँटिक आहेत. त्यांची बाह्य वास्तवाची अवलोकनशक्ती जबर आहे. पण त्यांचा ऐतिहासिक दृष्टिकोण स्थितिवादी आहे. निसर्ग, गुहा, डोंगर, दरीखोरी, झाडेझुडपे, वनस्पती, वन्य प्राणी, अरण्ये, श्वापदे, गड, किल्ले यांत ते खूपच रंगून जातात. तत्कालीन लोकांच्या जीवनरीतींचा, पोषाखपद्धतीचा, बोलण्या-वागण्याचा त्यांचा अभ्यास दांडगा आहे. तरीही त्यांच्या कादंबऱ्या पुरेसे समाधान देत नाहीत. याचे कारण त्यांनी शिवकालाचे चित्र उभे केले तरी ते चित्र परिस्थिती-च्या ज्या गुंतागुंतीतून निर्माण झाले त्या गुंतागुंतीचा वेध पुरेसा सखोलपणे ते घेऊ शकले नाहीत असे जाणवत राहते. याचे कारण ऐतिहासिक वातावरणाचे त्यांचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अवलोकन जबर असले तरी ऐतिहासिक दृष्टिकोणाचे बळ त्यांच्यापाशी नाही. तत्कालीन जीवनातील कित्येक साधने, हत्यारे त्यांना माहीत आहेत, पण आर्थिक परिस्थितीची पुरेशी जाणीव त्यांच्याकडे नाही. दांडेकरांची प्रेरणा शिवकाल उभा करण्याची असली तरी ती व्यक्तिपूजेची व पुनरुत्थानवादी आहे. शिवकालाशी ते भावनेने समरस झालेले. त्यामुळे कादंबरीतून एक प्रकारचा सोपेपणा व सरळीकरण आले आहे. शिवाजीच्या बाजूचे ते सर्व चांगले व विरुद्ध बाजूचे ते सर्व क्रूर, आक्रमक, अमानुष. साहजिकच माणसांचे वैविध्यपूर्ण नमुने मिळत नाहीत व काळाचे बव्हंगी, सखोल दर्शन घडत नाही.

## संस्कारी लेखक

गो. नी. दांडेकरांच्या सर्व लेखनाचा विचार करताना असं वाटत राहतं की, निसर्गदत्त प्रतिभेचं प्रचुर दान लाभलेल्या या कलावंतानं आपल्या संस्काराशी आपलं इमान राखलं तेवढा संस्काराच्या मूल्यवत्तेचा विचार केला नाही. त्यामुळे खूपच मर्यादा त्यांच्या साहित्याला पडल्या. गो. नी. दांडेकरांच्या कादंबऱ्या सामान्य माणसाच्या व्यथेचं चित्रण करतात, पण त्यांची माणसं एकेरी व गतानुगतिक असतात. ती काळाशी संधान राखू शकत नाहीत. म्हणूनच त्यांचं लेखन सामाजिक जाणिवांनी फारसं समृद्ध झालेलं नाही. गो. नीं. चं अनुभवविश्व भावनेनं भारावलेलं असलं तरी विचारांचे व चिंतनाचे त्यावर संस्कार कमी झाल्यामुळे त्याचं मूल्य खूपच कमी झालं. पण त्यांनी निर्माण केलेल्या एकेरी माणसांत सच्चेपणा आढळतो, त्यांच्या श्रद्धांशी व मूल्यांशी सहमत होता आलं नाही तरी त्यातल्या प्रेमाचा, आत्मीयतेचा, माणसाविषयीच्या उदंड कळकळीचा, सत्प्रवृत्तीकडे असलेल्या प्रचंड आकर्षणाचा म्हणजे सत् संस्कारांच्या अनिवार ओढीचा सामान्य वाचकावर भावनात्मक परिणाम होतो. गो. नी. दांडेकरांना लाभलेल्या लोकप्रियतेची ही मीमांसा एक गोष्ट स्पष्ट करते आणि ती म्हणजे त्यांचा वाचकवर्ग संख्येनं मोठा आहे. कारण अशाच मनोवृत्तीचा वर्ग शिक्षित समाजात आजतरी अधिक आहे. आज आधुनिकतेच्या नावाखाली येणाऱ्या विकृतींच्या छायांनी भेडसावलेल्या मनाला हे साहित्य भूल पाडतं हे खरं आहे, पण आधुनिकतेचा खरा व सर्वस्पर्शी विचार व संस्कार गो. नीं. ना लेखनात देता आला नाही हे मान्य करावं लागेल. गो. नीं. च्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतून त्यांनी केलेल्या तत्कालीन जीवनाच्या वस्तुनिष्ठ स्वरूपाचं चित्रणही महत्त्वाचं ठरतं. गो. नी. दांडेकरांच्या कादंबऱ्यांत ' माचीवरचा बुधा ', ' मोगरा ', ' आम्ही भगीरथाचे पुत्र ', ' कुणा एकाची भ्रमणगाथा ' या कृतींचं महत्त्व अनेक दृष्टींनी मान्य होण्यासारखं आहे. एखाद्या कादंबरीकाराला ' मेजर रायटर ' म्हणून मानाचा मुजरा करायला एवढं कर्तृत्व पुरेसं वाटावं.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# ज्ञानेश्वरांचा चातुर्वर्ण्यविषयक विचार : आक्षेप व निरसन

ग. के. कानडे

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या श्रीज्ञानेश्वर विशेषांकात ' ज्ञानेश्वरीवरील आक्षेप : एक चिंतन ' हा श्रीमती म. गं. नातू यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखात लेखिकेने ज्ञानेश्वरांच्या चातुर्वर्ण्यविषयक विचारांवर व विशेषतः त्यांनी शूद्रांसंबंधी दिलेल्या दृष्टान्तांचे बाबतीत टीकेची अभूतपूर्व झोड उठवली आहे. आमच्या या लेखात श्रीमती म. गं. नातू यांनी केलेल्या टीकेचा परामर्श घेत असताना ज्ञानेश्वरांची चातुर्वर्ण्यासंबंधी विचारांची सुसंगती स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

या लेखातील सर्व ओव्या महाराष्ट्र राज्य शिक्षणखाते, मुंबई तर्फे प्रकाशित ' श्रीज्ञानेश्वरी ' आवृत्ती तिसरी ( १९६३ ) यातून घेतल्या आहेत. शं. वा. दांडेकर यांनी संपादित केलेली राजवाडे प्रत ती हीच होय. हिला सरकारी प्रतसुद्धा म्हणतात. आम्ही हीच एकमेव प्रत प्रमाण मानली आहे. श्रीमती म. गं. नातू यांनी हीच प्रत ( आवृत्ती २ री ) विवेचनार्थ घेतली आहे. त्यामुळे त्यांनी उद्धृत केलेल्या ओव्या जशाच्या तशाच आमच्या लेखात उद्धृत झाल्या आहेत.

सुरुवातीस लेखिकेने पहिला युक्तिवाद केला आहे तो असा—लेखिका लिहिते, " धर्मग्रंथांना केलेला विरोध आपणास मुळीच खपत नाही. हे ग्रंथ आपण त्रिकालाबाधित व अत्यंत पवित्र मानतो. या ग्रंथांचे कर्ते साक्षात्कारी आहेत अशी आपली श्रद्धा असल्याने त्यांना संपूर्ण सत्य गवसले आहे अशी आपली खात्री असते... विज्ञानाचे क्षेत्रात असे घडत नाही. कारण वैज्ञानिकांना आपण साक्षात्कारी व्यक्ती मानीत नाही, म्हणून न्यूटन व आइन्स्टाइन यांच्यात विरोध निर्माण झाला किंवा आइन्स्टाइन न्यूटनच्या पुढे गेला म्हणून पावित्र्यविडंबनाची वगैरे ओरड करून कोणी हुल्लड माजवीत नाही. पण त्यामुळेच या क्षेत्रात सतत प्रगती होत राहते... पण धर्माची उभारणी साक्षात्कारावर असल्याने या क्षेत्रात तर्काची प्रतिष्ठा मुळीच नसते. श्रद्धा हेच एकमेव प्रमाण असते. त्यामुळे धार्मिक ग्रंथांच्या बाबतीत विचारविनिमय करणे अशक्य कोटीतील होऊन बसते. माझी भूमिका तशी नाही. अशा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ग्रंथांतील जे परलोकविषयक विचार आहेत त्यांना कसलाच शास्त्रीय पुरावा नसल्याने त्यासंबंधी मी उदासीन आहे; व त्यांतील जे विचार ऐहिक जीवनाविषयी आहेत त्यांच्याकडे समाजशास्त्राच्या भूमिकेतून पाहणे मला अवश्य वाटते. या भूमिकेवरूनच ज्ञानेश्वरीवरील आक्षेपांचा परामर्श मी घेणार आहे. "

सर्व धर्मग्रंथांना एका गाठोड्यात बांधून त्या गाठोड्याला साक्षात्कारी ही संज्ञा देऊन लेखिकेने वाचकांची दिशाभूल केली आहे. सर्वसाधारणपणे धर्मग्रंथ हे दोन प्रकारचे असतात : पहिल्या प्रकारच्या ग्रंथांत तत्त्वज्ञान, साक्षात्कार किंवा मोक्ष हा मुख्य विषय असतो; तर दुसऱ्या प्रकारच्या ग्रंथांत आचारधर्म मुख्यत्वे सांगितलेला असतो. हा आचारधर्म व्यक्तीचा व समाजाचा विधि-निषेधात्मक अशा दोन्ही रीतींनी सांगितलेला असतो. व्यक्तिविषयक आचारधर्म नैतिक व सोळा संस्कारयुक्त तर सामाजिक धर्म चातुर्वर्ण्य व चार आश्रम यांवर आधारित असा सांगितला जातो. आचारधर्म हा लवचिक, युगायुगातून बदलणारा म्हणून परिवर्तनीय असा असतो. आचारधर्म हा परिवर्तनीय आहे किंवा नाही हे ठरवण्यास एखाद्या शास्त्रीपंडिताचे मत घेण्याची आवश्यकता नाही. कारण आचारधर्म हा परिवर्तनीय असतो हे एक उघड ऐतिहासिक सत्य आहे. आचारधर्मात बदल झाला म्हणून साक्षात्काराला काही उणेपणा येत नाही. वर्णाश्रमाच्या पडत्या काळातही योगी अरविंद, रमण महर्षी व पावस येथील स्वरूपानंद हे साक्षात्कारी पुरुष निर्माण झालेले आहेत. साक्षात्कारी संतांना संपूर्ण सत्य गवसले आहे असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा ते सत्य फक्त साक्षात्कारांतर्गतच असते म्हणजे आत्म्याच्या ज्ञानाबद्दल असते. साक्षात्कारित्व हे सर्वच्या सर्व धर्मग्रंथांना लागू करता येत नाही. पहिल्या प्रकारच्या धर्मग्रंथांत ब्रह्मविद्येबरोबर कधी कधी ऐहिक व सामाजिक व्यवस्थेबद्दलही धर्म सांगितलेले असतात. उदा. गीतेत व ज्ञानेश्वरीत वर्ण, आश्रम, युक्त आहार, युक्त विहार, युक्त चेष्टा यांचे प्रयोजन सांगितलेले आहे. अशा रीतीने प्रयोजन सांगण्याची दोन कारणे संभवतात. एकतर सांगितलेला समाजधर्म व व्यक्तिधर्म त्या परिस्थितीत आत्मज्ञानास पोषक व्हावा या दृष्टीने सांगितला जातो. म्हणजे आत्मज्ञानसापेक्ष समाजरचना व सामाजिक आशय असावा ही दृष्टी असते. दुसरे कारण असे की, काही ठरावीक कालखंडात समाजोन्नतीच्या नियमांचे एखादे शास्त्र निर्माण होत असते. ते शास्त्र त्या कालखंडात पाळणे हे प्रत्येक घटकाचे कर्तव्य ठरते. हल्लीच्या काळात आजमितीला सुद्धा समाजाचे व व्यक्तीचे नियमन करणारे राज्यघटनेपासून तो भाडे-नियंत्रण व संतति-नियमन कायद्यापर्यंत पुष्कळ कायदे अस्तित्वात आहेत. प्राचीन काळी ही स्थिती नव्हती. ही उणीव दुसऱ्या प्रकारचे धर्मग्रंथ भरून काढीत असत. या शास्त्रांना पाठिंबा देण्याकरता म्हणून साक्षात्कारी ांतून वचने येतात. सामाजिक शास्त्रांना पाठिंबा देणारी वचने ही काही ब्रह्मविद्यांतर्गत अंतिम सत्ये नव्हत. तत्कालीन शास्त्र हे त्या त्या ठरावीक कालखंडात

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रभावी असते. कालखंड बदलला, नवीन युग निर्माण झाले तर पूर्वसूरी नवीन शास्त्रे निर्माण करीत, आणि मग मतांतरे निर्माण होत.

श्रुतिर्विभिन्ना स्मृतयो विभिन्ना नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्।
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पंथाः॥

मग जुना आशय नवीन परिमाणांत बसवला जातो. याप्रमाणे श्रीज्ञानेशांनी संस्कृताची गहन तीरे तोडून त्या ठिकाणी मराठीचे सुंदर घाट बांधून ब्रह्मविद्येचा सुकाळ केला. 'नाहीं श्रुतिपरौति माऊली जगा' असे सांगत असतानाच वेद फक्त तीन वर्णांच्या कानी लागला याचा त्याला पश्चात्ताप करावयास लावून मागचे उणे फेडावयास लावले. एवढेच नव्हे तर भगवद्‌गीतेला वेदांचे मूळ किंवा बीज ठरवले. स्त्री व शूद्रांना मोक्षाचे द्वार सताड उघडे केले, याप्रमाणे श्रीज्ञानेश 'शके बाराशतें बारोत्तरे' महाजनांचे अग्रदूत ठरले. स्त्री-शूद्रांच्या बंधविमोजनाचा 'श्रीज्ञानदेवें रचिला पाया' असे म्हणणे सयुक्तिकच ठरेल. प्रथम आध्यात्मिक, धार्मिक, मग राजकीय व नंतर सामाजिक सुधारणा होणे हे स्वाभाविक आहे. उत्क्रान्तीची ही क्रमवार पदचिन्हे आहेत.

भगवद्‌गीता व ज्ञानेश्वरी हे ग्रंथ अध्यात्म तत्वज्ञानाचे, ब्रह्मविद्या प्रतिपादन करणारे, मोक्षाचे निरूपण करणारे, आत्मसाक्षात्काराचे शास्त्र सांगणारे आहेत याबद्दल कोणाचेच दुमत नाही. पण लेखिका या बाबतीत उदासीन आहे.

अंतिम सत्यशोधनाला, साक्षात्काराला बुद्धिप्रामाण्य जरी अगदी शेवटच्या टप्प्यावर अपुरे पडले तरी तेथपर्यंतची वाटचाल बुद्धीची कास धरून करावी लागते. आणि म्हणून लेखिकेने तिच्या लेखात लिहिलेल्या पुढील भागाची चर्चा करण्याचे आम्ही ठरवले आहे.

लेखिकेने ज्ञानेश्वरांवर तीन आक्षेप घेतले आहेत ते असे : आक्षेप-( १ ) या ग्रंथात ज्ञानेश्वर उघड उघड विषमतेवर आधारलेल्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा निःशंकपणे पुरस्कार करतात ( २ ) व त्या ओघात ते वर्णावर्णातील श्रेष्ठ-कनिष्ठ भावाचा पाठपुरावा करतात. ( ३ ) एवढेच नव्हे तर शूद्रांबद्दल तुच्छता, उपहास व अवहेलना दाखवतात.

श्रीज्ञानेश्वर ज्ञानेश्वरी या ग्रंथात चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा पुरस्कार करतात हे खरे आहे. पण ती व्यवस्था विषमतेवर आधारलेली आहे हे विधान सर्वमान्य होण्यासारखे नाही. वर्णव्यवस्थेचे स्वरूप वर दिसावयास विषमतेवर आधारलेले दिसले तरी ते स्वरूप समाजातील श्रमविभागणीच्या तत्त्वावर अधिष्ठित झालेले आहे. श्रमविभाग नसेल तर समाजपुरुष स्थिरजीवन जगू शकणार नाही. क्षात्रवृत्तीची जोपासना करणारा घटक राहिला नाही तर एखादे राष्ट्र शत्रूच्या भक्ष्यस्थानी पडल्यावाचून राहणार नाही. वर्णव्यवस्थेत दुसरे तत्त्व अनुस्यूत आहे ते हक्कत्यागाचे. ब्राह्मणांना

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

क्षात्रधर्म स्वीकारून राज्य करण्याचा अधिकार नव्हता. हा अधिकार नसणे म्हणजेच ब्राह्मण वर्णाचा सत्ता म्हणजे राजेशाहीसंबंधी हक्कत्याग होय. वर्णव्यवस्थेत याचप्रमाणे प्रत्येक वर्णास परस्परसंबंधात काही ना काही तरी हक्कत्याग करावाच लागतो. अशा रीतीने श्रमविभागणीच्या तत्त्वानुसार हक्कत्यागाचा स्वीकार चातुर्वर्ण्य-व्यवस्थेत रामायण-कालापासून तो ज्ञानेश्वरकालापर्यंत चालत आलेला आहे. या प्रश्नाला आणखी एक बाजू आहे. ती म्हणजे आर्थिक बाजू होय. याचे सविस्तर विवेचन डॉ. स. रा. गाडगीळ[1] यांनी ज्ञानेश्वर विशेषांक (महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका) यात केलेले आहे, ते उद्‌बोधक आहे. जिज्ञासूंनी ते मुळातून अवश्य पाहण्यासारखे आहे.

चातुर्वर्ण्यव्यवस्था विषमतेवर आधारलेली आहे काय? चातुर्वर्ण्य-व्यवस्था श्रम-विभाग, वर्णांचा परस्पर संदर्भात हक्कत्याग व प्रत्येक वर्णास उदरनिर्वाहाची निश्चिती या तत्त्वांवर उभारलेली आहे काय? या दोन प्रश्नांचा एकसमयावच्छेदेकरून विचार केल्यास दिसून येईल की, विषमता निर्माण करण्याकरता चातुर्वर्ण्य जन्मास आले नाही. विषमता हा त्याचा आधार नाही. या बाबतीत ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टा ' या श्लोकाचा भावार्थ सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात—ज्ञा. ४-७५ ते ४-७९ अर्थ— " त्याप्रमाणे या सर्व भजनाला मी साक्षीभूत आहे. स्वतःची भावनाच स्वतःला फलद्रूप होत असते. (पण या ठिकाणी मी त्याला फल दिले व त्या फलाचा निर्माणकर्ता मी आहे, असे मानण्यात येते.) आता अगदी याच प्रकारे हे चारी वर्ण मी गुणकर्माच्या विभागाने उत्पन्न केले. (परंतु असे) की, प्रकृतीच्या आधारावर व गुणांच्या संमिश्र-णाने तदनुसार कर्माची विवंचना होत असते. हे अर्जुना, येथे हे एकच होते परंतु ते चार वर्णांचे झाले. अशी ही गुणकर्मांनी सहज निवड (कडसणी) केली आहे. म्हणून हे पार्था, ऐक, याचकरता मी वर्णभेदसंस्थेचा कर्ता सर्वथा नाही. " Let there be light and there was light. अशा देवाच्या आज्ञेने एकदम चार वर्ण अस्तित्वात आले नाहीत, तर ' ऐसा एकाचि प्राणिवृंदा। भेदु वर्णा चतुर्धा। गुणीं चि इहीं प्रबुद्धा। केला जाण ॥ १८·८२७ प्राचीन काळी हा एकच प्राणिवृंद होता तर योग्य समय आल्यास चारांचा एक झाला तर काही बिघडणार नाही.

दुसरा आक्षेप असा की, " ते वर्णावर्णांतील श्रेष्ठ-कनिष्ठ भावाचा पाठपुरावा करतात. " ज्ञानेश्वरीतील विचार पाहिल्यास तो विचार लेखिकेने केलेल्या सरसकट आरोपाच्या अगदी विरुद्ध आहे. शूद्रवर्णासंबंधी विचार आम्ही पुढे करणार आहोत. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य वर्ण यासंबंधी ज्ञानेश्वरांचे विचार प्रगल्भ व समतावादी आहेत.

---

१. ' मध्ययुगीन धर्मसाधना आणि ज्ञानेश्वरांचे युगप्रवर्तन ' ले. डॉ. स. रा. गाडगीळ, ' श्रीज्ञानेश्वर विशेषांक ', पृ. ६२, महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणि वैश्यक्षत्रिय ब्राह्मण । हे द्विजन्मे तीन्ही वर्ण ॥ १८-८७९ ॥
एर क्षत्री वैश्य दोन्ही । ते ही ब्राह्मणाचां चि मानीं ।
जे ते वैदिक विधानीं । योग्य म्हणौनि ॥ १८-८१६ ॥

क्षत्रिय व वैश्य हे ब्राह्मणांप्रमाणेच द्विज आहेत. ते 'द्विजन्मे' असल्या कारणाने वैदिक विधानांना म्हणजे वेदोक्त कर्मांना अधिकारी आहेत. म्हणून त्यांना ब्राह्मणांच्या बरोबरीने मानावे. वरील ओव्या अर्थाच्या दृष्टीने निःसंदिग्ध आहेत. लेखिकेने या ठिकाणी ज्ञानेश्वरांवर निष्कारण, निराधार व विनवुडाचा आरोप केला आहे.

ज्ञानेश्वरांच्या काळात चौथा वर्ण जो शूद्र त्यास अस्पृश्य मानीत असत. त्रैवर्णिकांची सेवा हा त्यांचा धर्म सांगितला होता. या धर्माचे आचरण करीत असताना शूद्रांपैकी काहींना साफसफाईची तर काहींना अस्वच्छतेची तर काहींना दुर्गंधीची तर काहींना मृत जनावरे ओढण्याची कामे वाट्यास आली होती. इतरांस त्यांचेपासून घाणीचा संपर्क होऊ नये म्हणून त्यांना अस्पृश्य ठरविले गेले असले पाहिजे. त्या काळात हल्ली माहिती असलेली जंतुनाशके, शुद्धके व यंत्रांनी घाण साफ करण्याच्या सोयी उपलब्ध नसल्याने एक लक्ष्मणरेषा आखून दिली असली पाहिजे व ती रेषा म्हणजे शूद्रांना न शिवणे होय. त्या कालात समाजदृष्ट्या ही एक अत्यंत अपरिहार्य गोष्ट होती. आणखी एका दृष्टीने या घटनेचा विचार केला पाहिजे. त्या कालात अस्पृश्यता हा एकच प्रकार होता काय? किंवा आणखीही घटनांचा संबंध अस्पृश्यतेशी निगडित होता? त्या कालच्या समाजात अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या आणखी चार घटना अस्तित्वात होत्या. ( १ ) त्रैवर्णात पण विशेषतः ब्राह्मण वर्गात जो माणूस स्नान करून शुचिर्भूत झाला व सोवळे अगर धूत वस्त्र नेसला तो माणूस स्वतःच्या घरातीलसुद्धा सोवळ्यात नसलेल्या इतर व्यक्तींना अस्पृश्य मानीत असे व तसा रोखठोक व्यवहारही घडत असे. ( २ ) त्रैवर्णिकांत एखादे स्त्रीस मासिक पाळी आली असताना त्या कुटुंबातील व समाजातील इतर माणसे त्या स्त्रीस अस्पर्श मानीत असत. शूद्राप्रमाणेच तिला वागणूक मिळत असे. ( ३ ) कोणत्याही वर्णात एखादी व्यक्ती मृत झाली असता ज्यांना सुतक येते अशा सर्व व्यक्ती सुतक काळात इतर सर्वांच्या दृष्टीने अस्पृश्य मानले जात व तसा व्यवहारही घडत असे. ( ४ ) बालक जन्मास आले तरीसुद्धा आईबापांस ठरावीक प्रमाणात अस्पृश्य मानण्याची चाल होती. अशा तऱ्हेचे अस्पृश्यतेसंबंधी विश्लेषण एका जडवादी पण विचारवंत लेखकाने[१] केले आहे. त्या काळात अशा रीतीने अस्पृश्यता निरनिराळ्या स्तरावर ब्राह्मण ते शूद्रापर्यंत प्रतिष्ठित होती. त्या कालात अशा रीतीने अस्पृश्यतेचे पालन करण्यात कोणी कोणाचा अपमान करतो ही कल्पनाही कोणाच्या डोक्यात येत नसे. अंशतः धार्मिक

१. 'वाटा तुझ्या माझ्या' ले. प्रा. नरहर कुरुंदकर.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

व अंशतः सामाजिक असे ते व्यवस्थापन होते. या व्यवस्थापनेत निरनिराळ्या स्तरांवर सर्व समाज सहभागी होत असे.

इतर वर्णांना तुच्छ किंवा हलके न लेखता प्रत्येक वर्णाने आपली कर्तव्ये पार पाडणे हे वर्णव्यवस्थेचे मूळ व शुद्ध स्वरूप होय.

सध्याच्या वाङ्मयात वर्णव्यवस्थेच्या विषमतेसंबंधी अत्यंत कटू अशी टीका करण्यात येते. बारकाईने विचार केला तर सामान्य माणूससुद्धा या विषमतेच्या कचाट्यातून सुटू शकत नाही असे दिसून येईल. सामान्य माणूससुद्धा घरी भांडी घासण्यास व इतर किरकोळ कामे करण्यास मोलकरीण किंवा गडीमाणूस ठेवतो. सामान्य शेतकरीसुद्धा शेतकाम करण्याकरता मजूर ठेवतो किंवा सालदार–महिनदार ठेवतो. वरील दोन्ही बाबतींत मालक–मजूर असे नाते निर्माण होते. उच्चनीच भाव निर्माण होतो. विषमता निर्माण होते. पण ही विषमता विषमता म्हणून मानली जात नाही. सामाजिक विषमतेचा आर्थिक विषमता हा एक भाग आहे. पूर्वी अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या ज्ञातीचे महापुरुष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना दरमहा १५०० रु. मिळत असत व त्यांच्याच ज्ञातीतील सामान्य मजुराला २॥ आणे रोज मजुरी मिळत असे. ही विषमता मानली जात नाही. कल्याणकर्त्या सामाजिक किंवा राष्ट्रीय व्यक्तींची व संस्थांची आर्थिक श्रेष्ठतम उच्चता आपण विषमता मानीत नाही. या न्यायाने सुद्धा वर्णव्यवस्थेतील घटकांचा वा व्यक्तींचा विचार व्हावयास पाहिजे.

ज्या कालात मानवाच्या समाजरचनेस सुरुवात झाली होती, ज्या कालात यंत्रे व यांत्रिक उत्पादन स्वप्नातसुद्धा नव्हते अशा काळात श्रमविभाग, हक्कत्याग व व्यवसाय-निश्चिती यांवर आधारलेली वर्णव्यवस्था आपल्या पूर्वजांनी प्रतिष्ठित केली व जवळ-जवळ ३०० वर्षे जोपासली. एक समाजपुरुष चार अंगांनी निर्माण केला. या समाज-पुरुषाचे नीट संतुलन असावे व नीट संचलन व्हावे म्हणून त्यातील प्रत्येक वर्णाला काही बंधने व कर्तव्ये घालून दिली. बंधने व कर्तव्ये म्हटली म्हणजे वर्णघटकाच्या स्वातंत्र्याला थोडीबहुत मर्यादा पडणारच. मग काही लोकांना विषमता निर्माण झाल्याचा भास होत राहतो. समतेच्या युगातसुद्धा संपूर्ण विषमता नाहीशी करणे अवघड असते अशी वस्तुस्थिती असताना इ. स. पूर्व २००० ते इ. स. १३०० या कालखंडात चालत आलेल्या चातुर्वर्ण्य या संस्थेवर आतापर्यंत केलेले सर्व विवेचन लक्षात घेता विषमतेच्या नावाखाली आर्यांचा वर्णधर्म, भगवद्गीतेत व ज्ञानेश्वरीत स्वीकारलेले चातुर्वर्ण्य यांजवर कोरडे ओढणे अनुचित ठरेल. यंत्रयुगपूर्व कालात चातुर्वर्ण्यव्यवस्थेने एकंदरीत समाजाचे धारण, पोषण व रक्षण योग्य प्रकारे केले असे मत विनोबा[1] व सी. व्ही. वैद्य[2] या विद्वानांनी मांडले आहे.

१. 'गीताप्रवचने' ले. विनोबा. अध्याय १४ पाने १८२–१८३ आवृत्ती ५ वी.
२. 'हिंदुधर्माची तत्त्वे', पान १५१, ले. चिं. वि. वैद्य एम. ए. एल. एल. बी.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आता तिसऱ्या व शेवटच्या आक्षेपाचा विचार करावयाचा आहे. तो आक्षेप असा– ' एवढेच नव्हे तर ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरी या ग्रंथात शूद्रांबद्दल तुच्छता, उपहास व अवहेलना दाखवतात. ' हा आरोप सिद्ध करण्यास लेखिकेने ज्ञानेश्वरीतील दृष्टान्त उद्धृत केले आहेत. त्यांचा विचार आम्ही क्रमशः करणार आहोत. विधानात्मक अस्तिपक्षी वचने लेखिकेला देता आली नाहीत. दृष्टान्ताचा उपयोग दृष्टान्त म्हणून करावयाचा असतो. एखाद्या प्रसंगातून जे साधर्म्य उचललेले असते त्या साधर्म्याविषयी फक्त कर्तव्य असते. तो प्रसंग वा घटना योग्य का अयोग्य याचा विचार तेथे अप्रस्तुत असतो. उदा० तिसऱ्या अध्यायात ' स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या श्लोकावरील भावार्थ–दुसऱ्याचा धर्म वा आचार दिसावयास कितीही चांगला असला तरी आपलाच धर्म आपण पाळला पाहिजे हे सांगण्याकरता ज्ञानेश्वर दृष्टान्त देतात––

सांघे शूद्रगृहीं आघवीं । जऱ्है पक्वान्नें आथी बरवीं ।<br>
तियें द्विजें केवि सेवावी । दुबळा जऱ्हि ॥ ३–२१६ ॥

हा दृष्टान्त शूद्रांची अवहेलना करणारा आहे असे लेखिका म्हणते. लेखिकेचे हे म्हणणे अप्रयोजक आहे. कारण दृष्टान्तातील कर्ता व दृष्टान्त देणारा कर्ता एकरूप असत नाहीत. लेखिकेने काढलेले अनुमान, " म्हणजे ब्राह्मण जरी दरिद्री असला तरीही त्याने शूद्राच्या घरची उत्तम पक्वान्ने खाणे त्यांच्या मते अयोग्य ठरते." हे बरोबर नाही. येथे मत देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. दृष्टान्तस्वरूपी मत अभिव्यक्त होत नसते. आणखी ज्ञानेश्वरांच्या काळात शूद्रवर्ण अस्पृश्य होता ही वस्तुस्थिती होती. तत्कालीन शास्त्र, समाज व रूढी यांना अस्पृश्यता संमत होती. अशा काळात ब्राह्मण दुबळा जरी झाला तरी त्याने शूद्राघरी सगळी चांगली पक्वान्ने आहेत म्हणून ती कशी सेवन करावीत म्हणजे शास्त्रतः त्याला कशी सेवन करता येतील असे दृष्टान्तस्वरूपी म्हणण्यात शूद्रांची नालस्ती झाली असे म्हणता येणार नाही. वस्तुस्थितिनिदर्शक हा दृष्टान्त आहे. दृष्टान्त एकदेशीय असेल तर तो एकदेशीय म्हणूनच स्वीकारला पाहिजे. ज्ञानेश्वरांचे काही काही दृष्टान्त पूर्णपणे एकदेशीय असतात. तत्कालीन ' मराठी वाङ्मयात दृष्टान्ताचे सहा प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकी पहिला प्रकार ' अंशग्राह्य' असा आहे.[1] समाजाने अस्पृश्यता पाळावी किंवा पाळू नये हा विचार दृष्टान्ताचे कक्षेत बसत नाही. सतीचे व विधवेचे दृष्टान्त असेच एकदेशीय आहेत. सतीची चाल चांगली किंवा वाईट, विधवा-विवाह योग्य का अयोग्य या गोष्टी अप्रस्तुत आहेत. दृष्टान्ताचे एकदेशीयत्व नीट समजावून घेतले पाहिजे, हा मुद्दा पुढील विवरणातून आणखी स्पष्ट होणार आहे. ' हे ज्ञाननिधीचे भूवंग ' ३-२३६, ' साध्वी शांति नागवली ' ३-२४६;

---

१. ' दृष्टांतपाठ ' संपादक, शं. गो. तुळपुळे. प्रस्तावना, पृ. ७.



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

' तेयाचें नांव घेणें ' १३·६७२; ' नाना चांडाळ स्त्री मदिरेसी ' १६·१७५; या ओव्यांवर लेखिकेने तोच वरील आक्षेप घेतला आहे. या सर्व ओव्या वस्तुस्थितिनिदर्शनात्मक दृष्टान्तरूप असल्याने त्यांना वरील विवेचन लागू आहे. लेखिकेने उद्‌धृत केलेल्या बाकीच्या ओव्यांचा आता क्रमशः विचार करावयाचा आहे.

१३ व्या अध्यायात ७ व्या श्लोकातील ' शौचम् ' ( शुचित्व ) या पदाचे विवरण करताना ज्ञानेश्वरांनी शुचि पुरुषाच्या वागण्याला खालील दृष्टान्त दिला आहे.

भेटलिया नारी । चोखी अथवा माहारी ।
तेथ नातळती परी । राहाटों जाणें ॥ १३·४७८ ॥

ज्ञानेश्वर शूद्रांची अवहेलना करतात असा पूर्वग्रह करून घेऊन लेखिकेने वरील ओवीचा भलताच अर्थ केला आहे. लेखिकेचा अर्थ व टीका—" पुन्हा या उपमेतून त्यांची अत्यंजांविषयीची तुच्छताबुद्धी प्रगट झाली आहे. सातव्या श्लोकातील शौचम् या शब्दाचे स्पष्टीकरण करताना ते म्हणतात : वाटेमध्ये सुंदर महारीण दृष्टीस पडली तर तिच्याबद्दल जसा कोणी अभिलाष बाळगीत नाही, त्याप्रमाणेच शुचित्व असलेला माणूस निःस्पृह वर्तन ठेवतो. " चोखी अथवा माहारी याचा सुंदर माहारीण असा अर्थ कसा होतो हे अनाकलनीय आहे. या ओवीचा अर्थ करताना दृष्टान्ताचे एकदेशीयत्व व संपूर्ण संदर्भ याकडे लेखिकेने दुर्लक्ष केले आहे, व शिवाय चार प्रमाद केले आहेत. ( १ ) ओवीतील ' अथवा ' शब्द गाळला आहे. ( २ ) चोखी हे माहारीचे विशेषण केले आहे ( ३ ) चोखी[1] शब्दाचा अर्थ सुंदर असा केला आहे. ( ४ ) ओवीमध्ये नसताना ' वाटेमध्ये ' हा शब्द जास्त घातला आहे. ओवीचा अर्थ असा आहे–' चोखी म्हणजे स्वच्छ असो किंवा माहारी म्हणजे मलीन असो त्यांपैकी कोणीही भेटली तरी त्याचे मनात विकल्प न येता त्याचे राहाटणे चालू असते. कसे राहाटावे ते तो जाणत असतो. ' या ठिकाणी महार स्त्रीबद्दल अनुदारपणाचे उद्‌गार नसून कोणत्याही विकल्प उत्पन्न करणाऱ्या विषयाच्या सान्निध्याने शुचि पुरुष विकारवश होत नाही हे ज्ञानेश्वरांना सांगावयाचे आहे. हे दाखवत असताना त्यांनी फक्त माहारी निवडली नाही, तर त्याचे दृष्टीने चोखी अथवा माहारी सारख्याच आहेत.

तेराव्या अध्यायात अकराव्या श्लोकात ' अज्ञान ' शब्द आलेला आहे. त्याचे विवरण करताना ज्ञानेश्वर अज्ञानी माणूस गर्वाने कसा फुगतो यावर दृष्टान्त देतात.

' अंत्यु राणिवे बैसला । कां आरे धारणु गीळिला ।
तैसा गर्वे फूगला । देखसी जो ॥ १३–७२३ ॥

लेखिकेची टीका– " (१) यावरून जणू काही इतर वर्ण सत्तेने गर्विष्ठ होतच नाहीत

हें चोख हें मैळ । एसे नेणौनि बाळ । देखिलें तें केवळ । मुखीच घाली ॥ १६–२४८

१. चोखी या शब्दाचा अर्थ खालील ओवीने लक्षात येईल–

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असे सुचवले आहे. वास्तविक सत्ता आली की मदांधता येतेच. पण ज्ञानेश्वर फक्त शूद्रांचे माथीच हा दोष मारतात. शिवाय अंत्यजांना कोणी कधी राज्यावर बसू दिले होते हाही प्रश्नच आहे. (२) पण दोष म्हटला की तेथे शूद्र उपमानरूपाने आढळावयाचाच."

वरील दोन्ही विधाने ज्ञानेश्वरांवर अन्याय करणारी आहेत. पहिल्या आक्षेपाचे निरसन करणारी ज्ञानेश्वरांची ही ओवी पाहा.

आत्मसंयमन नसलेल्या पुरुषाचे वर्णन–

> जैसें सत्रीं अन्न जालें। कां सामान्या भीक आलें।
> वाणसिये उभलें। कोण न रिगे ॥ १३–६९९ ॥

अर्थ– ज्याप्रमाणे अन्नसत्रात वाटेल त्याने जावे, सामान्य माणसाच्या हातात सत्ता आली की, तो वाटेल तसा वागतो, वेश्येचे घरात वाटेल तो प्रवेश करतो.

या ओवीत सामान्य माणसाचे हातात सत्ता आली की तो गर्वाने फुगून जातो हे सांगितले आहे. यावरून लेखिकेचे म्हणणे 'पण ज्ञानदेव फक्त शूद्रांचे माथीच हा दोष मारतात.' हे विधान लटके पडते. आता दुसरे विधान 'पण दोष म्हटला की शूद्र उपमानरूपाने आढळावयाचाच.' याचा विचार करू.

ज्ञानेश्वरांच्या दृष्टान्त देण्याच्या पद्धतीचा काळजीपूर्वक विचार करून मग इतर अनुमाने काढावी लागतील. ज्ञान, सौंदर्य, गुरुभक्ती सांगताना उपमाने तशीच चांगली असावयास पाहिजेत. परंतु ज्ञानेश्वरांचे लेखी तसे असतेच असे नाही. गुरु-बद्दल अत्यंत आदर असलेल्या व्यक्तीला गुरुकुळाचे नाव ऐकताच महासुख थोरावते हे विशद करताना ते सांगतात–

> ना तरि रंके निधान देखिले। आंधळेया डोळे उघडले।
> भणंगाचेया आंगा आलें। इंद्रपद ॥ १३–३८१ ॥

या ठिकाणी अगदी उलट म्हणजे आंधळा, रंक व भणंग अशी उपमाने घेतली आहेत. चौदाव्या अध्यायात गुणातीत पुरुषाला पाषाणाची उपमा दिली आहे (१४·३६५) या उदाहरणांवरून ज्ञानेश्वरांचे दृष्टान्त कसे एकदेशीय असतात हे लक्षात यावे.

आता अज्ञान्याची लक्षणे सांगताना कोणती उपमाने निवडली आहेत? भाता १३·६६३; लाठी–१३·७२४ या उपयुक्त वस्तू. अज्ञानी 'सुविद्यु' याला तर दीपाचा दृष्टान्त दिला आहे. १३·७१८ ते १३·७२० जाणत्यांनी हा दृष्टान्त अभ्यास करण्यासारखा आहे. दीपाची अवहेलना करण्याचे हेतूने हा दृष्टान्त दिला आहे असे म्हणता येईल काय? अज्ञान्याची पुढील लक्षणे ज्ञानेश्वर सांगतात—



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महापुरुषाचें चित्त । जालेयां वस्तुगत ।
ठाके व्यवहारजात । जेयापरीं ॥ १३–७८८ ॥
तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडौनियां सर्वभावें ।
कोणु मी काय करावें । हें काहिं नेणे ॥ १३–७८९ ॥

स्त्रीच सर्वस्व मानणारा अशा अज्ञानी पुरुषाचे लक्षण सांगताना ज्ञानेश्वर उपमान म्हणून योजतात. कोणते ? शूद्राचे ? नाही. तर ज्या दिव्य पुरुषाला ब्रह्मवस्तू हस्तगत झाली अशा महापुरुषाचे. कोठे स्त्रीलंपट पुरुष व कोठे ब्रह्मस्वरूप ज्ञानी ! केवढा प्रचंड विरोध ! अज्ञान व दोष यांचे लक्षण सांगताना तेथे शूद्र उपमानरूपाने आढळावयाचाच हे म्हणणे कसे विपर्यस्त आहे हे वरील दोन ओव्यांवरून स्पष्ट दिसून येते. ज्ञानेश्वरांचे लेखी दृष्टान्त म्हणून ब्रह्मज्ञानी पुरुष व शूद्र सारखेच आहेत.

नाना बुडतेयातें सकरुणु । न पुसे उत्तम हीनु ।
काढी राखे प्राणु । हें चि जाणे ॥ १६–१४२ ॥

लेखिकेचा अर्थ “( १६ व्या अध्यायातील ) दुसऱ्या श्लोकातील ‘ अपैशुन ’ शब्दाचा अर्थ सांगताना ते म्हणतात, एखादा बुडणारा माणूस उत्तम आहे का हीन आहे हे विचारीत न बसता सुज्ञ माणूस त्या बुडत्याचे प्राण वाचवणे हेच आपले कर्तव्य समजतो, त्याप्रमाणे इतरांचे दोष न पाहणाऱ्या व्यक्तीला अपिशुन म्हणतात.” लेखिकेने केलेला हा अर्थ योग्य व सुस्पष्ट आहे. याचे आणखी स्पष्टीकरण करण्याची गरज नाही इतका तो अर्थ स्पष्ट आहे. परंतु पुढे लेखिकेची मल्लीनाथी पाहा : “ प्राणास मुकत असलेल्या अत्यंजाची जात न पाहणारा हाही मोठा ‘ सकरुणु ’ मानला जावा एवढी ही जात निकृष्ट दर्जाची आहे म्हणावयाची ? ” या ठिकाणी लेखिका अशा रीतीने विवेचनाच्या वाकड्यात का शिरली हे समजत नाही. याच टिकाणी नव्हे तर दृष्टान्ताच्या बहुतेक ओव्यांचे स्पष्टीकरणात लेखिकेने आपल्या वक्रतेचे प्रदर्शन केले आहे. याच ‘ अपैशुनम् ’ या पदाचे विवरण ज्ञानेश्वरांनी मागील ओवीत ( १६–१४१ ) केले आहे. त्या ओवीचा अर्थ “ अथवा गाळात फसलेली गाय दृष्टीस पडल्यावर, ती दूध देणारी आहे का भाकड आहे हे न पाहता, तिची दीनवाणी स्थिती पाहून त्या योगाने कासावीस होतो”. आता लेखिकेच्या पद्धतीने स्पष्टीकरण करू. म्हणजे लेखिकेच्या विवेचनाची वक्रता लक्षात येईल. चिखलात फसलेल्या गाईची भाकड जात न पाहणारा हाही मोठा कासावीस ( कालाभुला ) मानला जावा एवढी भाकड गाईची जात निकृष्ट दर्जाची आहे म्हणावयाची. काय सुरेख स्पष्टीकरण !

दुसरा मुद्दा असा की, ‘ नाना बुडतेयातें सकरुणु । न पुसे उत्तम हीनु । काढी राखे प्राणु । हेंचि जाणे ॥ १६.१४२ ॥ या ओवीत ‘ न पुसे उत्तम हीनु ’ असे शब्द आहेत. अर्थ देण्यात लेखिकेने हे शब्द वापरले आहेत पण मल्लीनाथीत मात्र त्या ऐवजी ‘ अंत्यज ’ हा शब्द वापरला आहे व ‘ अत्यंजु की ब्राह्मणु ’ असा पाठभेद

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्वीकारून ज्ञानेश्वरांवर तोंडसुख घेतले आहे. उत्तम किंवा हीन चारी वर्णात असू शकतात. लेखिकेची मखलाशी पाहा—विवेचनार्थ घेतलेल्या प्रतींतील योग्य शब्द गाळावयाचे व त्याऐवजी अनेक प्रतींपैकी एका प्रतीतील पाठभेद स्वीकारावयाचा. ही अर्थ करण्याची कोठली पद्धत ? जेथे अंत्यज शब्दच नाही तेथे तो ज्ञानेश्वरांचे माथी मारावयाचा व लेखणी सैल सोडावयाची !

सतराव्या अध्यायात सहाव्या श्लोकात आसुरी बुद्धीच्या लोकांचे वर्णन आहे. ज्ञानेश्वर त्यांच्याबद्दल म्हणतात की वाचेच्या पदरानेही त्या पाप्यांना स्पर्श करू नये; परंतु त्यांचा त्याग करण्याकरता आम्हाला त्यांचेविषयी बोलावे लागते. यावर ज्ञानेशांचा दृष्टान्त—

प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्यु जैसा भखळिजे ।
हें असो हातें क्षाळिजे । कश्मळातें ॥ १७–१०६॥

लेखिकेचा अर्थ व टीका—"ज्याप्रमाणे प्रेत हाताने घराबाहेर काढावे लागते, अंत्यजाला वाटेस लावण्यासाठी त्याची अवहेलना करून घालून द्यावे लागते, मळ हाताने धुवावा लागतो त्याप्रमाणे ही आसुरी वृत्ती टाकून द्यावी म्हणून तिचे वर्णन केले आहे. यावरून अंत्यज एवढा अमंगळ आहे की, त्याच्याशी संभाषण करण्याच्या लायकीचाही तो नाही. त्याचा अवमान करून त्याला हाकलून दिला पाहिजे असे त्यांचे स्पष्ट मत असल्याचे दिसते." ओवीतील 'भखळिजे' या शब्दाचा अर्थ भाषा करणे, बोलून दाखवणे एवढाच आहे. भाख-कीजे, भाखळीजे, भखकिजे असा शब्द तयार झाला आहे. येथे शूद्राचा उपहास करणारा असा त्या शब्दाचा अर्थ गृहीत धरून ज्ञानेश्वरांविषयी अवास्तव व अनिर्बंध मत प्रदर्शित केले आहे. या ओवीचा अर्थ असा आहे—कोणालाही बाहेर घालवणे योग्य नाही, परंतु प्रेताला बाहेर काढावे लागते, किंवा कोणास दूर हो म्हणू नये परंतु अंत्यज शिवण्याच्या बेतात आला तर त्याला तोंडाने बाजूस हो असे सांगावे लागते; हे असो. भांडी स्वच्छ करण्याकरता चिखलाचा लेप द्यावा लागतो. ओवीला जोडून पुढच्या ओवीत 'तेथ शुद्धिचेया आशा । तो लेपु[1] न मनावा जैसा । असे म्हटले आहे. आता "अंत्यजाच्या जोडीला ते प्रेत व मळ या गोष्टी घेतात यावरून अंत्यजांना ते किती घृणास्पद व टाकाऊ मानीत होते हेही स्पष्ट होते." या आक्षेपाचा विचार करू. ज्ञानेश्वरांनी या ओवीची रचना अशी केली आहे की, त्यायोगे तीन दृष्टान्तांचे तीन प्रकार (category) पृथक आहेत हे जाणवते. दुसऱ्या पादात 'किंवा' या शब्दाने व तिसऱ्या पादात "हे असो' या शब्दांनी पृथकत्व दर्शविले आहे. एका गोष्टीच्या समर्थनार्थ तीन

---

१ लेप शब्दाचा अर्थ—'जैसा क्षाळुनियां लेपु एकु । सवें चि लाविजे आणिकु । ६६—४९.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दृष्टान्तांत तीन उपमाने आली तर ती तीन उपमाने सारख्याच योग्यतेची आहेत असे म्हणता येत नाही, पण साहचर्याने दिशाभूल होते. साहचर्यावरून घडून येणारा हेत्वाभास लेखिकेने निर्माण केला आहे. अध्याय १३ ओव्या २०४, २०५ व २०६ यांमध्ये 'अदंभित्व' या पदाचे विवरण आहे. या ओव्यांचा अर्थ—"अर्जुना, खस्याळ गाय पान्हा चोरते, वेश्या मोठे वय लपवते, श्रीमंत रानांत सापडला असता आढ्यता लपवून असतो, नाहीतरी कुळवधू अवयवांना झाकून टेवते, शेतकरी पेरलेले बी झाकतो त्याप्रमाणे तो केलेले दानपुण्य झाकून ठेवतो." या ठिकाणी पाच दृष्टान्त एकत्र आलेले आहेत. गाय खस्याळ म्हणून शेतकरी खस्याळ होत नाही, कुलवधू पण्यांगनेच्या हीनत्वाप्रत येत नाही, घृणास्पद होत नाही. दृष्टान्तात उपमेय व उपमान यांमधील कृती, उक्ती, मनोधर्म वा विचार यांपैकी जे असेल त्याचा साधर्म्य-निदर्शक सारखवटपणा फक्त नीट टिपावयाचा असतो. फक्त सारखेपणा हस्तगत करणे म्हणजे दृष्टान्त एकदेशीयत्वाने स्वीकारणे होय. अदंभित्व हे ज्ञानी पुरुषाचे लक्षण आहे. दृष्टान्त असा एकदेशीपणे न स्वीकारला तर ज्ञानी पुरुषाला पण्यांगनेच्या योग्यतेला बसवल्यासारखे होईल. तसेच

तरि मांसालागि भूलला । ब्राह्मणु पाणवाडां रिगाला ।
किं तेव्हां चि तेथ लागला । आगि जैसा ।। १६–४४८ ।।

या ओवीवरून ज्ञानेश्वर ब्राह्मणांना निंदास्पद मानतात असे मानता येईल काय?

१७ व्या अध्यायात २२ व्या श्लोकात तामस दानाचा विषय चालला असताना लेखिकेने ज्ञानेश्वरांच्या तोंडी पुढील ओवी घातली आहे. तेथ विभांडुनिया जग। आणिले पदार्थ अनेग । ते घालुं लागे मात्तांग । गंवादिसी ।। लेखिकेचा अर्थ– "ते म्हणतात, सर्व जगाला नागवून आणलेल्या संपत्तीचे मांगाने घातलेल्या अन्नसत्राप्रमाणे दान देणे हे तामस दान होय." येथे एक नवल वर्तले आहे. वांझेच्या मुलाचे गोडवे गाण्याचा प्रकार आहे. लेखिका तळटीप ५ मध्ये लिहिते, "ही ओवी सरकारी प्रतीत नाही" जी ओवी नाहीच त्याबद्दल उसन्या ओवीचा विचार का करावा? बरे, उसन्या ओवीचा अर्थसुद्धा बरोबर केला नाही. ज्ञानेश्वर 'मातंग' या शब्दाबद्दल 'मात्तांग' हा शब्द योजणार नाहीत. थोडा वेळ आपण वरील ओवी गृहीत धरू. मग या ओवीचा अर्थ असा होतो, "जगाशी भांडण करून अनेक पदार्थ मिळविलेल्या मत्त माणसाने अन्नछत्र घातले तर ते तामस दान होय." नसलेली ओवी लिहिणे हाच मुळी वदतो व्याघात आहे, व त्या उसन्या ओवीचा अर्थसुद्धा सर्वस्वी अनुपपन्न व विपरीत केला आहे. विपर्यासाचे हे आदर्श उदाहरण ठरावे!

१८ व्या अध्यायातील ४१ साव्या श्लोकात चार वर्णांची कर्मे स्वभावसिद्ध गुणांच्या योगाने विभागलेली आहेत हे सांगताना ज्ञानेश्वरांनी पुढील ओवी सांगितली आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणि रज परि सात्त्विक। तेया ठेविले वैश्य लोक।
रज चि तमें भेसक। तेथ शूद्र जाला ॥ १८.८२६ ॥

येथेही लेखिकेने ओवीच्या अर्थाचा विपर्यास केला आहे. लेखिकेचा अर्थ-- "सत्त्वमिश्र रजाने वैश्यांना आणि शूद्रांच्या भागात तमात भेसळलेले रज आलेले आहे."

तीन गुणांची वाटणी चार वर्णांत केली जाते ती अशी [१]--सात्त्विक ब्राह्मण, रजोगुणी पण काही प्रमाणात सात्त्विक क्षत्रिय, रजोगुणी वैश्य व तमोगुणी शूद्र. परंतु ज्ञानेश्वरीत ज्ञानेश्वरांनी ही वाटणी कशी केली आहे हे पाहा. वरील ओवीचा अर्थ-- "या ठिकाणी सत्त्वगुणांनी आपल्या कमीजास्त भागाने ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण उत्पन्न केले आणि रजोगुण व सात्त्विक तेथे वैश्य वर्ण उत्पन्न झाला; रजच पण तमाने थोडासा भेसळ असणारा तेथे शूद्र वर्ण उत्पन्न झाला." या ठिकाणी ज्ञानेश्वरांनी शूद्रांना तमातून काढून रजात घातले आहे. लेखिकेने मात्र त्यांना ज्ञानेश्वरांचे नावावर तमात ढकलले आहे. अशा रीतीने ज्ञानेश्वरांबद्दल अनादर निर्माण होईल असा प्रयत्न झाला आहे.

लेखिकेच्या अर्थाप्रमाणे शूद्र तमोगुणी (किंचित् रजभेसक). तर मग ज्ञानेश्वरांना शूद्राची अवहेलनाच करावयाची असती तर तमोगुण लक्षणे सांगताना त्यांना अपूर्व संधी चालून आली होती. परंतु तमोगुण लक्षणे १४-२४१ ते २५७; तामसकर्ता १८-६५९ ते ६८६; तामसबुद्धि १८-७२१ ते ७२७ व तामसधृति १८-७४६ ते ७६३ इतक्या सगळ्या ओव्यांतून शूद्रांचा नामनिर्देशही ज्ञानेश्वर करीत नाहीत.

भगवद्गीता १८-४१ या श्लोकाचा भावार्थ सांगताना शूद्रांना ब्राह्मणांबरोबर श्रुतीने समाविष्ट करून घेतले हे पटवण्याकरता ज्ञानेश्वरांनी दृष्टान्त दिला आहे तो असा--

जैसा फुलाचेनि सांघातें। तांथू तुरंबिजे श्रीमंतें।
तैसें द्विजसंगें शूद्रातें। स्वीकारीति श्रुती ॥ १८-८१९ ॥

या ओवीचासुद्धा लेखिकेने कमालीचा विपर्यास केलेला दिसून येतो. लेखिकेचा अर्थ व टीका--"त्यांनी दिलेली उपमा शूद्रांचा उपमर्द करणारी आहे. ते म्हणतात, फुलांबरोबर दोऱ्यालाही श्रीमंत लोक आपल्या शरीरावर धारण करतात, त्याप्रमाणे शूद्रांचा त्रैवर्णिक द्विजांबरोबर नेहमी व्यवहार संबंध घडत असल्याने श्रुतींना वार्णव्यवस्थेत शूद्रांचाही समावेश करणे भाग झाले." या वर्णनावरून अत्यंत हलके

१. 'पुरुषार्थबोधिनी' ले. पं. सातवळेकर पृ. ९१५.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असूनही शूद्रांना वेदांनी वर्णव्यवस्थेत सामील केले हे त्यांच्यावर मोठे उपकार झाले असे ज्ञानेश्वरांना वाटते असे दिसते.

ज्ञानेश्वरांच्या काळात चौथा वर्ण जो शूद्र तो अस्पृश्य मानला जात असे. वरील ओवीचा सूर अस्पृश्यता गडद करण्याकडे आहे का शूद्रांची अस्पृश्यता निवारण करण्याकडे आहे, हे पाहणे आपले कर्तव्य आहे. या ओवीचा ध्वन्यर्थ असा आहे की, फुलांबरोबर दोरा आलाच. फुले धारण केली की दोराही आपोआपच धारण केला जातो. तद्वतच शूद्रांचा स्वीकार करावा. वरील ओवीत ज्ञानेश्वर फुलाचेनि 'सांघाते' म्हणतात. एकत्रीकरणाचे तत्त्व असलेल्या मेळाव्यास सांघात असे म्हणतात. ज्ञानेश्वर 'द्विजसंगे' असा शब्दप्रयोग करतात. जोडणी करण्याला संग ही संज्ञा आहे. 'श्रीमंत' हा परमेश्वरवाचक शब्द आहे. ज्ञानेश्वरीत श्रीमंत हा शब्द पैसेवाला या अर्थाने आलेला नाही. कुबेराला ज्ञानेश्वर 'धनवंतु' म्हणतात. श्रीनिवृत्तिनाथांना ते 'अंबे श्रीमंते' १२-१० असे संबोधतात. सांघात, संग, श्रीमंत या शब्दांचे हे अर्थ लक्षात घेतल्यास ज्ञानेश्वरांचा शूद्रांबद्दल किती उदार दृष्टिकोण होता हे समजून येईल. भावी पिढ्यांकरता ज्ञानेश्वरांनी या ओवीने अस्पृश्यता नष्ट करण्याचे द्वारच खुले करून दिले आहे. अस्पृश्यता भावी काळात नष्ट व्हावी अशी सूचना ज्ञानेश्वर मोठ्या खुबीदार रीतीने या ओवीत देत आहेत.

लेखिकेने आर्यधर्म व भवद्गीता यांचेवर ठपका ठेवून बाकीची सर्व अनुमाने दृष्टान्तावरून काढली आहेत. दृष्टान्तात साधर्म्याखेरीज इतर बाबतींत दृष्टान्त हा सिद्धान्त किंवा मत नसते हा साधा विचारच लेखिकेने केलेला आढळत नाही. दृष्टान्ताचे बाबतीत लेखिकेने गैरसमजूत करून घेतल्याने ज्ञानेश्वर शूद्रांबद्दल तुच्छता, उपहास व अवहेलना दाखवतात असा बिनबुडाचा, निराधार व विचाराअंती न टिकविणारा आरोप लेखिकेने ज्ञानेश्वरांवर केला आहे.

ज्ञानेश्वर हे खऱ्या अर्थाने द्रष्टे होते पण झटपट क्रांतीचे प्रवक्ते नव्हते. ते स्वयंप्रज्ञ असले तरी क्रांतदर्शी होते. अप्रांतमती असले तरी उत्क्रांतमती होते, आणि एवढेतरी श्रेय आपण ज्ञानेश्वरांना दिलेच पाहिजे.

शेवटी ज्ञानेश्वरांनी आपल्या सद्गुरुजवळ जे पसाय मागितले ते आपण ज्ञानेश्वरांजवळ मागू या.

पाखांडाचे दरकुटे। मोडीं वाग्वाद अव्हांटे।
कुतर्कांचि दुष्टें। सावजे दवडीं॥ १२-१४॥



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# पत्रातून दिसणारे पोतदार

[ मराठीतील प्रसिद्ध समीक्षक प्रा. वा. ल. कुळकर्णी यांना आलेले कै. दत्तो वामन पोतदार यांचे एक पत्र सोबत प्रसिद्ध करीत आहोत. हे पत्र म्हणजे श्री. वा. ल. कुळकर्णी यांच्या 'मराठी ज्ञान प्रसारक : इतिहास व वाङ्मयविचार' या ग्रंथावरील खाजगीत पाठविलेला अभिप्राय आहे.

अभिप्रायात त्यांनी कितीतरी बारकावे, ऐतिहासिक घटना, व्यक्ती यांचे संदर्भ, सालानिशीवार दिलेली माहिती किती सहज जाता जाता दिलेली आहे याची कल्पना आपणांस येईल. आपल्या अभ्यासविषयावरी त्यांची पकड किती पक्की होती याचा अनुभव हे पत्र वाचताना येतो. दत्तो वामन पोतदारांनी दिलेला हा अभिप्राय म्हणजे 'मराठी ज्ञान प्रसारक : इतिहास व वाङ्मय विचार' या ग्रंथावरील सहज पण कसून लिहिलेले जणू एक परीक्षणच आहे असे आपणांस वाटल्याशिवाय राहणार नाही. म्हणून औचित्य साधून पत्रिकेच्या या अंकासाठी ते मुद्दाम मागवून घेऊन प्रसिद्ध करीत आहोत.—संपादक ]

स. न. वि. वि.

आपण प्रसिद्ध केलेले 'मराठी ज्ञानप्रसारक : इतिहास व वाङ्मयविचार' हे पुस्तक आपण मला भेट पाठवले त्याबद्दल फार आभारी आहे. सुमारे ६० वर्षांपूर्वी मी मुंबईस त्या वेळच्या विद्यापीटाच्या प्रीव्हियस किंवा इंटरच्या परीक्षेस गेलो असताना मुंबई विद्यापीठाचे असिस्टंट रजिस्ट्रार व आमचे नातेवाईक कै. श्री. भास्कर महादेव पंडित ह्यांच्याकडे राहिलो होतो. माझी मराठी विषयाची आवड पाहून मराठी ज्ञानप्रसारकाचे १००/५० अंक मला दिले. पुढे आम्ही मी व आमचे मित्र कै. पंत पराडकर व पांडोबा पटवर्धन यांनी १९१० साली पुण्यात मराठी ग्रंथसंग्रहालय स्थापन करण्याचा नारळ फोडला. तेव्हा मी ते ज्ञानप्रसारकाचे अंक त्या संग्रहालयास दिले. सदर अंक बांधून नीट जपून संग्रहालय शाखेत टेवावे म्हणून मी वारंवार सूचना दिल्या. सांप्रत मी त्या संग्रहालयाचा अध्यक्ष आहे. संग्रहालयाची परिस्थिती सुधारलेली आहे. तेव्हा पुनः आता 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या मी दिलेल्या टेव्याची अधिक चौकशी करीन. 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' मी लिहून प्रसिद्ध केला, त्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सुमाराला म्हणजे १९२२ च्या सुमाराला ह्या ठेव्याचा मला काही अधिक उपयोग करता आला नाही. नुकताच साहित्य परिषदेने वाङ्मय इतिहासाचा जो नवा खंड प्रसिद्ध केला आहे, त्यातील कित्येक लेखकांनी मराठी ज्ञानप्रसारकातील दुर्मिळ लेखातील महत्त्वाचे उतारे दिलेले पाहिले व वाचले. तेव्हा आपण तिकडे ज्ञान-प्रसारकाचे दुष्प्राप्य अंक मिळवून ठेवल्याची कल्पना आली आणि आता आपण वरील ग्रंथ प्रसिद्ध करून मोठी मोलाची कामगिरी बजावली आहे. याबद्दल मराठी वाङ्मयाचे उपासक आपले ऋणी राहतील. आपल्या सदर पुस्तकाची प्रत आपण मला भेट पाठवली त्यापूर्वी मी ती प्रत मजसाठी आणवण्याबद्दल सूचना दिली होती, परंतु आजवर मला तिजकडे अधिक लक्ष देता आले नाही. आपले पुस्तक हाती येताच मी नेटाने बसून त्याचे समग्र वाचन केले. त्यावरून आपणाला पुढील मजकूर लिहून पाठवीत आहे.

आपण बंगालकडील काही माहिती जोडली आहे. ती वाचताना लो. टिळकांनी बंगाल्यातील चळवळीचे सूत्र हाती घेऊन बंगाल फाळणीच्या निमित्ताने १९०४ ते १९०८ या कालात हिंदुस्थानात जे प्रचंड आंदोलन उभे केले आणि जे विद्यार्थिदशेत आम्हाला स्फूर्तिदायक झाले त्याची मला आठवण झाली. मी मुंबई विद्यापीठात १९२२ ते १९२७ तेथील मराठी अभ्यास मंडळाचा सभासद होतो. त्या वेळी देशी भाषांचा पुरस्कार करून तेथे काही यश मी मिळविले. त्या वादविवादात मुंबईचे प्रसिद्ध पारशी विद्वान परलोकवासी शमसुल उल्मा जीवनजी मोदी हे पारशी गुजरातीचा पुरस्कार करीत, त्याची मला पुस्तकातील पृ. ८, ९ वरील मजकूर वाचताना आठवण झाली. स्टुडंटस लि. सभेची जुनी माहिती देणारे एक मोठे पुस्तक माझ्या संग्रही आहे. आणखीही काही सामग्री आहे, त्याचेही स्मरण झाले. ती सर्व सामग्री सांप्रत अस्ताव्यस्त पडलेली आहे. पृ. १५ वर बहारकोटे शब्द आला आहे. अर्थातच याचा अर्थ कोटाबाहेरील असा आहे हे स्पष्ट आहे. मी पानांच्या क्रमानेच नोंद करीत आहे. विज्ञानाच्या दृष्टीने पृ. १९ वर आपण ज्ञानप्रसारक पत्रिकेचा यथार्थ गौरव केला आहे आणि विज्ञानावरील लेख लिहिताना लेखकाने आपली परिभाषा कशी निर्माण केली याबद्दल आपण मार्मिक व सूचक दिग्दर्शन केले आहे, ते मला फार प्रिय वाटले. पृ. २१ वर ज्याला कॉरस्पॉंडिंग मेम्बर म्हणतात त्यांचा उल्लेख आला आहे. रावसाहेब मंडलिक हे सर्व पत्रव्यवहाराची आवक जावक टेवीत व रोज-निशीही लिहीत. हवालदार यांनी या सामग्रीचे आधारे मंडलिकांचे चरित्र दोन खंडांत प्रकाशित केले आहे. बिनचुकपणाविषयी मंडलिकांची फार मोठी ख्याती होती. त्यामुळे आपल्या पृ. २० व ३२ वरील तळटीपांचा थोडा फेरविचार करावा असे मला वाटते. १८५० जानेवारी ठरली असावी पण छापण्यास उशीर झाला म्हणून एप्रिल झाला असा विचार करून मंडलिकांच्या वरील स्मरणाचा दोष नवीन

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संदर्भात मांडावा असे वाटते.

ज्ञानप्रसारकातील लेखांचे विषयवार वर्गीकरण करून आपण टिपणे जोडली आहेत. पृ. ३५ ते ७२ त्यात ७२ व्या पानावर १३४ क्रमांकाचा लेख आणि पृ. ४९ वर क्र. ३४ चा लेख हे दोन्ही एकच आहेत, हे आपल्या लक्षात येईल. दुबार नोंद झाली इतकेच नाही तर पृ. ४९ वर १० ऑक्टोबर १८६६ व पृ. ७२ वरील लेखांची तारीख ११ नोव्हेंबर १८६६ असा घोटाळा झालेला दिसतो. पृ. ६८ वर तत्त्वबोधिनी सभा आली आहे. देवेन्द्रनाथ ठाकूर यांनी ही सभा बंगालमध्ये काढली होती, तेव्हा यावर थोडीशी माहितीची टीप देणे आवश्यक होते. याच पृ. ६८ वर क्र. ५९ पुढे वर्तमानप्रमोदय म्हणून कंसात लिहिले आहे. याची अधिक माहिती शोधावयास हवी. पृ. ६८ वरचा क्र. ६१ आणि पृ. ७० वरचा क्र. ९१ हे एक की दोन? पण बहुधा दोनच असावेत. पृ. ७१ वर क्र. १२५ प्रसिद्ध परीक्षा म्हणजे पब्लिक एक्झामिनेशन पृ. ७७ वर बाळशास्त्री जांभेकर यांच्या संदर्भात कविचरित्र परीक्षकाचा जो शेरा आढळतो तो गणपतराव जांभेकर यांच्या नजरेस घालावा असे फार मनात आले. पृ. ७८ जॉब जोसेफ हा घोटाळा मलाही लक्षात घ्यावा लागेल. रत्नप्रभा कादंबरीची नवी आवृत्ती छापीत आहेत, त्यात माझ्या प्रस्तावनेत आपल्या पुस्तकातील पृ. ८० ते ८७ वरील मजकुराचा सारांश मी देत आहे आणि ते श्रेय आपल्या ग्रंथामुळे लाभत आहे याचा मला आनंद वाटतो. पृ. ९६ वर मानभावासंबंधीची माहिती गॅझेटियरमधून घेतलेली नाही असे आपण लिहिता. मला वाटते उल्लिखित गॅझेटियर १८८५ चे सुमारचे असावे. तेव्हा १८६६ सालापूर्वी प्रसिद्ध झालेली कोणती गॅझेटियर्स आपणाला अपेक्षित आहेत ते कळवावे. नपेक्षा विधान दुरुस्त करावे लागेल. पृ. ९९ वर ज. स. गाडगीळ यांच्या बद्दल दाते सूचीच्या आधारे टीप दिली आहे. मला आठवते की, गाडगिळांचा उल्लेख तरतरीत म्हणून राजवाड्यांनी केलेला आहे आणि असेही आठवते की, आता माझा संभार सर्व अस्ताव्यस्त पडला आहे म्हणून आठवणीवरच लिहितो की, गाडगिळांचा संबंध शंकर पांडुरंग पंडित यांनी छापलेल्या इंदुप्रकाश तुकाराम– गाथा या ग्रंथाशी निकटचा होता. दाते यांच्या नोंदीत ही भर हवी. पृ. १३३ वर एका जुन्या सनदेचा उल्लेख आहे. आपण स्वतः नाशिकचे. तेव्हा या प्रकरणी अधिक शोध करून मला कळवावे. आपणाला ठाऊक असेल की, सिन्नरचे चिपळूणकर यांनी नाशिकच्या सरकारी दप्तरात आढळलेला नाशिक शहराचा चार-पाच फुटी हाताने काढलेला फार मोठा नकाशा सांप्रत पुण्याच्या सरकारी दप्तर-खान्यात ठेवलेला आहे. त्यात इंग्रजी अंमलाच्या आरंभीचे नाशिक संपूर्ण प्रतिबिंबित झाले आहे याचा उल्लेख आणि उपयोग आपण आपल्या पृ. १३६ वरील विधानाला टीप जोडून करावा. पृ. १४४ वर जो उतारा दिला आहे. त्यात अमुक सा यातले सा म्हणजे काय ते मला कळले नाही, अखेर पाचव्या परिशिष्टात अनेक नावे आली



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहेत. पृ. १४५ वर विनायक हरिचंद, उगीच शंका – हरिश्चंद्र तर नव्हे ? माथुर-दास–मला वाटते इंग्रजी वरून देशी करताना चूक तर झाली नाही ? आम्ही मथुरादास म्हणतो. आम्ही एदलजी म्हणतो. आपण सर्वत्र एदुलजी केले आहे. पृ. १४६ व अन्यत्र रुस्तोमजी – इंग्रजीत ओ असते. आम्ही रुस्तमजी म्हणतो. पृ १४७ खुर्सेटजी – आमचे तोंडी पाठात खर्सेटजी असे आहे. चिचगार की चिचगर मंचाराम की मंच्छराम ? वाचा – वाच्छा, हगलिंग्स ह्यूलिग्ज. पृ. १५१ एदालजी एदलजी. कलम २८ - इफक्टसमधील सा गाळला आहे. कैखास्त्र – कखुश्रु – बाळ का बाल ? पृ. १५४ रायाझेगमध्ये इ. अधिक पडला आहे. संस्कृत-एस-मोठा पाहिजे पृ. १५५ ह्यूमन शब्द दुरुस्त करावा. पृ. १५६ रावजी वासुदेव टिल्लू हेच जगन्नाथ रावजींचे वडील. पृ. १५८ डब्ल्यू. जी. भांडारकर म्हणजे वासुदेव गोपाळ असावे. पुढे १६० पानावर आहेच. पृ. १६० वर मूस-मूस म्हणावे. पृ. १६४ विदाऊट— टी पाहिजे. पृ. १६५ बाळ मंगेश वागळे हे अधिक बरोबर असावे. अन्यत्र बाळा मंगेश असे लिहिले आहे त्यापेक्षा पृ. १६६ माधव मोरेश्वर की महादेव मोरेश्वर ? पृ. १६७ ८४ – अँड पाहिजे. पृ. १६९ – भावनगरी असे पाहिजे. इंग्रजीतील भानुगरी यावरून घोटाळा झाला. पृ. १७१ नरनदास न पुनः तेच, नारायणदास पाहिजे. पृ. १७२ क्र. २७ – पृ. १७५ क्र. ७८ दोन्ही एकच आहेत. मात्र परभूराम नवलराम आणि दलपतराम दयाभाई ( की डाह्याभाई ? ) तपास करावा. पृ. १७३–३५ मध्ये एन नको. पृ. १७६-८३ 'सीन' पाहिजे. ८५ – ए टीप 'टू' नासिक आणि शिरगावकर यांचे नाशिक पर्यटन तुलना करावी. पृ. ६१ वर भास्कर लक्ष्मण पाळंदे आहे. ते दामोदर तर नसेल ? आणि पृ. ५९ वर अथेल्लो, वेनिस वगैरे नाटके आली आहेत. ती पृ. ४१ वरील नाटकांत का नाही नोंदली ? पृ. ५९ नवल शब्द नॉव्हेलवरूनच सुचला. का. बा. मराठ्यांनी नावेल केले. तुम्हाला काय वाटतं ?

आणखी काही लहानसहान गोष्टी सोडून देतो. आपण भेटू तेव्हा बोलू. मी सविस्तर वाचले. सविस्तर लिहिले. असेच कार्य पुढे चालवावे. मराठी साहित्य संघात बापूराव नाईक सर्व जुने ग्रंथ जमविण्याच्या ईर्ष्येला लागले आहेत. तुम्ही नेणार होता म्हणून आमचे मित्र पारखी यांनी तुमच्या नावे ठेवलेली, परंतु न नेलेली मासिके आता तुम्हाला संघात बघावयास मिळतील. आणखी संग्रह पारखी यांचे मदतीने मिळवीत आहे. तरी तुम्ही आणि ढवळे प्रभृतींनी बापूराव बरोबरच जोर करून हे संग्रहाचे काम सिद्धीला न्यावे.

कळावे लो. अ. हे. वि.

आपला,

**दत्तो वामन पोतदार**

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# पुण्यपुरुष पोतदार

**म. श्री. दीक्षित**

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या निधनामुळे महाराष्ट्राचा एक चालता-बोलता सर्वांगीण इतिहासाध्याय उलटला गेला. ५ ऑगस्ट १८९० रोजी महाडा-नजीक जन्मलेले दत्तोपंत ६ ऑक्टोबर १९७९ रोजी, पुणे येथे नव्वदाव्या वर्षी निधन पावले. जगण्याची, जग पाहण्याची, जनात नि जगात रमण्याची त्यांना शेवट पर्यंत उदंड हौस होती. शरीर थकून काम देईनासे झाले तरी निराशा, उदासीनता त्यांच्या मनाला कधी शिवली नाही. पंच्याएशीव्या वर्षापर्यंत दत्तोपंत चांगले हिंडत फिरत होते आणि कार्यमग्न होते. शेवटची चार वर्षे मात्र त्यांचे शरीर झपाट्याने काष्ठवत होऊन पडझडत चालले. आपण आता परावलंबी होत चाललो, माणसे आपल्याला टाळत असतात, अशी एक खंत त्यांना मनोमनी वाटत असावी. पण आपले गाऱ्हाणे ते कधी गात नसत. होता होईतो कुणाला उपसर्ग द्यायचा नाही, कुणाला काही मागायचे नाही, याचना तर नाहीच नाही असा त्यांचा प्रथमपासून बाणा होता. 'दत्तोपंतांना व्याख्यानबाजीचा नि मानसन्मानांचा मोह फार, त्यापायी ते वेळ व्यर्थ दवडतात' अशी त्यांच्या माघारी पुष्कळ टीका होत असे. त्यांच्या कानी ती गेली की ते म्हणत 'मीहून कधी काही मागत नाही की निमंत्रणे लावीत नाही. लोक गळी पडतात, मला नाही म्हणवत नाही. आता माझं लोणचं घाला म्हटलं तरी ऐकत नाहीत.' वाईच्या 'आनंदीधामा'त ते अखेरच्या काळात जाऊन राहिले तरी तिथेही ते स्वाभिमानपूर्वक दिवस रेटीत होते.

दत्तोपंत एकदा बोलायला लागले की, त्यांची गाडी अनेक बोगद्यांतून वळणे घेत घेत कुठे जाईल याचा नेम नसे. पूर्वी सांगितलेल्या गोष्टी ते पहिल्या खेपेइतक्याच ठाशीवपणे सांगत सुटत. अतिशय तल्लख स्मृती असणारा हा माणूस तेच तेच पुन्हा ऐकवत असे हा त्यांच्या वार्धक्याचा दोष म्हटला पाहिजे. पण हे केविलवाणे वार्धक्य त्यांना ऐशी वर्षांनंतर आले. तत्पूर्वी मात्र त्यांच्या भेटीत एक अपूर्व बौद्धिक आनंद लुटायला मिळत असे. असा आनंद गेल्या पंचवीस तीस वर्षांत मी अनेकदा मनसोक्त लुटला. १९६१ सालापर्यंत दत्तो वामनांची छावणी पुण्याच्या शनिवार पेठेत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नेनेघाटानजीक ' लोककल्याणा 'त होती. कै. धोंडूमामा साठ्यांनी मित्रभावाने त्यांना ही छावणी उभारून दिली होती. तदनंतर १९६२ ते १९७० अखेर शनिवारातच, पण मेहुणपुऱ्यातील कै. श्रीधर विठ्ठल दाते यांच्या वाड्यात दत्तोपंतांना तळ ठोकावा लागला. पुणे शहर हे दत्तोपंतांची कर्मभूमी होती आणि या शहरावर त्यांचे विलक्षण प्रेम होते. दत्तोपंतांसारखा अलौकिक बुद्धीचा, चिकित्सक, बहुश्रुत माणूस मनाने किती कोवळा, सामान्य जनाप्रमाणे भावनिक, श्रद्धाळू होता हे मी अनुभवले आहे. पुण्याचा इतिहास, पुण्यातील देवदेवता, जुन्या वास्तू, सर्व प्रकारच्या चळवळी, नाना क्षेत्रातील लहानथोर माणसे, नानाविध संस्था, लफडीकुलंगडी—सर्व काही त्यांच्या डोक्यात खच्चून भरलेले होते. १९०६ च्या मळेकर वाड्यातील चवथ्या साहित्य संमेलनापासून पुण्याच्या सार्वजनिक जीवनात दत्तोपंतांनी जे एकदा स्वतःला झोकून दिले ते कुडीतून प्राण जाईपर्यंत. अपरिहार्य झाल्याखेरीज संमेलनाची वारी त्यांनी कधी चुकवली नाही. आपली शनिवार पेठ, आपलं वडिलार्जित घर, वडील पूज्य बाबासाहेब, धाकटा भाऊ दामुअण्णा, वहिनी, त्यांची मुलं, नू. म. वि., शिक्षण प्रसारक मंडळी आणि कितीतरी संगोपिलेल्या शैक्षणिक नि इतर संस्था– हे सर्व त्यांच्या माया-ममतेचे विषय होते. वर्षापूर्वी वहिनी वारली तेव्हा दत्तोपंतांना घर उजाड झाल्या-सारखं वाटू लागलं आणि वृद्धापकाळीसुद्धा पुतणी-पुतण्यांवर मायेची शाल त्यांना पांघरावीशी वाटली. मृत्यूपूर्वी वाईहून चारपाच दिवस ते पुण्याला घरी येऊन पडले ते या भावनेने की, मी माझ्या घरी, आप्तस्वकीयांत आलो, आता मेलो तरी हरकत नाही. कुणाला सुगावा लागू न देता याच भावनेपोटी त्यांनी इच्छामरण पत्करलं.

पुण्यातून दत्तोपंतांनी वाईला तळ हलविला तो अनिच्छेने. दातेवाडा काही कारणाने सोडण्याची त्यांच्यावर पाळी आली. कै. डॉ. वा. रा. ढमढेरे आणि यादव इंजिनिअर या दोघांनी पुढाकार घेऊन दत्तोपंतांच्या कायम निवासासाठी एक निधी उभारला व त्या निधीतून पुढे वाईची ' आनंदीधाम ' ही वास्तू उभी राहिली. शिष्य, चहाते, हितचिंतक अशा शेकडो व्यक्तींनी अल्पावधीत गोळा केलेल्या या निधीत दत्तोपंतांनी स्वतःची भर घालून मातुःश्रींच्या स्मरणार्थ तिला ' आनंदीधाम ' हे नाव दिले व तिथे १९७० च्या मध्यास आपल्या सर्व अमोलिक अशा ग्रंथसंभाराच्या सोबतीने ते धीरे धीरे कालक्रमणा करू लागले. अस्ताव्यस्त धूळ खात पडलेला हा संग्रह नीट लावण्यास त्यांना कधी सवड सापडली नाही. कुणाला त्यांनी ते काम करूही दिले नाही. वाईतील घरात ते गेले खरे, पण अधूनमधून पुण्यात आल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. पुण्यात आले की, नारायणपेठेतील राष्ट्रभाषाभवनात त्यांचा ' पर्वतपे अपना डेरा ' असे. तिथे गो. प. नेने, करमरकर, श्री. व सौ. जानोरकर इत्यादी त्यांच्या सुखस्वास्थ्याकडे आदरपूर्वक लक्ष देत. आपल्या साध्या, निगर्वी, प्रसन्नचित्तवृत्तीमुळे दत्तोपंतांनी आयुष्यात इतकी माणसे जोडली होती की, त्यांना मनुष्यबळ कधीच

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कमी पडले नाही. महाराष्ट्रात, फार काय तमाम हिंदुस्थानात, गेली पन्नाससाठ वर्षे त्यांचा संचार होता. या संचारात त्यांना सर्व जातिजमातीतील अगणित लोकांचे मनोभावे सहकार्य लाभत गेले.

निश्चयपूर्वक अविवाहित राहून दत्तोपंतांनी आपले सारे आयुष्य शिक्षणकार्याला वाहिले होते. हे शिक्षणकार्यही त्यांनी व्यापक अर्थाने केले. ज्या शिक्षणामुळे बुद्धी चिकित्सक होते, मन विकसित होते, विवेक जागृत राहतो, परमतसहिष्णुता अंगी बाणते, जुन्यातील चांगले घेऊन नव्याचाही स्वीकार करायची वृत्ती वळावते आणि मुख्य म्हणजे शास्त्रशुद्ध सर्वंकष ज्ञानप्राप्ती होऊन सर्वजनांची उन्नती साधते ते खरे शिक्षण—असा व्यापक शैक्षणिक ध्येयवाद त्यांच्या वर्तनात, वाणीत आणि लेखणीत वारंवार ओसंडून वाहत होता. इतिहास संशोधन, स्वभाषा, राष्ट्रभाषा, भाषिक विद्यापीठे, भाषिक प्रांतरचना, साहित्य, विषय कोणताही असो, त्यांचे लक्ष या समाजाभिमुख शैक्षणिक ध्येयवादापासून कधीही ढळले नाही. बहुतांची अंतरे राखून दत्तोपंतांनी आपल्या न्यायप्रिय सभापांडित्याने अनेक संस्थांचे जे लालनपोषण केले ते ध्यानी घेता इतिहासाचार्य राजवाड्यांपेक्षा ते न्यायमूर्ती रानड्यांचेच सच्चे चेले शोभतात. महाराष्ट्रातील संस्थारूपी ऊबदार गोळ्यात दत्तोपंतांनी आपल्या बुद्धिचातुर्याने आणि प्रसन्न व खेळकर वृत्तीने चैतन्य ओतले यात शंका नाही.

तसे पाहिले तर 'माला'कार चिपळूणकर, न्यायमूर्ती रानडे, आगरकर, लो. टिळक, महात्मा गांधी, पं. नेहरू या व्यक्तींविषयी दत्तोपंतांचे मनी विशेष आदरभाव होता. इतिहासक्षेत्रात राजवाडे त्यांचे गुरू होते, तर दत्तोपंत आपटे आदर्श होते. साहित्यक्षेत्रात तात्यासाहेब केळकर आणि आचार्य अत्रे या दोघांविषयी त्यांना विशेष ममत्व वाटायचे. पण अशा अनेक भिन्नवृत्तीच्या लोकाग्रणींचे संस्कार होऊनही दत्तोपंतांनी वारसा चालविला तो नेमस्ताग्रणी न्या. रानडे यांच्या विवेकशील मार्गदर्शकाचा. रानड्यांप्रमाणे त्यांनी संस्था उभ्या केल्या नाहीत, पण पाय धरू लागलेल्या अनेक संस्थांचे बोट धरून त्यांना प्रौढपण प्राप्त करून देण्याची कामगिरी या दत्तो वामनांनी खचित केली. नावे तरी किती संस्थांची घ्यावीत? साहित्यपरिषदेपुरते सांगायचे तर अध्यक्ष, उपाध्यक्ष, म. सा. पत्रिकेचे संपादक, परिषदेचे इतिहासकार, ज्येष्ठ सल्लागार अशा विविध नात्यांनी संस्थेशी त्यांचा पन्नास वर्षे अतूट संबंध होता. दत्तोपंतांच्या मृत देहावर पडलेले असंख्य हार आणि पु. ल. देशपांड्यांपासून तो थेट यशवंतराव चव्हाणांपर्यंत सर्वांनी वाहिलेली त्यांना श्रद्धांजली—यात त्यांच्या थोरवीचे नि लोकप्रियतेचे सर्व रहस्य आले. महाराष्ट्रातील संस्थारूपी संसारावरील एक मायेचे छत्र दत्तोपंतांच्या निधनामुळे कोसळून पडले ही त्यांच्याविषयी सार्वत्रिक भावना आहे.

त्यांनी मार्गदर्शित केलेल्या संस्था हेच त्यांच्या बुद्धिचातुर्याचे व शैक्षणिक कार्याचे खरे स्मारक म्हणता येईल.



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दत्तोपंतांच्या एका दुर्लक्षित टीकाविषय झालेल्या पैलूविषयी काही विचार मांडणे आवश्यक आहे. राजवाड्यांनी डोंगराएवढे संशोधन उपसले, ते संपादिले व स्वतः बहुत भाष्यकारी लेखन केले. दत्तोपंतांनी त्यांचा गंडा बांधला, पण सारा जन्म बोलण्यात घालविला, मौलिक लेखन काहीच केले नाही अशी प्रेमळ टीका त्यांच्या हयातीत वारंवार केली जाई. दत्तोपंतांचा पिंड नि स्वभावधर्म ध्यानी घेता मला ही टीका निरर्थक वाटते. दत्तोपंत संशोधन-लेखन करीत राहते तर मग त्यांची भूमिका कोणी पेलली असती ? आणि त्या भूमिकेची कितीतरी गरज होती. शासनाने सोपविलेल्या शिवचरित्राबाबत मात्र माझे मत असे की, एकतर शासनाने हे कार्य दत्तोपंतांसारख्या सभापंडितावर सोपवायला नको होते आणि दत्तोपंतांनीही उत्साहाच्या भरात ते स्वीकारायला नको होते. जे तरुणपणी, प्रौढपणी कधी केले नाही, जमले नाही ते आयुष्याच्या उतरणीवर कसे जमावे ? लिहिण्याची नुसती इच्छा असून उपयोग नव्हता. त्यासाठी मांड ठोकून कै. न. र. फाटकांप्रमाणे एकाग्रचित्ती खडतर तपश्चर्या करावी लागते. ते सामर्थ्यच या समर्थ पुरुषाचे ठायी नव्हते. समर्थांचे बरेच आयुष्य हिंडता धुंडिता गेले. पण आपल्या भ्रमंतीचे उत्कट-गोमटे फल 'दासबोधा'च्या रूपाने देऊन ते कीर्तिरूप उरले. शिवचरित्राचे धनू पेलण्याइतके दत्तोपंत समर्थ निश्चितच होते. शिवचरित्रविषयक म्हणा की अन्य कुठल्याही विषयावरील ग्रंथ म्हणा चारसहा पाने प्रास्ताविक लिहून अशा ग्रंथाची शास्त्रशुद्ध परीक्षा करण्याइतकी तीव्र बुद्धिमत्ता आणि बहुश्रुतता त्यांचे ठायी होती. ज्याची प्रस्तावना किंवा अभिप्राय मागताना धाक वाटावा आणि शाबासकीची पाठ थोपटून घेण्यात धन्यता मानावी असा दत्तो वामनांचा महिमा. पण हे सारे जमेस धरूनही त्यांची लेखणी अल्पप्रसवा ठरली आणि संभाषणे-भाषणे तेवढी त्यांच्या हयातीपुरती फळास आली. त्यांचे सामर्थ्य नि मर्यादा यामुळे स्पष्ट झाल्या.

पण दत्तोपंतांच्या नावावर अगदीच लेखन नाही असे नाही. आहे. दोन हाताच्या बोटांवर मोजण्याइतकी पुस्तके आहेत. मराठीच्या अभ्यासकांना त्यांचा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' बहुपरिचित. १९२२ साली प्रकाशित झालेल्या या 'अवतारा'मुळे अव्वल इंग्रजीतील मराठी गद्याची सांगोपांग ओळख वाचकांस टसठशीतपणे प्रथम झाली. 'अवतारा'च्या पुढे दोन आवृत्त्या निघाल्या. पण त्यात भर घालण्याची वा नवे संस्करण करण्याची दत्तोपंतांना कधी फुरसत मिळाली नाही. १९३५ साली 'मराठी इतिहास आणि इतिहास संशोधन' हे आढावा घेणारे त्यांचे सटीक पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यानंतर आठ वर्षांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेचा आणि साहित्य संमेलनाचा मागोवा घेणारा साधार इतिहास दत्तोपंतांनी लिहिला. (१९४३) संशोधित असा त्यांचा हा एकमेव ग्रंथ. एरवी ऐतिहासिक विषयांवर त्यांनी शेकडो टिपणे लिहिली व सुमारे शंभर पुस्तकांना तरी प्रस्तावना लिहिल्या. पण त्यांचे हे सारे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लेखन विखुरल्या स्वरूपात आहे. त्यातील निवडक भाग एकत्रित कुणी प्रसिद्ध केला तर दत्तोपंतांच्या चिकित्सक अभ्यासाचे नव्याने दर्शन होऊ शकेल.

'सुमनसप्तक' (१९५०), 'ओळख' (१९६१) आणि 'लो. टिळकांचे सांगाती' (१९७५) ही तीन दत्तोपंतांच्या लेखणीतून उतरलेली आठवणीवजा, पण शैलीदार व्यक्तिचित्रात्मक पुस्तके. दत्तोपंतांची लेखणी किती भावस्निग्ध, चटकदार, शुद्ध मराठमोळी आणि उठावदार आहे याची ओळख करून देण्यास 'ओळख' हा एक संग्रहसुद्धा पुरेसा आहे. नाट्यछटाकार दिवाकर, पूज्य बाबासाहेब पोतदार, चिपळूणकर पितापुत्र, भांडारकर आणि राजवाडे यांची 'ओळखी'तील दत्तो वामनी स्मृतिचित्रे विद्यापीठीय पाठ्यपुस्तकातून आवर्जून समावेश करावीत इतकी सुरेख, प्रेरक आहेत. 'श्रोते हो' (१९५९) आणि 'भारतीय भाषासमस्या' (१९६२) या दोन ग्रंथांत दत्तोपंतांची १५–२० निवडक भाषणे संग्रहित असून त्यात इतिहास, भाषा, साहित्य, भाषिक विद्यापीठे, भाषिक राज्ये, स्वभाषा–राष्ट्रभाषापरस्पर संबंध इत्यादी विषयांवरील त्यांच्या परिपक्व, उदार, व्यापक, व्यवहार्य अशा विचारांचे ठसठशीत दर्शन घडते. यातील काही भाषणे लेखनशैलीच्या दृष्टीने फार ढंगदार, मौलिक आहेत. १९४९ सालचे पुणे संमेलनाचे त्यांचे स्वागताध्यक्षीय भाषण म्हणजे 'मराठीच्या निश्चयघोषा'ची स्फूर्तिदायक तुतारीच. संमेलनांच्या आजवरच्या स्वागताध्यक्षीय भाषणातील हे सर्वोत्तम भाषण ठरावे. दत्तोपंत जसे खुमासदार, प्रसन्न, भेदक बोलत तशीच त्यांची लिहिण्याची शैली होती. बोलण्यालिहिण्याचा एकच थाट. संभाषण आणि भाषण यांचे बेमालूम मिश्रण करण्यात ते पटाईत होते. एखादा विषय घेऊन दत्तोपंत तासभर बोलू लागले की, त्यांची भाषणे क्वचित रंगत. पण तेच आधी कुणी डिवचले किंवा कुणी खाद्य पुरवले की, ते आव्हानपूर्वक जे बोलत त्यात त्यांचे सारे चतुरबुद्धी वक्तृत्व तरारून येई, आणि ते हा हा म्हणता फड जिंकीत. असा हा विचारोन्मुख करणारा युक्तिवादी प्रभावी वक्ता होता आणि तितकाच तोलूनमापून लिहिणारा शैलीदार लेखक. त्यांची लेखणी अल्पप्रसवा होती, पण वाघीण होती

जागतिक दफ्तरी संघटनेच्या अधिवेशनाला स्वारी एकदा (१९५६) युरोपात दोन महिने संचार करून आली तर ती संचारयात्राही 'मी युरोपात काय पाहिले?' या पुस्तकात चित्रित करून ठेवली. ऐतिहासिक नजरेने पाहिलेले पश्चिम युरोपचे दर्शन म्हणजे हे छोटे प्रवासवर्णनात्मक पुस्तक. 'इनसाईड महाराष्ट्र' (१९६४) हे एकमेव इंग्रजी छोटे पुस्तक दत्तोपंतांनी शासनाच्या आदेशाने परभाषिकांकरिता लिहिले. या छोट्या पुस्तकात महाराष्ट्राची सारी वैशिष्ट्ये त्यांनी अचूकपणे धावत्या शैलीत टिपली आहेत. 'टिळकांचे सांगाती' हे त्यांचे शेवटचे पुस्तक मला वर्षभर वेठीला धरून त्यांनी लिहिले. त्यांच्या सान्निध्यात वर्षभराची ही खरोखर सक्तमजुरी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

होती. पण ती मी जन्मभर पुरेल अशी ज्ञानशिदोरी मानतो. टिळकांच्या आयुष्याशी निगडित झालेल्या शंभरावर व्यक्तींची स्मृतिचित्रे या पुस्तकात असून त्यात अधून-मधून दत्तोपंतांनी आत्मपर मजकूरही भरपूर लिहिला आहे. त्यांनी लिहिलेल्या महत्त्वाच्या बहुतेक व्यक्तिचित्रांत आत्मपर मजकुराचे काही धागेदोरे हटकून आढळ-तात आणि त्यामुळेच ती व्यक्तिचित्रे अधिक वाचनीय ठरतात.

दत्तोपंतांच्या लेखनाविषयी यापेक्षा विशेष काय लिहावे ? टिळकोत्तर महाराष्ट्रातील एक पुण्यपुरुष हेच त्यांचे सार्थ वर्णन होईल. कै. सोनोपंत दांडेकर सोडले तर स्वातं-त्र्योत्तर महाराष्ट्रात त्यांच्याइतका सर्व जातिजमातींतील जाणकरांचा प्रेमभाव संपादन करणारा अन्य कोणी विद्वान पुरुष झाला नाही.

# पापुद्रे

## वासुदेव मुलाटे

'पापुद्रे' हा प्रा. नागनाथ कोत्तापल्ल्यांचा पहिलाच समीक्षा लेखसंग्रह. 'कविता ऐलतिरीची' व 'कविता पैलतिरीची' अशी आधुनिक व प्राचीन कवितेची विभागणी करून आपली काव्यविषयक परीक्षणे व काही लेख हा या पुस्तकातील एक महत्त्वाचा भाग. आधुनिक कवितेच्या संदर्भात गेल्या दहापंधरा वर्षांतील प्रसिद्ध झालेल्या कविते-बाबतचे विवेचन यात केलेले आहे. १९६७ ते १९७० या तीन वर्षांत 'अस्मितादर्श', 'वैखरी' व 'विविधा' या कवितेला आवर्जून जागा देणाऱ्या, उच्च वाङ्मयाभिरुचीच्या मासिकांचा उदय तसेच 'फक्त', 'स. न. वि. वि.', 'अबकडई' इ. अनियतकालि-कांची चळवळही याच काळात फोफावली. मराठी आधुनिक काव्यनिर्मितीच्या संदर्भात उल्लेखनीय असा हा टप्पा. म्हणून या कालखंडात लिहिणाऱ्या कवींच्या कवितांचे स्वरूप प्रा. कोत्तापल्लेंनी इथे सांगण्याचा प्रयत्न केला आहे. या काळातील कविता सामाजिक जाणिवांसह उतरते आहे. ती आपल्या अंगभूत वास्तवासह अवतरते आहे, पूर्वीच्या कवितेपेक्षा ती फारशी वेगळी नसली तरी जास्तीत जास्त प्रतिमांचा भाषेत जसा बोलण्याचा प्रयत्न करते तशीच ती कविता दुर्बोधतेपासून दूर राहण्याचा प्रयत्न करते. जीवनातील गुंतागुंत चित्रित करीत असताना जर शब्दांच्या सामर्थ्याचे थिटेपण कवीला जाणवून त्याऐवजी त्याने प्रतिमांची योजना केली असेल तर ती कविता दुर्बोध नाही असे प्रतिपादन ते करतात. या ठिकाणी दुर्बोधतेचा त्यांनी लावलेला अन्वयार्थ विचारात घेण्यासारखा आहे.

या कालखंडातील कविता सरळ सरळ आणि प्रामाणिक, वास्तवाला थेटपणे सामोरी जाणारी असून संवेदनानुभव साकार करीत असताना विचारानुभव व्यक्त करणारी नाही असे प्रा. कोत्तापल्लेंना वाटते. जुन्या नव्या कवींच्या काव्यसंग्रहांच्या परीक्षणातून काहींच्या बाबतीत भारावलेपण दिसून येते; असे भारावलेपण या पुस्तका-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तील परीक्षणातून दिसत नाही. हे एक चांगले आणि महत्त्वाचे भान आहे. केवळ अहवालवजा न लिहिता समकालिनांच्या व पूर्वसूरींच्या काव्याचे संदर्भ ते देतात व या पार्श्वभूमीवर ते आपले निकष स्पष्ट करतात. या दृष्टीने 'अस्वस्थ सूर्यास्त', 'जुलूस' 'पावसाचे पाय', 'उर्ध्वगामी', 'स्वस्तिक' या काव्यसंग्रहांची परीक्षणे वाचनीय आहेत. पुस्तकांची ( काव्यसंग्रहांची ) यादी पाहता यात बहुतांशी मराठवाड्यातीलच कवी आहेत असे लक्षात येते. तरीही निवडलेल्या कवितांचे स्वरूप विविध प्रकारचे असून अनेक ठिकाणी त्यांच्या बहुश्रुतपणाची ओळख पटते. त्यांना विषयाचे आकलनही जबरदस्त आहे.

पैलतिरीची कविता म्हणून ज्यांचा उल्लेख इथे केला आहे ती आहे प्राचीन कविता. 'संत वाङ्मय,' 'पोवाडा,' लावणी, पंडिती काव्य इ. बाबतचे काही विचार इथे मांडून त्यांनी या प्राचीन लोकसंस्थांनी रसिकांमध्ये आणि कलावंतांमध्ये संवाद निर्माण करण्याचे मोलाचे असे कार्य केले आहे, म्हणून आजच्या बदलत्या समाजजीवनात आणि बदलत्या साहित्यरूपाच्या संदर्भात काही वेगळ्या संवादिनी निर्माण होऊ शकतील का ? असा प्रश्न उपस्थित केला आहे. याच अर्थाने तुकाराम, नामदेवादिकांची सामाजिक पातळीवर येणारी, जीवनाचे उत्तम चिंतन असणारी भावकविता, रामजोशी, सगनभाऊ, होनाजीबाळा इ. ची शाहिरी कविता यांचा एका बदलत्या दृष्टिकोणातून प्रा. कोत्तापल्लींनी अभ्यास सुचवला आहे.

प्राचीन वाङ्मयात वाङ्मयासंबंधीची विशुद्ध जाण असलेला कवी म्हणजे नरेंद्र. या नरेंद्राचे रुक्मिणी स्वयंवर प्रसिद्ध आहे. या काव्याच्या आधाराने त्याचे काव्यविषयक गुणदोष, त्याची काव्यप्रेरणा, निर्मितिकौशल्य, काव्य सजावट, वर्णनकौशल्य, त्याच्या कवितेतून येणारा निसर्ग इ. बाबीसंबंधांचे अनेक संदर्भ इथे दिलेले आहेत. तसेच तुकारामाच्या कवितेचीही अशीच चिकित्सकवृत्तीने आणि नव्याने मीमांसा केली आहे. तुकारामाची कविता अलीकडील काही कवींच्या कवितांची उदाहरणे देऊन संवादात्मक बांधणीच्या संदर्भात तपासत असताना त्यांना मर्ढेकरांचीही आठवण झालेली आहे. आणि मग उपहास, उपरोध, फटकळपणा आणि शब्दविवेक या सर्वच गोष्टींचा विचार करता त्यांची कविता तुकारामाच्या कवितेशी समांतर असल्याचे जाणवते.

वाङ्मयीन क्षेत्रातील अवाङ्मयीन व्यवहारासंबंधाने यापूर्वीच सुप्रसिद्ध कादंबरीकार प्रा. भालचंद्र नेमाडे यांनी लिहिलेले आहे. प्रा. कोतापल्ल्यांनी हाच विषय पुन्हा एकदा त्यांना आलेल्या अनुभूतीच्या माध्यमातून त्यांच्या विशिष्ट उपहासगर्भ भाषेत नव्याने या पुस्तकाच्या प्रारंभीच्या भागात मांडला आहे. या सुसंस्कृत जीवनातील असंस्कृततेने ते अस्वस्थ झाले आणि म्हणूनच मनस्वी पोटतिडकीने साहित्यक्षेत्रातील विविध स्वरूपाचे हे प्रदूषण त्यातील विविध घटकांच्या परामर्शासह त्यांनी सांगितले आहे. विषयाची मांडणी करताना संबंधितांना हळूच चिमटेही काढले आहेत.

प्रा. कोत्तापल्ल्यांची विषयाची पकड चांगली आहे म्हणून ते त्या त्या विषयाची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मांडणीही सुव्यवस्थित करतात. भाषा सोपी सरळ असून शब्दबंबाळ व दुर्बोध नाही. साक्षेपी दृष्टिकोणातून विषयाच्या योग्य आकलनातून केलेले विषयाचे प्रतिपादन यामुळे मराठी समीक्षा-वाचकांना क्लिष्ट वाटणार नाही. तुकारामाच्या कवितेचा संवादात्मक घाट आणि तिचे लौकिकाशी असलेले नाते या संबंधानेच त्यांनी रेखाटलेला एक आलेखही या पुस्तकात आहे. अंगीच्या उत्तुंग प्रतिभेच्या सामर्थ्यातून निर्माण झालेली भावगर्भ, विचारगर्भ आणि अर्थघन, अनुभवाभोवतीचा तपशील टाळून अनुभवाला सरळ सामोरी जाणारी तुकारामाची कविता आणि तिचे मोटेपण प्रा. कोत्तापल्लेंनी अचूकपणे आणि तुकारामाच्या कवितेचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या जिज्ञासूंच्या मनात निर्माण होऊ शकणाऱ्या अनेक प्रश्नांची संभाव्यता लक्षात घेऊन सांगितले आहे. पुस्तकाच्या शेवटी शाहीर रामजोशींच्या कवितेबाबतचे टिपण मात्र त्या मानाने फारच त्रोटक झाले आहे. ते आणखी थोडेसे विस्तृत लिहिले असते तर, या निमित्ताने लावणीकाव्य आणि रामजोश्यांप्रमाणेच इतरांच्या तत्कालीन लावणी काव्याचाही परामर्श घेता आला असता. आधुनिक कवितेच्या सदर्भातील स्फुट लेखनही याच अनुषंगाने विचारात घ्यावे लागते. तिचे वेळोवेळी केलेले स्फुट लेखन विचारात घेतले तरी संग्रहरूपाने ते एकत्रित प्रकाशित करीत असताना त्यांचीही थोडीशी अधिक विस्ताराने मांडणी करणे योग्य झाले असते. १९६७ ते १९७० चा कवितेवरच्या लेखाचेही असेच पुनर्लेखन करून अद्ययावत करता आले असते. प्राचीन आणि आधुनिक अशा प्रदीर्घ कालावधीतील कवितेचा अभ्यास करण्याचे दृष्टीने ते अधिक उपयुक्तही झाले असते. परंतु शेवटी हा सर्व लेखकाच्या स्वेच्छेचा, त्याच्या लेखन-सामर्थ्याचा, अभ्यासाचा भाग आहे.

मराठी साहित्यक्षेत्रातील प्रदूषणाचे संदर्भात लेखकाची या लेखनामागची भूमिका लक्षात घेऊनही त्यांनी मांडलेले विचार अतिरेकाकडे झुकताहेत का ? हाही विचार वाचकाच्या मनात येतो. कारण गटबाजी, स्पर्धात्मक व्यवहार, वाचकांची उदासीनता, साहित्यसंस्थांच्या कार्यातील शिथिलता आणि दोष, संमेलनातील अवाजवी खर्च, चर्चा वगैरेंचा विचार करूनही त्यांची आवश्यकता आणि सहभाग यांची काहीच उपयोगिता नाही असे म्हणणे सयुक्तिक ठरणार नाही. काही चांगल्या प्रवृत्ती त्यांच्या मूलभूत गुणदोषासह येत असतील तर त्यांना आकार देण्याचे कार्य प्रा. कोत्तापल्ले किंवा प्रा. नेमाड्यांसारख्या विचारवंतांचेही आहे. या सर्वांत राहूनच ते केले पाहिजे. ही त्यांची सामाजिक बांधिलकी आहे. म्हणूनच नुसत्या प्रदूषणाचा विचार हा अपूर्ण असून त्यावरच्या उपाययोजनांचा विचारही मांडणे अधिक योग्य ठरले असते.

पापुद्रे : **प्रा. नागनाथ कोत्तापल्ले** रिमझीम प्रकाशन, औरंगाबाद,
मूल्य : बारा रुपये



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# कै. न. र. फाटक : ताठ कण्याचे व्यक्तिमत्त्व

## स. गं. मालशे

नुकतेच दत्तोपंत पोतदार गेले, तेव्हा न. र. फाटक फटकन् म्हणाले, ' आता आमचा नंबर लागला!—आणि खरोखरच गेल्या डिसेंबरच्या २१ तारखेला फाटकही गेले !

ऑक्सफर्ड म्हटलं की केंब्रिज आठवावं, अशी ही ज्ञानतपस्व्यांची जोडी होती. दोघांत स्वभावभिन्नता जरूर होती. तरीसुद्धा दोघांत समानधर्मही बरेच होते. ज्ञानाची लालसा दोघांतही जबरदस्त. चालतेबोलते ज्ञानकोशच. आमच्यासारख्या नवख्या संशोधकांना या दोघांचाही आधार वाटायचा. मराठी संस्कृतीचा आणि इतिहासाचा दोघांचा व्यासंग गाढा होता. दोघांनाही माणसांचा आणि बोलण्याचा कंटाळा नव्हता. कोणाही जिज्ञासूने यावे आणि आपल्या अडचणी निःसंकोचपणे सांगाव्या. शंकानिरसन झाले नाही असे क्वचितच घडले असेल.

कै. फाटकांचा आणि माझा परिचय तसा दोन तपांचा म्हणता येईल. मुंबईच्या राममोहन हायस्कूलमध्ये त्यांची महाभारतावर व्याख्याने झाली होती. मी त्यांची इतिवृत्ते लिहून घेत होतो, ती त्यांना नेऊन दिली. फाटकांनी ती ठेवून घेतली. पुढे भेटलो, तेव्हा म्हणाले, " त्यावर एक ग्रंथच लिहिणार आहे. तूर्त प्रसिद्ध करायची नाहीत. " पुढे चिपळूणकर मंडळींच्या महाभारताच्या आवृत्तीचे संपादन त्यांच्याकडे आले, तेव्हा मी त्यांना आठवण केली. तेही म्हणाले की शेवटचा उपसंहारात्मक खंड मी स्वतंत्रपणे तयार करणार आहे. पण तसा खंड निघाला नाही. माझी निराशा मी त्यांना बोलून दाखविली. कारण फाटकांचा महाभारताचा व्यासंग सूक्ष्म होता. एकच गोष्ट आठवते, ती सहज सांगतो. एका व्याख्यानात ते म्हणाले होते, "मुलींनो, आपणच काय ती प्रसाधनं वापरून नट्टापट्टा करू शकतो, अशी फुशारकी मारू नका. द्रौपदीसुद्धा काही कमी नव्हती. तिनं स्नानाच्या वेळी तृणपात्यांवर आपली चोळी काढून ठेवली आणि स्नानानंतर पुन्हा अंगात घातली. पण दरम्यान चमत्कार झाला होता. तृणपात्यांचे मृगकिड्यांच्या थव्यात रूपांतर झाले होते! द्रौपदीनं

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आलक्तक म्हणजे आळत्याची उटी आंगाला चोपडली असणार आणि तिचा लाल रंग त्या पाल्यांना लागला दुसरं काय ! ! " अशी त्यांच्या व्याख्यानातून काव्यशास्त्र-विनोदाची पखरण असायची. कधी कोपरखळ्या असायच्या. त्यांचे लिखाण जसे रोकडे आणि रुक्ष वाटते, तसे त्यांचे भाषण नसायचे. त्यात वक्तृत्वाचा आव नसायचा. सहज बोलल्यासारखेच ते बोलायचे; पण ते अगदी खुसखुशीत असायचे.

त्यांच्या ' आदर्श भारतसेवक ' या गोखल्यांच्या चरित्राला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला होता. या ग्रंथाचे प्रकाशन साहित्यसंघात झाले होते. सभेचे अध्यक्ष गोखल्यांबरोबर काम केलेले गोखले एज्युकेशन सोसायटीचे टी. ए. कुलकर्णी होते. फाटकांनी त्या समारंभात भाषण केले, ते असेच मजेशीर होते. ' सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी 'च्या पेटाऱ्यांतून कागदपत्रांचा धांडोळा घेत असताना ' फुस्स्ऽऽ ' करीत साप कसा निघाला, तो तिथून बाहेर यावा म्हणून सुरनळी कशी आत घातली, त्याला त्याने वेटाळून कसे घेतले व मग तो युक्तीने बाहेर काढून कसा मारण्यात आला, त्याचे त्यांनी हसत हसत वर्णन केले होते. आपल्या गोखल्यांसंबंधीच्या मतांवर कोणी कोणी आक्षेप घेतले आहेत, त्यांचाही त्यांनी त्या व्याख्यानात समाचार घेतला. या आक्षेपकांच्या नावावर कोट्या केल्या. उदा. बायकांच्या पायात बांधतात, त्या नावाचे मासिक चालवणाऱ्या एक संपादकाने ( पैंजणकार बेहेरे ). ज्याला नाममात्र कान आहेत किंवा ज्याच्या नावात ' कान ' आहे ( का. न. केळकर) आणि ज्याच्या नावात ' बोकड ' म्हणजे ' अज ' आहे ( अ. ज. करंदीकर ) यांनी माझ्या मतांवर टीका केली आहे, पण यांच्याशी मी वाद करीत नाही. केळकरांसारखा नरसिंह लोक-प्रियतेच्या शिखरावर असताना ज्याने त्याच्याबरोबर झुंज घेतली, त्यानं या 'अजां'शी कसला वाद करायचा ? इ. इ.

कै. फाटक जेवढे व्यासंगी होते. तेवढेच वादप्रिय होते. आणि त्यांच्या लेखणी-पेक्षा वाणीला ' क्षुरस्य धारा ' होती. टिळक गोखले संबंध, शिवसमर्थ संबंध, नारायणरावांचा खून की आत्महत्या ?, रामदास हे राष्ट्रगुरू की शिवाजीचे नुसते आध्यात्मिक गुरू, विष्णुशास्त्री चिपळूणकरांची कामगिरी, सत्तावनचे स्वातंत्र्यसमर की शिपाई गर्दी, महानुभाव हे कितपत क्रांतिकारक होते ?, टिळकचरित्र असे अनेक वाद ते खेळले. यातला नाना फडणविसाची कड घेणारा ' खून की आत्महत्या ' हा वाद काय तो लोकांना रुचणारा होता, नाहीतर इतर वादांत बहुधा ते लोकांना अप्रिय आणि कटू वाटतील अशीच मते मांडीत आले. त्यांना ढोंगीपणा खपत नसे. सारा मामला रोखठोक आणि खणखणीत होता. ' राखावी बहुतांची अंतरे ' असा गुळमुळीतपणा त्यांना रुचला नाही. स्वातंत्र्येतिहासाचे सरकारी काम त्यांच्याकडे सोपविले जाण्यापूर्वीच्या काळात मंत्र्यांचे अज्ञान हा त्यांचा थट्टेचा विषय असे. भर सभांमध्ये ते त्यांचे वाभाडे काढीत. नावाप्रमाणे ' फाटक्या ' तोंडाचेच होते म्हणाना !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पण अशी एक दहशत समाजात असावी लागते. मुंबईकर साहित्यिक साहित्यसंघाच्या कामात जादा तात्त्विक घोळ घालतात आणि कार्य रेंगाळते असे दिसताच डॉ. भालेरावांनी संघाचे कायम अध्यक्ष फाटकांनाच करून टाकले, ते उगाच नाही.

इतिहासाचार्य राजवाडे यांच्यामुळे फाटकांना इतिहाससंशोधनात रस वाटू लागला. ते काही काळ त्यांना लेखनात मदत करीत असत. एकदा फाटक पोक काढून लिहीत बसले. राजवाड्यांनी चक्क त्यांच्या पाठीत बुक्की मारली आणि सांगितले की जो मेरुदंड म्हणजे पाठीचा कणा ताठ ठेवतो, तो शतायुषी होतो. फाटकांचा कणा तेव्हा जो एकदा ताठ झाला तो फारसा कधी वाकला नाही. अत्र्यांच्या शोकसभेच्या वेळी विनोद अंगाशी येऊन लोकांची माफी मागावी लागली होती. पण असे क्वचित घडले. कारण फाटकांची काही मते एकांगी असली, तरी ते भाबडेपणाने आपली बाजू मांडीत नसत. ते बुद्धिवादी होते. ते म्हणत, आपल्याकडे व्यक्तीवर शेंदूर थापून थापून तिची विभूती लहंभारती भासवली जाते. मी फक्त अशा मारुतींवरचा शेंदूर खरवडतो, मग लेपावर चढविलेले लेप निखळून पडले की मूळची अंगुष्टमात्र मूर्ती यथातथ्य स्वरूपात उभी राहते, मी मूर्तिभंजन वगैरे काही करीत नाही. महाराष्ट्रात प्रत्येक मोठ्या माणसाला 'महाराष्ट्राचा जनक' म्हणण्याची प्रथा पडलेली आहे. फाटक याबद्दल म्हणत, 'अरे या महाराष्ट्राचे जनक तरी किती ?' पण असे कटू सत्य लोकांना नको असते. फाटकांना नेहमी प्रवाहाविरुद्ध पोहावे लागले, पण ते कधी बघले नाहीत, परखड मते सतत मांडीत आले; मग कोणी फटकळ म्हटले तरी त्यांना पर्वा नसे.

मात्र त्यांची मते अशी परखड असली तरी नेहमीच ती समतोल असत असे नाही. काही म्हटले, तरी रामदास हा राजकारणाविषयी इतर संतांच्या मानाने अधिक जागरूक होता; पण फाटकांनी त्याच्या 'राजकारण' शब्दाचा अर्थही निव्वळ 'साक्षेप, दक्षता' असा करून टाकला आणि ज्ञानेश्वरांना मात्र नसते राजकारण चिकटविले ! 'कलि' म्हणजे मुसलमान आणि त्यांच्या टोळधाडीविरुद्ध समाज एकत्र यावा, यासाठी 'ज्ञानेश्वरी' रचली गेली असे अट्टाहासाने सांगितले. डॉ. कोलते-प्रभृतींनी त्यांना समर्पक उत्तरे दिलेली आहेत. संतांवर, विशेषतः एकनाथांवर सुफी संप्रदायाचा पगडा आहे, असे फाटकांनी आपल्या एकनाथांवरील ग्रंथात मत मांडले आहे, पण फाटकांचे एतद्विषयक मत कसे भ्रामक आहे हे सेतु माधवराव पगडी यांनी आपल्या पुस्तकात सप्रमाण दाखविले आहे. लो. टिळकांच्या 'गीतारहस्या'-विषयी त्यांना कमालीचा आदर होता. पण त्यांच्या कामगिरीची स्फूर्ती चिपळूणकरां-ऐवजी रानड्यांना चिकटविण्याकडे तसेच त्यांना सनदशीर ठरविण्याकडे त्यांचा सदैव कल असे. वास्तविक कोणीही निःपक्षपातीपणे विचार केला, तर टिळक हे गीतेचा कर्मयोग आचरणारे होते; ते काही 'साधनशुचिता'वाले नव्हते; 'साधनानां

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनेकता 'वाले होते, याविषयी शंका उरू नये. ' क्रांतिकारक टिळक आणि त्यांचा काळ ' या ग्रंथात अ. ज. करंदीकर यांनी याबाबत भरपूर पुरावे दिलेले आहेत. पण फाटक फटकळपणे म्हणणार, ' या ' अजा 'ला काय कळते ?' गोखलेचरित्राचे पुनर्लेखन चालू असताना मी म्हटले, " माझ्या गावापासून गोखल्यांचे जन्मगाव ताम्हनमळा जवळच आहे. त्यांचे पुतणे बाबूराव गोखले हे काँग्रेसचे कर्ते पुढारी आहेत. तुम्हाला त्याबाबतीत काही माहिती हवी असली, काही छायाचित्रे हवी असली, तर मिळवता येतील. ती मंडळी माझ्या परिचयाची आहेत. " पण फाटकांना टिळक गोखल्यांच्या वादातच विशेष रस होता, त्यामुळे गोखले चरित्रात गोखल्यांचे खाजगी वृत्त विशेष आलेले नाही. कीर्ती कॉलेजात एका विदुषीचे भाषण झाले होते. त्यात त्यांनी या उणिवेचा उल्लेख केला होता. आणि फाटकांच्या १९२४ साली लिहिलेल्या चरित्रात कोकणातील ताम्हनमळा वगैरे परिसराचे खबखबीत वर्णन होते, असे त्या म्हणाल्या होत्या. तसेच या चरित्रात गोखले यांच्या माफीच्या प्रकरणातील पत्रे न्या. रानड्यांची होती, ही गोष्टही त्यांनी उल्लेखिलेली नाही. म्हणजे एक प्रकारे गोखले-शिष्य गांधींचीच महत्त्वाची साक्ष डावलली ! मात्र भाडभीड न ठेवता परखडपणे पूर्वपक्ष करणाऱ्या फाटकांसारख्या माणसाची समाजाला नितांत गरज असते. त्यामुळे भवती न भवती होऊन सत्य उजेडात येण्यास साहाय्य होते. ' पुणे लुटणारा ' एवढीच यशवंतराव होळकरांची सर्वसामान्य माणसाला ओळख होती. पण फाटकांनी चरित्र लिहिल्याने त्याची प्रतिमा उजळली. भल्या भल्यांनी त्याच्यावर मग कादंबरी नाटके रचली.

कै. फाटकांचा सर्वात चकित करणारा गुण म्हणजे त्यांची स्मरणशक्ती. मी संशोधन मंडळाचा संचालक असताना नागपूरहून एका गृहस्थांनी कविनाम ' भवानी तलवार ' असणारी अशी एक शिवाजीवरची कविता पाठविली व ती कोणाची म्हणून विचारले. मी त्या कवितेच्या प्रती करून कै. गुरुवर्य प्रियोळकर, श्री. शं. नवरे, वा. य. गोगटे वगैरे जाणकारांकडे पाठविल्या. पण कोणालाच त्याचे उत्तर देता आले नाही. सहज फाटक केळेवाडीत भेटले. मी त्यांना म्हटले, ' एक कविता घेऊन मी तुमच्याकडे येणार आहे. ' भवानी ' तलवार असे कवीचे नाव आहे. कवितेत लो. टिळकांचा सूचक उल्लेख आहे. ' माझ्यापाशी तेव्हा कवितेची प्रत नव्हती. मी काही अधिक माहिती देऊ शकलो नव्हतो. पण फाटकांनी ताडकन् विचारले, " त्या कवितेत संस्थानिकांना ' बुळेबुदवळे ' म्हटलेय का ? "

मी म्हटले, " होय. "

फाटक म्हणाले, " अहो, मग ती क्रांतिकारक चाफेकरांची कविता. इट वॉज ॲन् एक्झिबिट इन द टिलक ट्रायल ! "

मी थक्क झालो. त्यांचे कोणत्याही विषयाचे ज्ञान इंग्रजीत ' ॲट दि टिप ऑफ द

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

टंग ' म्हणतात, तसे असे—अगदी जिव्हाग्री !

' समग्र फुले ' संपादन करीत असताना काही शब्दांचे अर्थ अडले होते. फाटकांनी त्यातले काही फटाफट सांगितले. उदा. ' काड्यामहाल ' हा शब्द विचारताच फाटक म्हणाले, " दुसऱ्या बाजीरावाने कलावंतिणींसाठी वाडा बांधला होता. त्याला आज खिडकीला हदेसाठी गज असतात, तशा सणकाड्या म्हणजे बांबूचे गज बसवले होते. अशा सणकाड्या बसवलेला महाल तो काड्यामहाल. पेशवेदप्तरात अमुक भागात हा शब्द मिळेल. " [ पाहा : मला पेशवे दप्तराचा तो भाग येथे स्मरत नाही ] फाटकांची व्याख्याने ऐकतानाही काळ आणि घटनांचे तपशील यायचे आणि श्रोते चाट व्हायचे. मीही असा कित्येकदा अवाक होऊन शरमिंधा झालो आहे. नाणे वाजवून घ्यावे तसा खणखणीत व्यासंग, चौफेर ज्ञान, त्या ज्ञानाची हुकमी उपस्थिती आणि अत्यद्‌भुत स्मरणशक्ती फाटकांसारखी मला दुसऱ्या कोणात आढळलेली नाही.



---

## परिषदेचे नवे आजीव सभासद

### पुण्यातील

१. श्रीमती विजया शा. पुणेकर
२. श्री. नाना गोपाळ जोशी
३. श्री. चंद्रकांत ल. दीक्षित
४. श्री. मधुकर वि. सोवनी
५. श्री. बळवंत रा. रानडे
६. शंतनु दा. दर्शने
७. कु. शशिकला गोरे
८. श्री. मो. शं. किवळकर

### पुण्याबाहेरील

१. श्री. रमेश रा. मंत्री, विलेपार्ले
२. प्रा. श्री. नागप्पा सि. कुल्लूर. नेवासे
३. श्री. चिंतामणि वा. मोने, ठाणे
४. श्री. अशोक एरंडे, नेवासा
५. श्री. नामदेव ढसाळ, मुंबई

एप्रिल ७९ ते डिसेंबर ७९ या नऊमाहीत एकूण ४४ नवे आजीव सभासद झाले. परिषद या सर्वांची ऋणी आहे—कार्यवाह



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

इतर कलांपेक्षा कसे भिन्न आहे हे मुक्तिबोध दाखवून देतात. साहजिकच सर्वच कलांना लागू पडणाऱ्या निकषांचा शोध म्हणजे मृगजळाचा पाठलाग आहे. अर्थात साधन व माध्यम ह्यामध्ये ( मराठीत तरी प्रथमच ) मर्ढेकरांनी केलेला भेद मुक्तिबोधांनी मान्य केला आहे.

साहित्याचे साधन असते भाषा. आपल्या प्रबंधाच्या तिसऱ्या प्रकरणात मुक्तिबोधांनी भाषेच्या स्वरूपाची चर्चा केली आहे. विशेष हे की ही चर्चा आधुनिक भाषा-वैज्ञानिक व मानववंशवैज्ञानिक ह्यांच्या सिद्धान्तांच्या आधारे केली आहे. मराठीत असे प्रयत्न दुर्मिळ आहेत. भाषा ही माणसाला स्वतंत्र करणारी गोष्ट आहे...भाषा माणसाला वस्तुमुक्त करते, कारण भाषेचे विश्व हे प्रतीकांचे विश्व असते. आपल्या नादव्यवस्थितींच्या द्वारे भाषा वृत्ती संवेद्य करू शकते आणि या वृत्तींच्या प्रत्ययामधून मूल्यभावाचाही प्रत्यय आपोआप येतो. अशा रीतीने प्रतीकात्मक आणि मूल्यभाव-सूचकता ह्या दोन मूलभूत गुणधर्मांमुळेच भाषा साहित्याला त्याचे स्वतःचे असे सामर्थ्य प्राप्त करून देते हा मुक्तिबोधांच्या युक्तिवादाचा पाया आहे.

भाषा हे साहित्याचे साधन असते तर भाषेद्वारा साकार होऊ शकणारा अनुभव हा साहित्याचे माध्यम असतो. म्हणून मुक्तिबोधांनी पाचव्या प्रकरणात जीवनानुभवाच्या स्वरूपाची चर्चा केली आहे. संवेदना, बोधना व प्रतिभा त्यांचे विवेचन ह्यात येते. पण प्रतिमांचे विशेष महत्त्व लक्षात घेऊन त्यांनी संपूर्ण सहावे प्रकरण प्रतिभेच्या स्वरूपाच्या चर्चेसाठी दिले आहे. ही चर्चा सुबोध करण्यासाठी त्यांनी केशवसुत, बालकवी, कुसुमाग्रज, इंदिरा, मर्ढेकर, ग्रेस व सुर्वे अशा आधुनिक मराठी काव्यातील प्रमुख कवींच्या कवितांची उदाहरणे घेतली आहेत. हा सर्वच भाग अतिशय वाचनीय आहे; रूढ मतांना धक्के देणारा आहे. मुक्तिबोधांनी आधुनिक मराठी काव्यावर स्वतंत्र पुस्तकच लिहिले पाहिजे असे वाटायला लावणारा हा भाग आहे ह्यात शंका नाही.

सहाव्या प्रकरणात मुक्तिबोध परत एकदा रस व लय या सिद्धान्तांच्या अपुरेपणाकडे वळले आहेत, तर सातव्या प्रकरणात त्यांनी प्रत्यक्ष मानवी व्यवहाराच्या स्वरूपाचे विवेचन केले आहे. आपला सिद्धांत मांडण्याची अशी सर्व प्राथमिक तयारी पूर्ण झाल्यावर आठव्या प्रकरणात आपल्या मुख्य विषयाकडे—मानुषतेकडे ते वळतात आणि सामाजिक मूल्यात्मजीवन व मानुषता ह्यांतील भेदही स्पष्ट करतात. मानुषता हेच ललित वाङ्मयाचे प्राणभूत तत्त्व आहे, हा त्यांचा सिद्धांत असून तो त्यांनी नवव्या प्रकरणात मांडला आहे. आणि त्याचे तपशिलवार विवेचन त्या व दहाव्या प्रकरणात केले आहे. मात्र भाषेच्या ललित सामर्थ्याच्या आधारे साकार संवेद्य झालेल्या घटकांचा उल्लेख न करता, वा ते लक्षात न घेता केवळ ' मानुषता ' हे ललितकृतीचे संघटक तत्त्व आहे असे म्हटल्याने आपल्या सिद्धान्ताचा विपर्यास केला जाऊ शकेल

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ह्याची त्यांना जाणीव आहे. म्हणून “ ललितकृतीचे साधन ललित सामर्थ्य असलेली भाषा, तिचे माध्यम म्हणजे वाक आणि अर्थ यांनी संपृक्त संवेद्य अनुभव व संघटक तत्त्व ‘ मानुषता ’ हे होय ” असे ते वारंवार सांगतात. त्यांच्या सिद्धांतात लयसिद्धान्तालाही स्थान आहे, कारण आकृतिबंध ही ललित कृतीची अवश्योपाधी आहे. पण केवळ आकृतिबंधाला महत्त्व देणाऱ्या एकारलेल्या, ‘ उथळ ’ टीकेचा एकूण मराठी ललितवाङ्मयाच्या निर्मितीवर अत्यंत हानिकारक परिणाम झाला आहे असे ते प्रतिपादन करतात.

‘ सृष्टी, “ सौंदर्य ” आणि साहित्यमूल्य ’ या पुस्तकाच्या आधारे पुरोगामी वाङ्मयसमीक्षा निर्माण होऊ शकते असा या पुस्तकाच्या प्रकाशकांचा ( लोकवाङ्मय गृह, मुंबई ४ ) दावा आहे. कदाचित असे म्हणणे अधिक सयुक्तिक ठरेल की मराठीतील ‘ पुरोगामी ’ वाङ्मयसमीक्षा ( उदा. दि. के. बेडेकरांची समीक्षा ) आणि आकृतिवादी समीक्षा ह्यांची सांगड घालण्याचा हा पहिलाच प्रयत्न आहे. मर्ढेकरांना नाकारणारी नव्हे तर सामावून घेणारी ही भूमिका आहे. आणि दोन्ही छावण्यांमधील कडवेपणा कमी होऊ लागल्याचे ते प्रसादचिन्ह आहे.

## साभार-स्वीकार

( २१ सप्टेंबर ते १० जानेवारी १९८० )

### १. कथा संग्रह

विवेक चैतन्य : बी. एम्. लोणकर, संजयसाहित्य, सदाशिव, पुणे ३०, १९७९, ७॥ रु.

झारीतला शुक्राचार्य : सुभाष भेंडे, मयूर प्रकाशन, नागपूर, १९७९, १५ रु.

उजेडाचं वेड : अरविंद गोखले, मयूर प्रकाशन, नागपूर, १९७९, १५रु.

एका बापाचा जन्म : रमेश कुबल, जागर प्रकाशन, मुंबई, १९७९, १५ रु.

निवडक शंकर पाटील : संपादक वा. ल. कुलकर्णी, सुरेश एजन्सी, शुक्रवार पेठ, पुणे २, द्वि. आवृत्ती, १९७९, रु. २५.

सातासमुद्रा पलीकडे : रमेश मुधोळकर, वोरा अॅण्ड कं. मुंबई, १९७९, ५ रु.

झुंबर : महावीर जोंधळे, अभिजात प्रकाशन, कोल्हापूर, १९७९, १२ रु.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# पु. ल. : एक साठवण

## परीक्षण

### अनामिक

'पु. ल. : एक साठवण' मोठ्या आकारातील तीनशे साठ पानांची, विपुल अशी पु. ल. देशपांडे यांच्या साहित्यातील बहुतेक सर्व वाङ्मयीन पैलूंना व्यापून राहणारी.

त्यांच्या बऱ्याच पुस्तकांचा वानवळा चाखणारी. त्यांच्या पत्रशैलीचे विविध नमुने सादर करणारी. त्यांच्या विविध ढंगी विनोदाची सुगंधी सुंट–फुलं हुंगायला देणारी.

कधी ख्यालासारखी गंभीर होऊन मूलगामी विचारांची चमक दाखविणारी.

कधी मराठी मनाला खळखळून मनःपूर्वक हसावेसे वाटले, कधी जीवनाच्या विविध विसंगतीत गंमत म्हणून डोकावून पाहता पाहता एकदम गंभीर व्हावेसे वाटले, कधी प्रतिभेची बौद्धिक, भावनिक, हृदयस्पर्शी, चिंतनशील, व्यापक स्पंदने एकत्र पाहावीत असे वाटले, कधी एकटे एकटे वाटू लागले तर या 'साठवणी'तली पानं त्यानं पुनःपुन्हा चाळावीत अशी...

पु. ल. ना दिसलेल्या कर्जतच्या शेतातील पावसात भिजणाऱ्या, चिखलात पाय रुतवत नांगरानं मराठी मातीवर युगानुयुगं रेघोट्या ओढणाऱ्या त्या उघड्यावाघड्या अडाणी शेतकऱ्याला पु. लंच्या या साहित्य-वानवळ्याचं स्वरूप सांगितलं तर तोही नक्की वाचायला शिकेल अशी ही साठलाख मोलाची साठवण.

पु. लं. चा साहित्य रसिक तर आता पुन्हा एकदा त्यांच्या मूल ग्रंथभांडाराकडेच नव्या उत्साहाने वळलेला आहे. पुण्या-मुंबईच्या प्रत्येक ग्रंथालयातील पु. लं. चं. पुस्तक गेल्या सप्टेंबर ऑक्टोबरापासूनच सारखं 'issued' व्हायला लागलंय. हा या 'साठवणी'चा प्रभाव.

आणखी पुष्कळ यश या 'साठवणी'नं साठवलंय. त्यावर आता वेगळं लिहिणं म्हणजे स्वतःचं हासं करून घेणं. लिहिता लिहिता असं वाटू लागलंय की हे पुस्तकच रसिकाच्या हातात प्रत्यक्ष दिलं पाहिजे व गप्प बसलं पाहिजे, इतका हा जीव लावणारा ग्रंथराज आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणून त्या वानवळ्यातलेच मूठभर दाणे आपल्या हातावर ठेवत आहे.—

'कविवर्य बा. भ. बोरकर एकदा आजारी होते म्हणून पु. ल. त्यांना भेटायला गेले. आणि बोरकरांच्या प्रकृतीविषयी लिहिताना राजाध्यक्षांना लिहिले—"डॉक्टरांनी बोरकरांना पेयान्त प्रायश्चित्ताची सजा सुनावली आहे!"

*

पुल हे मो. ग. रांगणेकरांच्या नाटक कंपनीत होते तेव्हाची गोष्ट. मुक्काम नागपूर. थंडी कडाक्याची. प्रत्येक जण सकाळी उठायचा तो "बापरे, काय ही थंडी!" म्हणायचा. तबलजी मामा म्हणाले, "रात्रीसारखी थंडी कधीच पडली नसेल! नुसते दातावर दात आपटत होते." त्यावर पुल म्हणाले, "मामा, तुम्ही रात्री वाटीत काढून ठेवलेल्या दातांच्या कवळ्यासुद्धा एकमेकांवर इतक्या आपटत होत्या की त्या आवाजानेच मी जागा झालो!" चहा पिताना हा विनोद झाला.

*

'आतल्या बाजूला भावी विहिणी आपापल्या घराण्यांची सरळ वळणे एकमेकांवर ठसवीत असतात. मुलगी अगर मुलगा सरळ वळणाची अगर वळणाचा कसा असतो कोण जाणे! कारण 'वळण' म्हटल्यावर ते सरळ कसे असणार? भूमितीला बुचकळ्यात ढकलणारी ही सरळ वळणाची आडवळणी व्याख्या आहे.'

*

"आपण स्वाक्षरी दिलीत तर मी आजन्म उपकृत होईन." सखाराम गटण्याच्या तोंडून हे वाक्य ऐकताना त्याच्या तोंडात दातांऐवजी छापखान्याचे खिळे बसवले आहेत असे मला वाटले. हा मुलगा विलक्षण छापील बोलतो, पण भाषेचा तो छापीलपणा कमालीचा खरा वाटतो."

*

'अण्णू गोगट्या होणे म्हणजे 'पडणे' हा अंतूने मराठी भाषेला बहाल केलेला वाक्प्रचार आहे. रत्नांग्रीचा अण्णू गोगटे वकील गेली कित्येक वर्षे ओळीने मुन्सिपाल्टीच्या निवडणुकीत पडत आला आहे. तेव्हापासून विहिरीत पोहरा पडला तरी पोहऱ्याचा "'अण्णू' झाला काय रे?" असे अंतू ओरडतो.'

*

'प्राध्यापक ठिगळ्यांच्या जिभेवर त्या दिवशी प्रत्यक्ष फाफचे मशीनच नाचत होते जणू! खाडखाड खाडखाड असा त्यांच्या वक्तृत्वाचा ओघ वाहत होता.

"...आज आपली परिस्थिती काय आहे? ज्या सूचिकार बंधूंनी शिवरायाची सुरवार शिवली, पहिल्या बाजीरावाच्या अंगरख्याला तलवारीने न तुटणारे बंद जोडले, महात्मा गांधींना (टाळ्या) एकोणीसशे एकवीस साली नेहरू (टाळ्या) शर्ट शिवून दिला आणि नेहरूंना (टाळ्या) गांधी (टाळ्या) टोपी घालायला लावून श्रद्धा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणि बुद्धी ( हशा ) यांचा अपूर्व प्रेम ( हशा ) संगम करून दिला, त्यांची आज काय स्थिती आहे? " '

*

'श्री. वायदे हे अंगुस्तान विद्यापीठाला लाभलेले एक जणू किनखापाचे कापड आहे. सद्रा शिवायला दिलेल्या कापडाची विजार शिवून वर " एकदा आला परटाकडून की होईल ठीक ! " असा सफाईदार सल्ला देऊन गिऱ्हाइकांच्या हातात बिल टेवणारा हा बहाद्दर विद्यापीठाअभावी वाया गेला असता. आज विद्यापीठाच्या बोर्ड ऑफ स्टडीजचा अध्यक्ष म्हणून ह्यांनी बहुमोल कामगिरी केली आहे. 'सिंगर', 'फाफ', 'उषा', 'हस्कवर्ण' इत्यादी शिवणयंत्रांचे विक्रेते आपली यंत्रे लावा म्हणून त्यांच्या दुकानाशी धरणे धरून बसले आहेत. 'सुलभ ब्लाऊज मंजिरी', 'कोटशास्त्र', 'कंचुकी कौमुदी,' 'जंपर की झंपर !', सद्याची बटने आणि विजारीच्या नाड्या, 'अभिनव काजप्रकाश,' 'शास्त्रीय कर्तरी प्रयोग' इत्यादी ग्रंथांचे लेखक—प्रकाशक आपली पुस्तके नेमण्यासाठी निराळ्या कल्पना काढीत आहेत.'

*

'पानवाल्यांच्या दोन जाती आहेत. एक नुसता पानवाला आणि दुसरा पट्टीचा पानवाला. नुसत्या पानवाल्याच्या दुकानात फार वर्णसंकर असतो. मुंबईत ज्याला पानाची गादी म्हणतात, तो आमच्या मते खरा पानवालाच नव्हे, कारण त्याचे फक्त पानाशीच इमान नसते. तपकीर, मेणबत्त्या, साबणाच्या वड्या, इतकेच नाही तर पोस्टाची कार्डे-पाकिटेसुद्धा तो विकतो. आमच्या पाहण्यात तर असला बेइमानी पानवाला चोरून कवितासंग्रहातली पाने विकताना देखील आढळला !'

*

'तात्पर्य काय, साहित्य, संगीत आणि कला ह्या तिहींचे अधिष्ठान असलेले हे एक छोटेखानी विद्यापीठच आहे. पानवाल्याचे पान खाऊन थुकायचे असते. विद्यापीठातून मिळालेल्या विद्वत्तेचा तरी व्यवहारात निरुपयोगी म्हणून टाकून देण्यापलीकडे आपण काय उपयोग करतो ? तोंड रंगले म्हणजे झाले, आत रस असो वा नसो, अशा बुद्धीने पान खाणारे लोक काय कमी आहेत ? तीच गत डिग्री असली म्हणजे झाले, आत ज्ञान असो वा नसो, म्हणणाऱ्या बहुसंख्य पदवीधरांची !'

*

'आजच्या क्रांतीच्या युगात पानाइतका क्रांतीचा लालभडक तोंडी प्रचार दुसऱ्या कोणत्याही साधनाने होत नाही. परंतु पान कशाशी खातात हे ठाऊक नसलेल्या पाश्चात्यांच्या नादाने त्यांच्यापुढे लाळ घोटणाऱ्या सुशिक्षित समाजातून पानाचा मान कमी होत चालला आहे, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. म्हणे कपड्यावर डाग पडतात !


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

थुंकता येईना पान वाईट! आम्ही तंबाखू खात नाही, हे म्हणण्यात धन्यता मानणारे हे परीटघडीचे तरुण पाहिले, की 'विडा घ्या हो नारायणा' गाऊन तो स्वतःच्या पतीला गोविंदविडा, त्रयोदशगुणी विडा, वगैरे देणाऱ्या सुगृहिणींनी पानापानांतून जतन केलेल्या ह्या सांस्कृतिक वारशाचे पुढे काय होणार ह्या चिंतेने तोंडचे पान रंगेनासे होते.'

*

'पलीकडल्या फुटपाथावरून एक कुत्रे तंग स्लॅक्स घातलेल्या आपल्या मालकिणीच्या मुठीत साखळी वाळून तिला ओढीत घेऊन पुढे गेले. याहून अधिक मौज नव्हती. वास्तविक थिएटराबाहेरची मौज पाहण्याचे मी टाळतो, कारण ती मौज सोडून आतले नाटक पाहायला गेल्यावर बऱ्याच वेळा बाहेरची मौज अधिक बरी होती असे वाटते.'

*

'चाळीत धनुष्यदेखील आहे. आवडाक्का त्याच्यावर वातीचा कापूस पिंजतात. तळमजल्यावरच्या धूतवस्त्रेश्वर लाँड्रीचे मालक बाबूराव साखरपेकर पातळांचेच काय परंतु गंजिफाकांचेदेखील वस्त्रहरण करून दुःशासनावर ताण करतात.

वरच्या मजल्यावरून सांडपाण्याची बादली रिकामी करून पर्जन्यास्त्र सोडले की संध्याकाळी खालची मंडळी चौकात शेगड्या फुलवायला ठेवून धूम्रास्त्र सोडतात.'

*

भिंगार्ड्यांच्या त्या भयकारी शिंकेने भक्तमंडळींचे डोळे खाडकन उघडले. पण भिंगार्ड्यांना त्याचं काही नव्हतं. बाजूच्या एका तरुण पारशिणीच्या गोऱ्यापान उघड्या पाठीकडे पाहात तो दाढी खाजवीत बसला होता. ती तरुण पारशीण बिचारी अध्यात्मात तल्लीन होऊन लिपस्टिक लावीत होती. त्या पारशिणीशेजारी आप्पा भिंगार्डे म्हणजे चवळीच्या जुडीशेजारी सुरणाचा गड्डा ठेवल्यासारखा दिसत होता.'

*

'दुसऱ्या दिवशी मी गोठोस्करदादांचा कोट आणि त्यांचे दहा रुपये इमानाने परत नेऊन दिले. दुसऱ्याचे पैसे नसल्या ठिकाणी खायला मी गुरुदेव थोडाच होतो?" गोठोस्करदादा म्हणाले—

"काय म्हणाले गुरुदेव?"

"—गुरुदेव म्हणाले, आय् ॲम् द ही ऑफ द यू इन् द आय् ऑफ हू?"

"म्हणजे हो काय?"

"म्हणजे आमच्या बाबांच्या शब्दांत सांगतो आमचे वडील म्हणत—बेंबट्या, ब्रह्मदेवान् एवढी सृष्टी निर्माण केली, पण त्याचा आवडता प्राणी गाढव! म्हणून मनुष्यप्राण्यातदेखील त्याने गाढवाचा अंश घातलाय. जगात कुंभार थोडे, गाढवेच

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

फार ! तस्मात् कुंभाराची चलती आहे. कुंभार हो, गाढवांस तोटा नाही ! "

*

' आपल्याकडे अपघात, चोरी, मारामारी अशा प्रसंगाला पोलिस कधीही स्वतःच्या उपस्थितीने अधिक शोभा आणीत नाहीत. ' आणि माणसाचा मुडदा पडला ' की दोन तासांनी बाजूच्या जिवंत गर्दीला दंडुके हाणीत पोलिसपार्टी येते. लंडनमध्ये तर मी ऐकले की चोरीच्या ठिकाणी चोराच्या आधी पोलिस उभा असतो ! चोराला चांगली चोरी करू देतो आणि मग पकडतो. चोर कोर्टात वेळेवर हजर राहतो. जी शिक्षा असेल ती मुकाट्याने भोगतो. तुरुंगात टेलिव्हिजन, रेडिओ वगैरे असल्यामुळे त्याचा वेळ बरा जातो. फक्त रविवारी पाद्री येऊन प्रवचन देतात तेवढा वेळ त्रासात जातो म्हणतात. '

*

' आमची काश्मीरची सहल, ' काश्मीर फारच सुंदर आहे. तिथे सुंदर गुलाब व सुंदर इतर फुले व सरोवरे आहेत. ' इ. इ. स्वरूपाची झाली. गुलमर्ग ते खिलनमर्ग हा सुमारे १०–१२ मैलांचा डोंगराळ मुलखातला प्रवास घोड्यावरून केला. शिवाजी, बाजीराव, महालक्ष्मीच्या शर्यतीच्या मैदानावरचे जॉकी वगैरेंबद्दलचा आदर वाढला. घोडचूक ह्या शब्दाचा अर्थ अशा वेळी कळतो. त्यातून माझ्या वाट्याला आलेल्या घोड्याची चाल विनायकबुवांनी लावल्यासारखी होती. '

*

' पुण्यात आता मुंबईच्या सर्व सोयी आहेत. ज्या जिमखान्यावर लोक चोरून मासे खायचे तिथे आता dressed chicken आणि ham च्या दुकानात चितळे-दामले-रानडे मंडळी दिसतात. अजून ' कोंबडी ' खातो म्हणायचे धैर्य नसल्यामुळे ' चिकन ' खातो म्हणतात ! '

*

' एखाद्या छळवादी भाडेकरूसारखा हा संधिवात गुडघ्यात बिऱ्हाड करून बसला आहे. तसा मी बिछान्यावर वगैरे पडून नाही; हिंडूफिरू शकतो. पण दर वेळी हे गुडघे—' मिस्टर तुम्ही आमच्या मेहरबानीने फिरताहात— ' हे बजावत असतात. माझ्या शत्रूंनाही माझ्या स्वभावात न सापडलेला आखडूपणा माझ्या गुडघ्यात कुठून उतरला कळत नाही. '

*

' खुल्या वातावरणातल्या त्या शाळेत, नुसती मजा करावी हा गुरुदेवांचा ( टागोरांचा ) हेतू नव्हता, तिथे अभ्यासाची तपःसाधना होती. फक्त घाऊक प्रमाणात एकाच छापाच्या विटा भाजून काढायचा तो ' शाळा ' नामक कारखाना होऊ नये यासाठी त्यांची धडपड होती. प्रत्येक शिल्प होता होईल तितके स्वतंत्र रीतीने घडावे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

या हेतूने त्यांनी ही आश्रमीय शिक्षणपद्धती स्वीकारली होती.'

*

'मातीपाशी आणि मातीच्या दानावर जगणाऱ्या शेतकऱ्यावर प्रेम करणाऱ्या रवींद्रनाथांनी स्वतः शेतीविषयक प्रयोगशाळा चालवली होती. कुणाच्या तरी परिश्रमातून उभी राहिलेली शेते डुलताना त्यांच्यावर कविता लिहिली की आपले काम झाले अशी त्यांची भावना नव्हती. ती शेती उभी करणाऱ्यांचे जीवनही आनंदाने डुलावे ही त्यांना तळमळ होती...जीवनातल्या निरुद्यमांचे जेव्हा उत्सव होतात तेव्हाच आयुष्य ही आनंदयात्रा होते. एरवी रखडपट्टी!'

*

'ज्या जगात मी आलो ते हे जग मृत्यूपूर्वी मी सुंदर करून जाईन अशी जिद्द हवी. केवळ विद्यार्थ्यांबद्दलच नव्हे तर आपल्या सर्वच समाजाबद्दल माझी ही तक्रार आहे की आपण जीवनाकडे पाहतच नाही.'

'माझ्या दृष्टीने मी प्रभू त्यालाच म्हणेन की ज्याला 'प्रभू' मधला 'भू' जवळचा वाटतो. प्रकर्षानं जो 'भू' जवळ जातो तो प्रभू असंच मला वाटतं! हीच प्रभूची व्याख्या असायला पाहिजे असं मला वाटतं. त्या प्रभूचे हजार हात तुम्हांला—समोर पाहा—दिसतील. प्रत्येक झाडाची फांदी हा असा स्वर्गाकडे निघालेला हात आहे—प्रकाशाकडे धावत सुटलेला हात आहे. त्याच्यापासून आपल्याला मंत्र घ्यायचे आहेत! तपोवनामध्ये ऋषिमुनी जाऊन वसत असत. झाडांच्यापाशी पुन्हा धावत असत. झाडापाशी धावणाराचं कामच हे होतं की एका क्षणामध्ये जमिनीच्या आत आत जाण्याचं वेड आणि दुसऱ्या क्षणामध्ये आकाशाकडे जाण्याची ओढ.'

'सत्य उच्चारणाऱ्या शब्दाला सत्तेइतके कोणी भीत नाही. माणुसकीचा जयजयकार फक्त लोकशाहीत होतो. लोकशाहीत व्यक्तिपूजा अमान्य आहे. अहंतेच्या जागी जनता आहे. वैयक्तिक श्रीमंतीत सुख मानणारा नागरिक लोकशाहीवादी नव्हे. सर्वांनी समुदायाचे सुखदुःख मानले पाहिजे.'

'जो जे वांछील तो ते लिहो यामागे जीवन अधिक सुंदर करण्यासाठी, दुरितांचे तिमिर घालवण्यासाठी, ही भावना नसेल तर कलानिर्मितीच्या मुख्य प्रेरणेशीच ती प्रतारणा होईल.'

I do not like being called a humorist. I don't sit down to manufacture humour. I write the way I love to write, and I am grateful to my readers when they notice the hidden tear. For me humour is a wonderful armour. I have used it occasionally as a weapon, but I have taken care to see that it does not hit anyone below the belt. Unfortunately, some people wear their belt a



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

little too high! The humour that hurts is ugly, and art abhors ugliness.'

'मला तर शारीरिक वेदना हेच सर्वांत मोठं सत्य वाटतं! (मोठं सत्य—छोटं सत्य-त्याचबरोबर 'सत्यमेव जयते' मधलं राजकारणी सत्य—असा सत्याच्या विविध प्रकारांचा मजेदार कोश करायला हवा!)—दाढदुखी, डोकेदुखी, अपचन इथपासून ते कर्करोग-महारोगापर्यंत अनेक अवतारांनी हे सत्य प्रकट होतं, जगण्यातली धुंदी उतरवून टाकतं.'

'परस्पर-गैरविश्वास हा सरकारी कार्यप्रणालीचा मूलाधार असतो. पाच—सहा निम्न, निम्नतर, निम्नतम सेवकांना सहीत गुंतवल्याची खात्री करूनच उच्चाधिकारी त्या कागदावर आपली सही करीत असतात. त्यामुळे जिथे जिथे सरकारी हस्तक्षेप होतो तिथे तिथे कामाचा वेग मंदावलाच पाहिजे, अभिसरणाचे बोळ अरुंदच होत गेले पाहिजेत आणि कार्य कुजलेच पाहिजे असा प्रकार घडत असतो. माणसाचे स्वतः विचार करून घेण्याचे इंद्रिय थंडावून टाकणे, त्या निर्णयाची जबाबदारी स्वतःच्या अंगावर घेण्याचे त्याचे साहस नष्ट करणे हा सरकारी नोकरशाहीचा अंगभूत गुण आहे. आपले शिक्षण हे ह्या कार्यपद्धतीचा बळी झालेले आहे.'

'तुमच्या हायकूमुळे मलाही हायकू झाला. त्याची लक्षणे ह्या पत्रातून फुटलेल्या कवितांच्या पुळयांवरून दिसतील.

दिवसभर घेऊन बसता
जपान्यांची हायकू
मग लगीन करून
आणलीतच का
सोन्यासारखी बायकू
एक कोंबडी खुडूक झाली
आता नुसतीच घालते बांग
'खुडुक कवी हायकूशिवाय
आणखी काय करील सांग!'


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# ग्रंथव्यवहार परिषदेचा वृत्तान्त

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दि. २७ व २८ ऑक्टोबर रोजी कार्ला हॉलिडे कँप-मध्ये ग्रंथव्यवहार परिषदेचा जो उपक्रम केला गेला तो सर्वस्वी नवीन होता. ग्रंथ-व्यवहाराशी संबंधित असणारे लेखक, प्रकाशक, संपादक, मुद्रक, विक्रेते, चित्रकार इत्यादींनी एकत्र यावे, आपापल्या समस्यांची मोकळेपणाने चर्चा करावी, अडी-अडचणी समजावून घ्याव्या या हेतूने ही परिषद भरविण्यात आली होती. तिला उपस्थित राहावे यासाठी संबंधित अशा महाराष्ट्रातील सुमारे ५०० व्यक्तींना छापील निमंत्रणे पाठविण्यात आली होती. कर्तव्यभावनेने सर्वांनी स्वखर्चाने यावे असे आवाहनही करण्यात आले होते.

ग्रंथव्यवहार परिषदेत पुढील तीन विषयांवर चर्चासत्रे आयोजित करण्यात आली होती —

( १ ) लेखक, प्रकाशक, संपादक संबंध

( २ ) ग्रंथप्रसार

( ३ ) शासन, साहित्यिक, साहित्यसंस्था.

या तीन विषयांवरील चर्चेला चालना मिळावी म्हणून काही अनुभवी व अभ्यासू व्यक्तींकडून टिपणे मागविण्यात आली होती. पुस्तिकेच्या रूपाने छापून उपस्थितांना ती आधी वाटण्यात आली. श्री. रामदास भटकळ ( ग्रंथप्रसार ), श्री. दिनकर गांगल ( ग्रंथ प्रकाशन व संपादन ), श्री. दा. दि. ऊर्फ मधुकाका कुलकर्णी ( प्रकाशन-व्यवसाय फायद्यात आहे काय ? ), प्रा. रमेश पानसे ( ग्रंथ प्रसार : एक सैद्धान्तिक विश्लेषण ), श्री. वसंत वरखेडकर ( शासन, साहित्यिक, साहित्यसंस्था ), श्री. वा. रा. सोनार ( मानधन संरक्षणासाठी कायद्याची ‘ उचल ’ ), श्रीपाद जोशी ( लेखक-संपादक, लेखक-प्रकाशक संबंध ) यांनी टिपणे पाठवून परिषदेला प्रारंभीच चांगला प्रतिसाद दिला.

परिषद प्रत्यक्ष भरण्यापूर्वी तीन आठवडे सर्व संबंधितांना पुन्हा एकदा तपशील-वार विनंतीपत्र पाठविण्यात आले व उपस्थित राहणाऱ्यांनी १५ ऑक्टोबरपर्यंत नावे

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नोंदवावीत अशी सूचना करण्यात आली. सर्वांसाठी प्रतिनिधी शुल्क ५ रु. ठेवण्यात आले होते. निवासभोजनादी खर्च ऐच्छिक ठेवण्यात आला होता. या परिषदेला सुमारे ८० व्यक्ती उपस्थित होत्या. त्यात लेखक, संपादक, प्रकाशक, मुद्रक, चित्रकार इ. प्रातिनिधिक व्यक्ती होत्या, ही विशेष समाधानाची गोष्ट.

ग्रंथव्यवहार परिषदेच्या दोन दिवसांच्या कार्यक्रमासाठी स्थळ निवडणे व खर्चाची तरतूद करणे या दोन अडचणी प्रारंभी उभ्या होत्या. महाराष्ट्र शासनाच्या पर्यटन विभागाच्या सहकार्याने पहिली अडचण निवारण झाली, तर मुख्यमंत्री निधीतून ५०००/– रु. चे अनुदान मिळाल्याने दुसरी चिंता मिटली. ही परिषद भरविताना साहित्य परिषदेला कोणत्याही प्रकारची आर्थिक झळ लागू द्यायची नाही, असे कार्यकारी मंडळाचे धोरण होते. परिषदेचे निमंत्रक श्री. ग. वा. बेहेरे यांच्या विशेष प्रयत्नामुळे हे धोरण कटाक्षाने पाळले गेले.

शनिवार दि. २७ ऑक्टो. रोजी कार्ला हॉलिडे कॅम्पमधील कॅन्टीनवरच्या सभागृहात ठीक १०॥ वाजता ग्रंथव्यवहार परिषदेला प्रारंभ झाला. या वेळी सुमारे ८०–८५ स्त्री-पुरुष प्रतिनिधी उपस्थित होते. परिषदेचे निमंत्रक श्री. ग. वा. बेहेरे यांनी आरंभी उपस्थितांचे स्वागत केले आणि परिषद भरविण्यामागील हेतू विशद केला. यानंतर तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी ग्रंथपूजन करून परिषदेचे उद्घाटन केले. लोणावळा नगरपरिषदेचे अध्यक्ष श्री मो. म. आगरवाल यांच्या स्वागतपर भाषणानंतर प्रा. गं. बा. सरदार ( लेखक ), श्री. हरिभाऊ मोटे ( प्रकाशक ), श्री. चिंतामणी लाटकर ( मुद्रक ) या तिघांचा तर्कतीर्थांच्या हस्ते प्रतिनिधीभूत सत्कार करण्यात आला. परिषदेच्या कामास यानंतर ११ वाजता रीतसर आरंभ झाला.

श्री. रामदास भटकळ हे पहिल्या चर्चासत्राचे नियंत्रक होते. प्रथम श्री. दा. दि. कुलकर्णी ( श्रीविद्याप्रकाशन ) यांनी ‘ प्रकाशनव्यवसाय फायद्यात आहे काय ? ’ या विषयावरील आपले छापील टिपण वाचले. कागद, छपाई इत्यादींचे वाढते दर, वितरकांची नफेबाजी, सवलत योजना, बुकक्लब्ज, पाठ्यपुस्तकांचे राष्ट्रीयीकरण इत्यादी गोष्टी प्रकाशकाच्या दृष्टीने कशा अडचणीच्या झाल्या आहेत याचे सोदाहरण विवरण त्यांच्या टिपणात होते. श्री. कुलकर्णी यांनी प्रकाशकाच्या दृष्टिकोणातून मांडलेल्या विचारांशी नंतरच्या चर्चेत अनेकांनी मतभेद प्रकट केले. विशेषतः एका ग्रंथप्रकाशनाच्या व पगारी प्रतिनिधीच्या खर्चाची त्यांनी जी कोष्टके दिली होती ती कित्येकांना एकांगी वाटली. वितरकांच्या नफेबाजीबाबत श्री. शांतीलाल भंडारी यांनी आपले परखड अनुभव कथन केले, तर प्रा. आनंद यादव यांनी लेखकाला सोसाव्या लागणाऱ्या बौद्धिक परिश्रमांची प्रकाशक पुरेशी दखल घेत नाहीत, ते परिश्रमही हिशोबात धरले जावेत असा मुद्दा मांडला. प्रा. प्र. ना. परांजपे, श्री. अनिल मेहता, प्रा. द. ता. भोसले, प्रा. न. म. जोशी, श्री. शाम कोपर्डेकर, श्री. ह. अ. भावे,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

श्री. गजानन क्षीरसागर, श्री. दत्तप्रसन्न काटदरे, श्री. गजानन खोले, श्री. ना. तु. ठाकूर, श्री. वि. ग. कानिटकर इत्यादींनी ग्रंथप्रसाराच्या संदर्भात आपापले विचार मांडून मूळ चर्चाविषयात रंगत आणली. प्रकाशकांनी कथाकादंबऱ्यांवर भर न देता धर्म, संस्कृती, समाजचिंतन अशा नव्या वाटा शोधाव्यात, वृत्तपत्रीय परीक्षणे फसवी असू शकतात, ग्रंथप्रदर्शने विक्रीच्या दृष्टीने लाभदायक ठरतात, ग्रंथव्यवहार आणि वैयक्तिक ग्राहक यांचेकरता द्विस्तरीय किंमती असाव्यात असे अनेक विचार चर्चाप्रसंगी प्रकट झाले. श्री. रामदास भटकळ यांनी समारोपाच्या भाषणात बुकक्लब्ज, सवलत योजना, वितरकांचे कमिशन यासंबंधी आपले विचार मांडले व या सर्व गोष्टींचा अतिरेक टाळून सुसूत्रपणे अंमलबजावणी केल्यास त्या अनिष्ट नाहीत, ग्रंथप्रसाराला त्या पूरकच ठरतात असे सांगितले. अशा तऱ्हेने लेखक, प्रकाशक, संपादक, वितरक इत्यादींनी मनमोकळी चर्चा केल्यानंतर आणि नियंत्रकांनी तिचा संयत भाषेत समारोप केल्यानंतर पहिले चर्चासत्र संपले.

दुपारचे भोजन व चहा झाल्यानंतर ४ वाजता दुसरे चर्चासत्र सुरू झाले. खरे तर पहिल्यातील अपुरी चर्चा आणि दुसऱ्यातील नवचर्चा-असेच एकूण या सत्राचे स्वरूप होते. श्री. चिंतामणी लाटकर यांच्या नियंत्रणाखाली आरंभ झालेल्या या सत्रात प्रथम प्रा. कु. श्री. अर्जुनवाडकर यांनी आपले टिपण वाचले. प्रकाशकाविषयी आलेल्या वैयक्तिक कटू अनुभवाच्या आधारे हे साधार, तपशीलवार टिपण होते. ते वाचले गेल्यावर सभागृहात साहजिकच एक प्रकारची गंभीरता व कटुता निर्माण झाली. श्री रंगा मराठे यांच्या अशाच तऱ्हेच्या अनुभवकथनामुळे चर्चा एकीकडे झुकत असल्याचा भास झाला. श्री. क. दि. सोनटक्के, प्रा. सौ. कविता नरवणे, प्रा. बापू कुंभोजकर, श्री. जवाहर मुथा, श्री. रवींद्र गुर्जर, इत्यादींनी आपापले दृष्टिकोण मांडल्यानंतर श्री. लाटकर यांनी आरंभी झालेल्या एकांगी चर्चेचा उचित शब्दात समारोप केला. टीकाविषय झालेले एक प्रकाशक उपस्थित होते. त्यांनी आपली बाजू मांडली असती तर उपयुक्त झाले असते. कारण चर्चेत सर्वांना मोकळीक होती. सायंकाळी दिवे गेल्यामुळे ही चर्चा अर्थात पुरी होऊ शकली नाही.

रविवार दि. २८ रोजी, सकाळी ९ वाजता प्रा. गं. बा. सरदार यांच्या अध्यक्षतेखाली ' शासन, साहित्यिक आणि साहित्यसंस्था ' या विषयावरील चर्चेस आरंभ झाला. या प्रसंगी तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी उपस्थित होते. प्रथम श्री. म. श्री. दीक्षित यांनी वरील विषयावर टिपण वाचले. त्यात शासन आणि साहित्यिक-साहित्यसंस्था यांच्यातील संबंध सलोख्याचे असावेत, शासनाकडून अनुदाने वा पारितोषिके स्वीकारण्यात मिंधेपणा नसतो, शासनाने कर्तव्यबुद्धीने साहित्यिकांची प्रतिष्ठा राखावी, शासनाने केलेल्या चांगल्या कामाबद्दल साहित्यिकांनी कृतज्ञ असावे, शासनाकडे अकारण पाठ फिरवू नये असे काही विचार साधार माहिती देऊन व्यक्त केले. प्रा. प्र. ना. परांजपे, डॉ. वसंत सावंत, श्री. विश्वनाथ नरवणे, श्री. दिनकर गांगल,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रा. बापू कुंभोजकर, प्रा. अनिल सोनार, श्री. सुनील आढाव इत्यादींनी यानंतर शासनाबाबत आपापले अनुभव व अपेक्षा व्यक्त केल्या. पी.एच.डी. प्रबंधाला अनुदान देण्याबाबतच्या साहित्यसंस्कृती मंडळाच्या धोरणासंबंधी प्रा. सावन्त यांनी टीका केली. श्री. गांगल यांनी नवोदित लेखकांना अनुदान देताना एका सामान्य लैंगिक कादंबरीला अनुदान मिळावे याबद्दल खंत व्यक्त केली. प्रा. परांजपे यांनी शासकीय पातळीवर एक नवी केंद्रीय साहित्यसंस्था निर्माण करण्याची गरज असल्याचे प्रतिपादन केले. तर्कतीर्थ जोशी यांनी साहित्यसंस्कृती मंडळावरील आक्षेपांचे निरसन करून अनुदान-विषयक धोरण स्पष्ट केले. यानंतर नामदार श्री. सुशीलकुमार शिंदे यांनी छोटे भाषण करून ग्रंथव्यवहार परिषदेच्या उपक्रमाचे स्वागत केले. सहकार्याचे तबक घेऊन शासन शारदेच्या दरबारात प्रवेशद्वारी उभे असता साहित्यिकांनी त्याचा स्वीकार करावा असे कळकळीचे आवाहन केले. प्रा. गं. बा. सरदार यांनी लेखकाचे स्वातंत्र्य आणि प्रतिष्ठा राखली जावी असा मुख्य विचार सांगून उचित शब्दात समारोप केला.

साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी शेवटी ग्रंथव्यवहार परिषद यशस्वी करणाऱ्या सर्व संबंधितांचे, मान्यवरांचे आणि परिषदेच्या यशात मोटा वाटा उचलणारे निमंत्रक श्री. ग. वा. बेहेरे यांचे मनापासून आभार मानले. यानंतर परिषद समाप्त झाली.

ग्रंथव्यवहार परिषदेचा हा उपक्रम साहित्य परिषदेने प्रथमच केला होता. परिषदेला स्वखर्चाने उपस्थित झालेल्या पाऊणशेऐंशी व्यक्ती, आणि तेथील मन-मोकळी चर्चा या दोन बाबी लक्षात घेता परिषद एकंदरीने यशस्वी झाली असे वाटते. लेखक, प्रकाशक, मुद्रक, वितरक इ. ग्रंथव्यवहाराशी संबंधित व्यक्ती दोन दिवस एकत्र आल्या हे यश काही कमी नाही. परिषदेत तीन चर्चासत्रे आयोजित केली होती. सर्व चर्चा समाधानकारक झाल्या असे म्हणता येणार नाही. काही व्यक्तिगत कटू अनुभव सांगितले गेल्यामुळे थोडे गंभीर वातावरण निर्माण झाले. काही चर्चिकांनी लक्ष विषयावर केंद्रित करण्याऐवजी व्यक्तिगत अनुभवावर भर दिला. पण असा थोडा प्रकार घडला असला तरी एकूण चर्चेचा संकलित परिणाम ‘ ग्रंथव्यवहार परिषदेसारखे उपक्रम नेहमी व्हायला हवेत ’ या भावनेत झाला यात शंका नाही. परिषदेचे यश हे अखेर सर्वांच्या सहकार्यावर व चर्चेत भाग घेणाऱ्यांवर अवलंबून होते. काही उणिवा राहिल्या असतील, चुका घडल्या असतील तर त्याचे उत्तरदायित्व सर्वांवर पडते. घडले ते उपयुक्त व सुधारणेला चालना देणारेच घडले.

परिषद आटोपल्यावर काही वृत्तपत्रांनी वृत्तान्त देऊन प्रसिद्धी दिली याबद्दल आम्ही आभारी आहोत. ‘ सकाळ ’ वृत्तपत्राने वृत्तान्त चांगला दिला. पण परिषदेशी संबंध नसणाऱ्या एका गोष्टीकडे वाचकांचे लक्ष वेधून अकारण गैरसमज उत्पन्न केला याचे आम्हास दुःख झाले. महाराष्ट्र शासनाचे व जाहिराती देणाऱ्या सर्वांचे आम्ही आभारी आहोत.

**म. श्री. दीक्षित ( कार्यवाह )**

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



# परिषद् : कार्यवृत्तान्त

## ( ऑक्टो. १९७९ ते १३ जानेवारी )



गेल्या तिमाहीत परिषदेतर्फे जे विविध कार्यक्रम झाले त्याचा हा धावता वृतान्त—

**स्मृती व श्रद्धांजली :**

१७ ऑक्टोबर—' काळ ' कर्ते कै. शि. म. परांजपे यांची पन्नासावी पुण्यतिथी. कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांचे अध्यक्षतेखाली श्री. जयंतराव टिळक यांचे भाषण. २९ नोव्हेंबर—कै. माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त पुण्यातील वीस नवोदित कवींचे कविता वाचन. कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे डॉ. वसंत सावन्त ( सावन्तवाडी ) यांनी प्रसंगोचित भाषण केले आणि स्वतः तीन कविता पेश केल्या. ७ डिसेंबर—कवी कै. न. शं. रहाळकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त त्यांचे चिरंजीव श्री. शं. न. रहाळकर यांचे श्री. मो. रा. वाळंबे यांच्या अध्यक्षतेखाली ' कै. तांबे यांची सौंदर्य आसक्ती व न. शं रहाळकर यांची सौंदर्यभक्ती ' या विषयावर व्याख्यान.

दि. ६ नोव्हेंबरला म. म. कै. द. वा. पोतदार यांच्या मासिक श्राद्धदिनी डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजलीसभा. या सभेत सर्वश्री वि. त्र्यं. शेटे, बा. रं. सुंठणकर, ना. र. इनामदार, भीमराव कुलकर्णी, चंद्रकुमार डांगे, ना. तु. ठाकूर, नी. शं. नवरे यांची भाषणे. शेवटी श्रद्धांजली ठराव. दि. १३ जानेवारीला कै. प्रा. न. र. फाटक यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. डॉ. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत सर्वश्री ह. श्री. शेणोलीकर, स. मा. गर्गे, वि. त्र्यं. शेटे, भीमराव कुलकर्णी, नी. शं. नवरे आणि श्री. पु. भागवत यांची भाषणे. शेवटी श्रद्धांजली ठराव.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## अभीष्ट चिंतन व सत्कार :

७ ऑगस्ट–श्री. पु. ल. देशपांडे यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त डॉ. करंदीकर, श्री. म. श्री. दीक्षित आणि प्रा. न. म. जोशी (कार्यवाहद्वय) हे त्यांच्या घरी गेले व देशपांडे पतिपत्नींचे त्यांनी परिषदेतर्फे हार्दिक अभीष्टचिंतन केले. श्री. एस. एम. जोशी यांनी ७६ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल दि. १२ नोव्हेंबर रोजी कार्यवाहद्वयांनी त्यांचे घरी जाऊन सत्कार केला.

## साहित्यिक कार्यक्रम :

१० व ११ नोव्हेंबर रोजी पुणे येथे अहिल्याश्रमात राज्यव्यापी दलित साहित्यिक व कलावंतांचा मेळावा भरला होता. या मेळाव्यास कार्याध्यक्षांनी शुभसंदेश पाठविला व परिषदेतर्फे सर्वश्री ग. वा. बेहेरे, म. श्री. दीक्षित, न. म. जोशी हे उपस्थित राहिले. दि. १८ नोव्हेंबरला खोपोलीचे श्री. शाम सोनावले यांचे ‘ विद्रोही कविता ’ या विषयावर प्रा. न. म. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भाषण. २७ नोव्हेंबरला पुणे येथे महाराष्ट्र शाहीरांची परिषद भरली होती. परिषदेला आलेल्या सर्वश्री विभूते, हिंगे, मोटे, योगेश प्रभृती काही शाहिरांना आमंत्रण देऊन परिषदेत प्रा. द. मा. मिरासदार (उपाध्यक्ष) यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. पुण्यातील वयोवृद्ध कथा-कादंबरीकार श्री. पां. गो. लोहोकरे आणि कवी श्री. रं. न. होनप ऊर्फ बगाराम यांच्याशी गप्पागोष्टीचा एक कार्यक्रम ५ डिसेंबर रोजी झाला. सर्वश्री श्री. ज. जोशी, मधुकाका कुलकर्णी, वसंत देवधर, न. का. घारपुरे, म. श्री. दीक्षित, न. म. जोशी इत्यादींनी उभयता साहित्यिकांविषयी गौरवपर भाषणे केली. शेवटी परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला. १७ नोव्हेंबरला साहित्य अकादमीच्या मराठी सल्लागार समितीची बैठक परिषदेच्या सभागृहात भरली होती. बैठकीचे प्रारंभी परिषदेतर्फे उपस्थित मान्यवरांचे स्वागत करण्यात येऊन चहापानाचा कार्यक्रम झाला. २७ डिसेंबरला श्री. सत्यवान नामदेव सूर्यवंशी यांचे श्रीमती विजया पुणेकर यांच्या अध्यक्षतेखाली ‘ खिस्ती साहित्यातील आधुनिक प्रवाह ’ या विषयावर भाषण. या भाषणानंतर श्रोत्यांनी विचारलेल्या प्रश्नांना श्री. सूर्यवंशी यांनी उत्तरे दिली.

## रंगलेली मैफल :

दि. १२ जानेवारीला रात्री ‘ कविता ’ या संस्थेच्या सहकार्याने परिषदेने ‘ शाम–ए–गझल ’ हा एक नावीन्यपूर्ण गझलगायनाचा कार्यक्रम केला. कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. ग. वा. बेहेरे होते व संयोजन प्रा. सुरेशचंद्र नाडकर्णी यांनी केले. दोनतीन तास सतत रंगलेल्या या कार्यक्रमात वीस-बावीस उर्दू, मराठी व गुजराती गझलकारांनी भाग घेतला. त्यांची नावे अशी—सर्वश्री दस्तगीर शिहाब, जहित कमाल, हकिमराजी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हनिफसागर, फितरत सरमदी, मेहमूद नदीम, कमलाकर परचुरे, नारायणदास सोलंकी, विजयकुमार चोकसे, मधुकर कुलकर्णी, कल्याण इनामदार, विलास अत्रे, रमण रणदिवे, राजा दीक्षित, सतीप इनामदार, संजीवनी मराठे, पद्मा गोळे, गजानन वाटवे इत्यादी. हा कार्यक्रम यशस्वी करण्यात श्री. अनिल कांबळे, प्रकाश सावरकर, अरविंद पाटोळे, राजेंद्र पाठक, वसंत पासलकर इत्यादी नवोदितांचे फार सहाय्य झाले.

## प्रा. सरदार यांचा सत्कार :

वार्शी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांचा दि. २८ डिसेंबर रोजी, परिषदेतर्फे प्रकट सत्कार करण्यात आला. अध्यक्षस्थानी प्रा. वसंत कानेटकर होते. भरत नाट्य मंदिरात झालेल्या या सत्कारप्रसंगी सर्वश्री वि. रा. करंदीकर, न. म. जोशी, संजीवनी मराठे, पु. ल. देशपांडे, आणि श्री. ना. ग. गोरे यांची गुणगौरवपर भाषणे झाली. श्री. म. श्री. दीक्षित यांनी आभार मानल्यावर सौ. मीना जोशी यांनी सुश्राव्यरीतीने पसायदान म्हटले आणि कार्यक्रम संपला.

## संलग्नसंस्था वृत्त :

सावंतवाडी येथील द. रत्नागिरी साहित्य संस्था परिषदेशी संलग्न करून घेण्यात आली आहे. या संस्थेचे अध्यक्ष डॉ. वसंत सावन्त हे असून प्रा. विद्याधर भागवत सभासद प्रतिनिधी आहेत. २९ सप्टेंबरला डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी संघास भेट देऊन तेथील कार्यकर्त्यांशी गप्पागोष्टी केल्या. कोजागिरीनिमित्त दक्षिण कोकणातील कवींचे संमेलन श्री. दया पवार यांचे अध्यक्षतेखाली भरले होते.

## ग्रंथपारितोषिके :

कै. गिरिजा गंगाधर जांभेकर ग्रंथपारितोषिकाचा निर्णय समितीकडून थोड्या विलंबाने हाती आल्यामुळे गतवर्षी दिले जावयाचे हे पारितोषिक ‘प्राचीन भारतीय विद्येचे पुनर्दर्शन’ ( संपादक डॉ. रा. ना. दांडेकर आणि डॉ. चिं. ग. काशीकर ) या ग्रंथाला देण्यात आले. प्रस्तुत पारितोषिक ( रु. १०० चे ) उत्कृष्ट संपादित ग्रंथाला देण्यात येते. डॉ. स. गं. मालशे आणि डॉ. भीमराव कुलकर्णी हे परीक्षक होते.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## माहितीपत्रक ( तक्ता क्र. ४, नियम क्र. ८. )

१. प्रसिद्धीस्थान : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता पुणे. ३०.

२. प्रसिद्धिप्रकार : त्रैमासिक.

मुद्रक : श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे. ३०

राष्ट्रीयत्व : भारतीय

पत्ता : कल्पना मुद्रणालय, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणे. ३०.

३. प्रकाशक : श्री. न. म. जोशी ( कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे ३०. ).

राष्ट्रीयत्व : भारतीय.

पत्ता : १०१३ ( नवा ) सदाशिव, नागनाथ पाराजवळ पुणे ३०.

४. संपादक : डॉ. आनंद यादव

राष्ट्रीयत्व : भारतीय.

पत्ता : ५ कलानगर, धनकवडी भाग, सातार रोड, पुणे. ९

५. मालकी : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे. ३०.

मी श्री. न. म. जोशी, असे जाहीर करतो की, उपरिनिर्दिष्ट माहिती बरोबर व खरी आहे.

न. म. जोशी

पुणे दि. १ फेब्रुवारी १९८० कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे. ३०.

अनुक्रमणिका






## २. कादंबरी

**प्रेरणा : ( कुमार कादंबरीका ) :** मुक्ता केणेकर, वोरा ॲण्ड कं. मुंबई, १९७९, ५ रु.

**गाझी ! गाझी ! ( कुमार कादंबरीका ) :** अ. वि. वैद्य, वोरा ॲण्ड कं. मुंबई; १९७९, ५ रु.

**देवाचे विसर्जन :** पां. गो. लोहोकरे, श्रीविद्याशाखा प्रकाशन, पुणे ३०, १९७९, १० रु.

**क्षण एक भाग्याचा :** पां. गो. लोहोकरे, चारुदत्ता प्रकाशन, पुणे ३०, १९७९, ८ रु.

**अन् कायमची मी फसले :** दा. गो. राऊत, सोनी प्रकाशन, गोरेगाव, मुंबई ६३, १९७९, १० रु.

**पोखरण :** केशव मेश्राम, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९७९, १८ रु.

## ३ कविता

**बंगालचा दुष्काळ :** बच्चन/जोशी शं. पा. अनुवादक, सौ. विजया जोशी, १०६ नारायण पेठ, पुणे ३०, १९७९, ५ रु.

**मधुशाळा :** बच्चन/जोशी शं. पा. अनु, सौ. विजया जोशी, १०६नारायण पेठ, पुणे ३०, १९७९, ५ रु.

**श्रीपुरुषार्थ दीपिका :** अपसिंकर बी. एन्. (प्रेमी), रामकिशनराव आपसिकर, सोन, १९७०.

**श्रावणसरी :** उषा टिळक, वैजयंती प्रकाशन, सरस्वती कॉलनी, औरंगाबाद १९७९, ८ रु.

**स्वरगंगा :** द. गो. दसनूरकर; वी. शं. दसनूरकर, मकरंद सहनिवास, माहीम, मुंबई ४०००१६, १९७९, ८ रु.

**ओडिपस :** रंगराव बी. उषा भोंगळे, फ्रेजरपुरा कॅम्प, अमरावती, १९७९ रु. ५

**रणझुंजार :** कुंतीनाथ करके, शाहीर के. डी. करके, हेरले, १९७७, २ रु.

**गाजू दे पुन्हा शाहिरी फड :** कुंतीनाथ करके, महावीर देऊ करके, हेरले, १९७७, २ रु.

**ना रंग ना रूप :** भावसुमने : पां. गो. लोहोकरे, सदभिरुचि प्रकाशन, पुणे २, १९७०, २ रु.

**समुद्र :** वसंत दत्तात्रय गुर्जर, प्रास प्रकाशन, कांदिवली पूर्व, मुंबई ६७, १९७९, ६ रु.

**दीनार :** निरंजन उजगरे, हरिश्चंद्र भास्कर उजगरे, भांडुप ( पश्चिम ) मुंबई, १९७९, ७ रु.

## ४. नाटक व रंगभूमी

**संगीत दुष्टचक्र :** वृंदावन दंडवते, प्रास प्रकाशन, कांदिवली पूर्व, मुंबई ६७, १९७९, ६ रु.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**मराठी रंगभूमीचा पूर्वरंग :** कृ. या. मराठे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे १९७९ २५ रु.

**५. समीक्षात्मक**

**तेंडुलकरांचे नाटक : पाठ्य व प्रयोग :** रमेश धोंगडे, दिलीपराज प्रकाशन, लोणार आळी, पुणे २, १९७९, १५ रु.

**कवितारती :** विजया राजाध्यक्ष, श्रीविद्याप्रकाशन, २५० शनिवार, पुणे ३०, १९७९, २५ रु.

**मराठी नाट्यसमीक्षेचा विकास :** चंद्रकांत धांडे, परिमल प्रकाशन, औरंगाबाद, १९७९, ४० रु.

**उपन्यास : स्थिती और गती :** चंद्रकांत बांदिवडेकर, पूर्वोदय प्रकाशन, नई दिल्ली ११०००२, १९७७, ५० रु.

**विचारधारा :** प्रभाकर पाध्ये, संपादन म. द. हातकणंगलेकर, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १९७९, १० रु.

**६. चरित्रे**

**श्रीधरस्वामी महाराज :** अ. ल. गाडगीळ, श्रीधर साहित्य, पुणे ३०, १९७९, ४ रु.

**तीन महान सारस्वत :** धनंजयकीर, स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, सावरकर रस्ता, डोंबिवली, १९७९, १६ रु.

**संत कृपा झाली :** स. कृ. जोशी, वोरा अँड कं. मुंबई, १९७९, ५ रु.

**महायोगिनी श्रीमाणिकेश्वरी :** नारायण व्यंकटेश देशपांडे, वोरा अँड कं. मुंबई, १९७९, ३॥ रु.

**साखरमाणसे :** हरिहर आठलेकर, वैजयंती प्रकाशन, २९३ क सावंतवाडी १९७९, १५ रु.

**मागे परतोनी पाहे :** सी. ग. देसाई व इतर, संपादित, के. भि. ढवळे, मुंबई, १९७०, ३० रु.

**७. इतिहास, राजकीय इत्यादी**

**सत्तान्तर आणि नंतर :** भास्कर लक्ष्मण भोळे, मयूर प्रकाशन, नागपूर, १९७९, २२ रु.

**ज्वालामुखीच्या तोंडावर :** कुमार केतकर, दिनकर गांगल, ग्रंथाली अभिनव वाचक चळवळ, कुर्ला, १९७९, २० रु.

**जनतेचा सवाल :** दुर्गा भागवत, वरदा बुक्स, पुणे १६, १९७९, ३ रु.

**८. लेखसंग्रह**

**पॅरीस आय लव्ह यू :** ( लेख-प्रवास आठवणींचे ) शांताराम पारपिल्लेवार, मयूर प्रकाशन, नागपूर, १९७९, १५ रु.

**संशोधन मुक्तावली सर नववा** ( संशोधनपर लेख ) **:** वा. वि. मिराशी, विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९७९, ८ रु.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणे वाग्यज्ञे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

# चुकीची दुरुस्ती

( १ ) गेल्या ( क्र. २१० ) अंकातील 'प्लेटॉनिक प्रेम आणि माधवरावांचे चरित्रकार' या श्री. के. क्षी. यांच्या लेखातील आंग्ल कवी शेले याची इंग्रजी कविता खालीलप्रमाणे वाचावी.

One word is too often profaned
for me to profane it,
The desire of the moth for the star
The devotion to something afar
From the sphere of our sorrow!

( २ ) महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका जुलै-डिसेंबर १९७८ च्या अंकातील प्राचीन मराठीचा पहिला वाङ्मयकोश ( म. वा. धोंड ) या लेखात पृ. ७७ वर 'लोक-साहित्यातील ही ( सहदेव भाडळी ) दोन भावंडे आहेत' असे विधान आहे. हे बरोबर नसून त्याऐवजी 'लोकसाहित्यातील ही ( सहदेव भाडळी ) पतिपत्नी आहेत' असे हवे. ( आधार : विद्याधर वामन भिडे–मराठी भाषेचा सरस्वती कोश, भाग२, १९३०, पृ. १८८२ व महाराष्ट्र शब्दकोश, विभाग ५, १९३६ पृ. २३५४ ). असे डॉ. र. वि. हेरवाडकर कळवितात.

## ९. धार्मिक व संकीर्ण

**चतुराख्यान :** मो. दि. पराडकर, सौ. लीलवती शहा, नीरा, १९७९, रु.११

**निर्मळ सूरपूर :** विवेकानंद गोडबोले, इतिहास संशोधन मंडळ, कल्याण, १९७९, १२ रु.

**नामदेवांची अभंगवाणी :** डॉ. हे वि. इनामदार, डॉ. नि. धों. मिरजकर, श्री. रेळेकर ( संपादित ), मॉडर्न बुक डेपो प्रकाशन,पुणे ३०,१९७९, १५रु.

**वाल्मीकीय रामकथा :** भाऊ धर्माधिकारी ( अनु. ) अ. ल. गाडगीळ, पुणे ३०, १९७९, ७॥ रु.

**असे घडले रामायण :** अमरेंद्र गाडगीळ संपादित, श्रीरामकोश मंडळ, पुणे ३०, १९७९, १ रु.

**व्यवसाय पर्यावरण आणि उद्योजकता भा. २ :** प्र. चिं. शेजवलकर व श. द. कोपर्डेकर, सौ. अनघा महाजन, नवी पेठ, पुणे ३०, १९७९, १५ रु.

**नागझिरा :** व्यंकटेश माडगूळकर, श्रीविद्याप्रकाशन, पुणे ३०, १९७९, १५ रु.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## साहित्यिकाची बांधीलकी : गं. बा. सरदार

" साहित्याचे क्षेत्र हे स्वयंशासित असले पाहिजे असे मी मानतो. लेखकावर कोणत्याही संस्थेने वा शासनाने नेहमीच्या सर्वसामान्य परिस्थितीत बाह्य बंधने घालणे अयोग्य व अनिष्ट आहे असे मला वाटते. त्याने कोणता विषय निवडावा, त्याची रचना कशी करावी हे ठरविण्याचे त्याला पूर्ण स्वातंत्र्य असले पाहिजे. त्याने आपली प्रतिभा तत्त्वनिरुपण, नीतिबोध, मतप्रचार यांसाठी राबवावी अशी अपेक्षा करणे बरोबर नाही. मग साहित्यिकाची बांधिलकी म्हणजे तरी काय असा प्रश्न शिल्लक राहतो. लेखकाची बांधिलकी स्वतःशीच असली पाहिजे, त्याने स्वतःच्या जीवननिष्ठेशी, अनुभवाशी व वाङ्मयीन माध्यमाशी इमान राखले म्हणजे झाले. कोणत्याही ठराविक पद्धतीने सामाजिक जबाबदारी पार पाडण्याची त्याच्यावर सक्ती करणे श्रेयस्कर नाही. व्यक्ती व समाज यांच्यातील संबंध, आणि सांस्कृतिक जीवनातील साहित्याचे स्थान यासंबंधीचा त्याचा दृष्टिकोन निकोप, सुस्पष्ट व मूलग्राही असेल, तर त्याच्या वाङ्मयात समाज पराङ्मुखतेचा लवलेशही आढळणार नाही. उलट त्याची संपूर्ण सामाजिक जीवनाला सामावून घेण्याइतकी विशुद्ध व व्यापक बनलेली असेल." ('प्रबोधनातील पाऊल खुणा' या निर्मलकुमार फडकुले –संपादित ग्रंथामधून.)

## कलाकृती आणि रसिक : माधव आचवल

आपण कोणतीही कलाकृती पाहतो म्हणजे काय करतो ? ती कलाकृती आणि आपण यात एक विशिष्ट प्रकारचे नाते जोडतो. आपण कलाकृतीला अनुभव देतो तो सौंदर्याचा. तो स्वीकारण्यास आपले व्यक्तिमत्त्वही त्या दृष्टीने सिद्ध हवे. म्हणूनच सौंदर्याचा अनुभव हा जितका कलाकृतीवर, तितकाच बघणाऱ्याच्या मनोभूमिकेवरही अवलंबून असतो. खरे तर सौंदर्याचा अनुभव ही माणसाची मूलभूत प्रेरणा आहे. पण सौंदर्याला साद देऊ शकणाऱ्या माणसाच्या मनावर व्यवहारातले अनुभव घेताना जडलेल्या सवयींची बरीचशी राख जमलेली असते, कलाकृतींचा अनुभव घेताना ती दूर करणे प्रथम आवश्यक आहे.

—कलाकृती ही जत्रेच्या कोलाहलात बघण्याची गोष्ट नाही. ती बाहेरच्या (आणि आतल्याही) शांततेत एकट्याने, क्वचित दोघांनी अनुभवायची असते.—रसिकाच्या नकळत त्याचे हृदय हलवणे, यापेक्षा कलाकृतीला तरी निराळे काय हवे असते ? ('किमया'मधून.)

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# माझी भूमिका

गेल्या काही दशकांत, विस्तृत अशा या प्रदेशात ज्या लोकांबरोबर माझा सहवास घडला, त्यांच्यापासून लाभलेल्या अनुभूतींनीच माझ्या साहित्यातील विषय निवडण्यास मला प्रेरणा दिली. या व्यक्ती माझ्याकडे येतात. व आपली सुखदुःखे हलकी करतात असेच मला वाटते. जर माझी सहानुभूती त्यांना कवेत घेण्याइतपत व्यापक नसेल तर मला वस्तुनिष्ठ होताच येणार नाही. त्यांना त्यांच्या आयुष्यात ताप देणाऱ्या अनेक विषयांसंबंधी माझ्या स्वतःच्या कल्पना कदाचित सर्वस्वी वेगळ्या असू शकतील. पण मी म्हणजे काही त्या व्यक्ती नव्हेत. त्यांना स्वतःची अस्मिता आहे. समाजजीवनात मला जे परोक्ष व अपरोक्ष अनुभव आले तेच मला त्यांच्यासंबंधीच्या लेखनाला उद्युक्त करीत असतात...

जीवनाचे यथाशक्ती आकलन करणे हाच माझा मुख्य ध्यास आहे. कारण केवळ त्यामुळेच माझ्या कार्याला आणि जीवनदृष्टीला आकार प्राप्त होणार आहे, त्यामुळेच एका विशिष्ट दिशेने माझ्यातून वाहणाऱ्या स्वसंवेद्य जीवनप्रवाहाचा मी एक सुसंवादी घटक बनू शकणार आहे. मी त्याचा स्वीकार केलेला आहे आणि माझी भूमिका करीत आहे. साहित्य आणि कला ही त्याचीच अनुषंगिक फळे आहेत...

**डॉ. शिवराम कारंथ**

उद्घाटक, ५४ वे अ. भा.

म. सा. संमेलन, बार्शी, १९८०

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# अर्थाविण शब्दाचे वारे
# जेवी गंधाविण पुष्पकोश...

शब्दाला अर्थ हवा, फुलाला गंध हवा.
पण शब्दांचा वापरही संयमानं
आणि जाणीवपूर्वक केला पाहिजे.
नाहीतर अर्थाचा अनर्थ होतो....
पैशाचंही तसंच आहे.
पैसा वाटेल तसा वापरला.की अनर्थ होतो.
म्हणून पैशाचा वापर संयमानं करुन
जाणीवपूर्वक बचत केली पाहिजे.
त्यासाठी आमच्या विविध लाभदायी
योजना समजावून घ्या.

**बँक ऑफ महाराष्ट्र**
(भारत सरकारचा उपक्रम)
मुख्यं कार्यालय :
लोकमंगल, पुणे ४११००५

बँकिंग सेवा
व्यक्तिगत जिव्हाळा

पद्मजा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद